ॐ

" सहनाववतु सह नौ भुनक्तु सह वीर्यं करवावहै
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै "।

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

कॉन्टिनेन्टल् प्रकाशन ...६५.

# नागर नीति

लेखक

प्रा. श्यामकान्त माधवराव कुलकर्णी, एम्. ए.

सोराबजी बरजोरजी गार्डा कॉलेज, नवसारी.




कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २

प्र का श क :
अ. अं. कुलकर्णी
**कान्टिनेन्टल प्रकाशन**
टिळक रोड, पुणें २

मु द्र क :
विठ्ठल हरि बर्वे
**आर्यभूषण छापखाना,**
९१५।१ भांबुर्डा, पुणें ४

किंमत चार रुपये

चित्रकार : श्री. दलाल

पहिली आवृत्ति : १९४८.

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | |
|---|---|---|---|
| ७ | वरून ६ वी | समाज भिन्न | समाज यांचे भिन्न |
| १० | खालून ४ थी | देदीप्यमान | देदीप्यमान |
| २१ | वरून ४ थी | विलासस्थानात | निवासस्थानात |
| २५ | ,, ११ वी | का | का |
| २६ | ,, ५ वी | समाजघटकाच्या | समाजघटकाच्या |
| २६ | ,, ७ वी | रोकला | रोखला |
| ४४ | ,, ६ वी | त्यांच | त्यांचा |
| ४८ | ,, १२ वी | घोस | घोष |
| ४९ | ,, १३ वी | बाबा | बाबी |
| ५३ | ,, ७ वी | माग | मार्ग |
| ६१ | ,, १० वी | कायाकरितां | कार्याकरिता |
| ६३ | खालून ३ री | परीक्षाहेतु | परीक्षहेतू |
| ६५ | ,, ५ वी | सावजानिक | सार्वजानिक |
| ७१ | वरून १५ वी | सस्कारविवाह | संकरविवाह |
| ७३ | [ पतित्व व पत्नित्व | याऐवजी | पतिकत्व व पत्नीकत्व असें वाचावें ] |
| ८० | वरून १० वी | संस्थानचे | संस्थानाचे |
| ८० | खालून १ ली | असा केला | असा गाजावाजा केला |
| ८८ | ,, १ ली | पारंपरीण | परंपरागत |
| ९३ | वरून ६ वी | जिवत | जीवंत |
| ९३ | ,, १३ वी | निरपराधी | निरपराधी जीव |
| ९७ | ,, १ ली | व्यवसास | व्यवसाय |
| १०१ | खालून ५ वी | त्याच्य | त्याच्या |
| १०४ | वरून ८ वी | इस्पितळ | इस्पितळांत |
| १२२ | खालून ५ वी | काय | कार्य |
| १२७ | वरून ३ री | आवियुज्य | अवियुज्य |
| १३१ | वरून १९ वी | शतकापासूनच | शतकापासूनच वडाला |
| १३४ | खालून ६ वी | एककोंद्रिन | एककेंद्री |
| १३७ | वरून १४ वी | तिचे संरक्षक, | तिचे संरक्षक |

## विषयानुक्रम

प्रकरण पहिलें

# नागर नीतीची ओळख

सुंदर, सुशोभित व टुमदार बंगले, व त्यासभोंवतींचें स्वच्छ व हिरव्यागार तृणांकुरांनीं आच्छादिलेले आवार, रेखीव बाग, तीमधील मनोहर व रंगीबेरंगी फुलांनीं झांकून गेलेलीं फुलांचीं रोपें, एकजात सर्व ठिकाणीं पवित्र स्वच्छता, घरांत पाहा कीं बाहेर पाहा, कुठेंही दुर्गंधी, घाण, केरकचरा, दलदल, यांचा लवलेशही दिसणार नाहीं, अशीं सर्व घरें; रस्ते तर काय लखलखीत व रेखीव; कुठेंही पाण्याचा संपर्क नाहीं, कडान् कडा अगदीं साफ; एकाद्या प्रचंड बागेंतच बंगले बांधले असावेत असा भास होतो; बाजारदेखील किती स्वच्छ; एवढा मोठा व्यापार चालतो, पण कुठेंही थोडीदेखील घाण सांचलेली दिसत नाहीं; या समुद्रतीरावरच्या प्रचंड वाळवंटांत हजारों लोक जमतात, स्नान करतात, निरनिराळ्या पदार्थांचा समाचार घेतात, पण कुठेंही कागदाचा कपटा, किंवा खाद्य पदार्थांची उरलीसुरली घाण टाकलेली दिसत नाहीं; प्रत्येक मनुष्य कसा उत्साही, कार्यतत्पर व आनन्दी दिसतो; किती शांतपणानें सर्व व्यवहार चाललेले आहेत; आनंदाचा पाऊस व उत्साहाचे जणूं झरेच पाझरताहेत. प्रकाशाच्या झोतानें सारी नगरी देदीप्यमान झालेली आहे.

आतां ही दुसरी नगरी पाहा. अरुंद, अंधारे बोळ; गल्लीबोळांतून अंधार व दुर्गंधी यांची एकमेकांना साथ चाललेली आहे; येथें रोगराईला थैमान घालायला पूर्ण परवानगी; घरें अशीं खेंचून दाटीदाटीनें बांधलीं आहेत कीं,

वाऱ्यालासुद्धां आंत प्रवेश करतां येऊं नये; समोरासमोर बांधलेलीं घरें एकमेकांना भिडणार कीं काय अशी शंका येते; वारा व प्रकाश यांना या ठिकाणीं थारा मिळायचा नाहीं; पण माशा, डांस, चिलटें, यांची मात्र खास चंगळ चाललली आहे; दलदल, सडके, नासके व कुजून दुर्गंधी पसरविणारे पदार्थ ठिकठिकाणीं विखुरलेले आहेत; दिवसानुदिवस हे घाणीचे ढीग सांचून त्यांतला दुर्गंध शहरभर पसरून राहिला आहे; कोणत्याही ठिकाणीं मलमूत्रविसर्जन करण्यास हरकत नाहीं; बाजार व हमरस्ते, तुंबलेलीं उघडी गटारें, ठिकठिकाणचे उकिरडे व सांडपाण्याचे पाट, यांत इतकी घाण सांचलेली आहे कीं पाहतांच अंगावर शहारे यावेत.

या दोन शहरांतील नागरिकांची तुलना करायची म्हणजे प्रकाश व अंधार यांतील साम्य शोधून काढण्यासारखेंच आहे. त्यांच्या संसारचित्राची कल्पना कुणालाही येईल. थोडक्यांत सांगावयाचें तर पहिल्या शहरांतील लोक सुखी व कर्तव्यतत्पर तर दुसऱ्यांतील दुःखी व कर्तव्यपराङ्मुख, इतकेंच म्हणतां येईल.

(आधुनिक जीवनांतील बरींचशीं दुःखे मानवनिर्मितच असतात. दुःखाचा दुसरा प्रकार म्हणजे निसर्गनिर्मित दुःखे; नैसर्गिक अडचणींमुळें हीं दुःखें उद्भवतात.) या अडचणींविरुद्ध मानवाचा प्रयत्न सारखा चालू आहे व हा प्रयत्न म्हणजेच मानवी प्रगतीचा इतिहास होय. आजपावेतों माणसानें निसर्गावर वाढता विजय मिळविला आहे व या धडपडींत आपल्या सुखाकरितां नानाविध साधनें निर्माण केलीं आहेत. खरें पाहतां या कोट्यवधि साधनांमुळें मानवी सुख शतपटीनें वाढावयास पाहिजे; पण खरा प्रकार कांहींसा या उलट दिसून येतो असें म्हणावयास हरकत नाहीं. हीं साधनें निर्माण करतां करतां माणसानें निरनिराळे नवे नवे प्रश्नही निर्माण केले आहेत व त्याबरोबर नवीं नवीं दुःखें पण निर्माण केलीं आहेत. पण योग्य मार्ग चोखाळल्यास हीं दुःखें पुष्कळशीं कमी करतां येणें सहज शक्य आहे. प्रत्येकानें आपलें कर्तव्य ओळखून तें पार पाडण्याचा मनःपूर्वक प्रयत्न केल्यास हीं दुःखें सहज टाळतां येतील व मानवी आयुष्य कितीतरी अधिक सुखी होईल.

प्राप्त परिस्थितींत अधिकांत अधिक सुख मिळविणें व त्याकरितां अहोरात्र प्रयत्न करीत राहणें, ही माणसाची किंवा प्रत्येक प्राण्याची सहज प्रवृत्ति आहे, याविषयीं दुमत होण्याचें कारण दिसत नाहीं. सुख म्हणजे काय व सुखाची साधनें कोणतीं असावींत, याबद्दल मात्र मतभेद असणारच. पण असें असूनही कांहीं शाश्वत व मूलगामी तत्त्वे सर्वांना मान्य करावीं लागतील. कारण व्यक्तिव्यक्तींत कितीही फरक असला तरी मानवी स्वभावाचा एक सामान्य व समान प्रवाह सर्वत्र आढळतोच. )

मानवी स्वभावाचा, (किंवा थोडक्यांत सांगावयाचें तर " मानवा " चा, परिपोष समाजांतच होतो) मानवी संस्कृतींत मानवी बुद्धीचा जितका भाग आहे, तितकाच समाजाचा पण कार्यभाग आहे असें म्हणतां येईल. (संस्कृतीचे प्रमुख आविष्कार व अंगें-भाषा, नीतिनियम, धर्म, शिक्षण, कलाविलास, शासनसंस्था, आर्थिक व तांत्रिक कला, जादू, शास्त्रें, तत्त्वज्ञान, इ. इ.-- सामाजिक वातावरणाखेरीज वाढण्याची शक्यताच नाहीं. माणसाची खरी वाढ समाजाविना होणार नाहीं, हें निश्चित)

जीवनांतील आपलें साध्य सामान्यत: (तीन प्रकारानें साधतां येतें. प्रथमत: इतरांना विरोध करून आपलें साध्य साधतां येईल; किंवा इतरांच्या मदतीची अपेक्षा न धरतां एकट्याच्याच प्रयत्नानेंही कांहीं गोष्टी मिळवितां येतील. यांतील तिसरा प्रकार म्हणजे इतरांच्या सहकारानें प्रयत्न करून मिळविणें. यांतील पहिल्या मार्गानें साध्याच्या मार्गांत विघ्नेंच अधिक येण्याचा संभव फार आहे. दुसऱ्या मार्गानेंदेखील फारशी प्रगति करतां येणार नाहीं. पण तिसऱ्या मार्गानें मिळण्याऱ्या यशाची शक्यता अमर्याद असते, यांत शंका नाहीं. पहिला व दुसरा मार्ग हे अगदींच निरुपयोगी होत, असें मानतां येणार नाहीं. कांहीं विशिष्ट कार्यांत त्यांचाही उपयोग होतोच. पण एकंदरींत त्यांचें क्षेत्र मर्यादित असतें, असेंच म्हटलें पाहिजे. यामुळें बहुतेक सर्व सामाजिक कार्यांत व वैय्यक्तिक साध्यांत सहकाराची आवश्यकता फारच असते.

समाज व सहकार यांबरोबरच आणखी एका गुणाचा विचार करणें आवश्यक आहे. हा गुण म्हणजेच सहिष्णुता. समाज व सहकार यांतच या गुणाचा अंतर्भाव होतो. पण या गुणाचें महत्त्व इतकें आहे कीं, त्याचें स्वतंत्र

अस्तित्व मानलें तरी चालेल. समाजांत क्षणोक्षणीं आपल्या स्वतंत्र व अनिर्बंध प्रवृत्तींना मुरड घालावी लागते. आपल्या इतकाच इतरांनाही जगण्याचा हक्क आहे व त्याकरितां त्यांचेही प्रयत्न चालूच असतात. त्यांना सतत विरोध करून आपलें कार्य तर सुधारणार नाहींच; पण वैय्यक्तिक व पर्यायानें सामाजिक प्रगति मात्र थांबेल.

(आपली समाजव्यवस्था ही जीवनांतील कांहीं मूलगामी मूल्यांवर आधारलेली असते. या मूल्यांना संस्कृत भाषेत "यम" अशी संज्ञा आहे.) हे देशकालातीत असतात व यांचा ऱ्हास म्हणजेच समाजाची अधोगति होय. (अहिंसा, सत्य, अस्तेय, त्याग, शान्ति, दया, क्षमा, धैर्य, शुद्धाचरण, निष्ठा, इत्यादि गुण जर एकाद्या समाजांत मुळींच नसले तर समाज टिकणें शक्यच नाहीं. या गुणांवरच समाजरचना आधारलेली असते. या गुणांची जोपासना व वाढ म्हणजेच समाजाचें स्थैर्य व व्यक्तीची प्रगति. या जोपासनेबरोबरच उपरिनिर्दिष्ट संस्कृतीचीं अंगें व उपांगें यांची वाढ होत जाते.

ही सामाजिक व वैय्यक्तिक प्रगति आधुनिक युगांतील सर्व साधनें जमेस धरूनही आपल्या क्लिष्ट व बहुरूपी समाजांत अत्यंत कष्टसाध्य झालेली आहे. प्राचीन व मध्ययुगीन समाजांतील धागेदोरे, व्यवहार व प्रश्न आजच्या मानानें साधे व सोपे होते. आज लोकसंख्येची विलक्षण वाढ व यांत्रिकयुग या दोन अभूतपूर्व प्रश्नांनीं एवढा अवाढव्य व्याप निर्माण केलेला आहे कीं सर्व पृथ्वीवर त्यांचे पाश आंवळले गेले आहेत. या प्रचंड व जगड्व्याळ गुंतागुंतीमुळें समाजरचना पण तितकीच गहन व क्लिष्ट झालेली आहे. या समाजरचनेचे सर्व धागेदोरे व प्रश्न पूर्णपणें समजल्याखेरीज व्यक्तिविकासाला वावच मिळत नाहीं व कार्याकार्याचा उकल न झाल्यामुळें सामान्य माणसाची अवस्था प्रवाहपतितासारखी होते. या सर्व प्रश्नांचा अभ्यास करूनही सर्व गुंतागुंत समजण्याकरितांच " नागर-नीति-शास्त्र " अभ्यासणें जरूर आहे. आधुनिक युगांतील गगनभेदी प्रश्नांमुळें गांगरून जाऊन प्रवाहांत वाहून जाणें टाळण्याकरितां हे सर्व प्रश्न समजून घेतलेच पाहिजेत. नागर-नीतिशास्त्रांत या सर्व प्रश्नांचा साधकबाधक, सोपपत्तिक शास्त्रीय विचार करण्यांत येतो. या विचित्र कालांतील नानाविध प्रवाह दाखवून, नागरिकांचे प्रश्न, अधिकार व कर्तव्यें यांचें मार्गदर्शन करण्यास या विषयाचा अभ्यास फार उपयोगी

पडतो. समाजांतील सर्व प्रश्न इतके गुंतागुतीचे व संमिश्र झाले आहेत कीं नागर नीति या संज्ञेचा अर्थ बराच व्यापक करणें भागच आहे. निव्वळ शहरांत कसें रहावें याचें ज्ञान म्हणजे नागर नीति नव्हे. समाजांतील महत्त्वाच्या सर्व प्रश्नांचें आकलन झाले पाहिजे.

समाजाशीं व्यक्तीचा अत्यंत घनिष्ठ संबंध असल्यामुळें समाजाबरोबर व्यक्तीचेंही जीवन गुंतागुतीचें झालें आहे व ही गुंतागुंत यशस्वी रीतीनें सोडविण्यावरच व्यक्तीच्या जीवनांतील यशापयश व सुखदुःख हीं अवलंबून असतात. जीवन सुसह्य व सुखकारक करणें हें प्रत्येकाचें पहिलें कर्तव्य होय. यासाठीं प्रत्येकानें आपली संधी, आपलें कर्तव्य व आपले अधिकार यांवर सतत नजर ठेविली पाहिजे. "संधी व समय प्रत्येकाची प्रतीक्षा करीत असतात" असें एका प्रख्यात इंग्रजी ग्रंथकारानें म्हटलें आहे. आपले कर्तव्य व अधिकार यांची ज्याला पूर्ण जाणीव आहे त्याला संधी मिळणारच.

पण अधिकार व कर्तव्य यांची पूर्ण जाणीव होणें ही वाटते तितकी साधी गोष्ट नाहीं. " किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः " असें भगवद्गीतेंत सांगितलेलें आहे. आयुष्यांत असे बिकट प्रसंग येतात कीं, महान् व विद्वान् व्यक्तीचीदेखील कर्तव्याविषयीं दिशाभूल झाल्याचे दाखले इतिहासांत शेंकडों मिळतील. (जीवनांत हजारों पेचप्रसंग निर्माण होतात व प्रत्येक प्रसंग इतरांहून निराळा असतो. त्या प्रत्येकांतून कसें पार पडावें हें कोणत्याही पुस्तकांत सांपडणार नाहीं. एक तर प्रत्येक व्यक्तीचा पेचप्रसंग हा सर्वस्वी दुसऱ्या कुणाच्याही प्रसंगासारखा असणें शक्य नाहीं. त्यामुळें प्रत्येक प्रसंगांत कसें वागावें हें सांगणें मुष्कील होतें. (मात्र प्रत्येक व्यक्तीच्या आयुष्यांत सामान्यतः समान प्रश्न येतात, त्यांवर " पुढच्यास ठेंच मागचा शहाणा " या न्यायानें " वाळवंटावरील पावलें " अत्यंत उपयोगी पडतात.) त्याचप्रमाणे कोणत्याही प्रसंगांतून तरून जाण्याकरितां जे सामान्य गुण अंगीं बाणावे लागतात, त्यांचेंही दिग्दर्शन करतां येणें अनुभवानें शक्य होतें. पण या सर्वांचा उपयोग, पोहण्यास पुस्तकाचा जितपत उपयोग होईल, तितपतच होय. सावधानता, धैर्य, परिश्रम, चिकाटी, शौर्य, इत्यादि भाववाचक नामांची जंत्री पाठ करणें जितकें सोपें, तितकेंच ते अंगीं बिंबविणें अवघड आहे.

यावर उत्तम उपाय म्हणजे सामान्य ज्ञान. ज्याला आपल्या परिस्थितीची पूर्ण कल्पना असते, तो कोणत्याही प्रसंगांत प्रायः गांगरून जाणार नाहीं. आपलें सामर्थ्य, प्रसंग, व परिस्थिति यांची पूर्ण कल्पना असली तर त्यांतून पार पडण्याचा उपाय सुचतो व एक प्रकारचा आत्मविश्वास पण वाटत असतो. याचकरितां आपण ज्या कालांत राहतों त्या कालांतील समाज-रचनेची आपणास पूर्ण ओळख झाली पाहिजे. या समाजाची सामान्य ओळख करून देऊन आपले अधिकार व कर्तव्य यांची जाणीव करून देणारें जें शास्त्र त्यांसच ' नागर नीति ' असें नांव आहे.

## समाज-शास्त्र व सामाजिक शास्त्रें

समाजांत दररोज शेंकडों प्रकारचे प्रश्न उद्भवतात. राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक, नैतिक, असे हरप्रकारचे प्रश्न सोडवावे लागतात. या सर्व प्रश्नांची भूमिका व रोख ही निरनिराळीं असल्यामुळें त्यांचा वेगवेगळा अभ्यास करणें अधिक सोयिस्कर व सोपें पडतें. मात्र हीं सर्व शास्त्रें वेगवेगळीं व अलग आहेत असा याचा अर्थ नव्हे. हे सर्वच प्रश्न सामान्यतः सामाजिक या समान सदराखालीं येत असल्यामुळें त्यांचा अन्योन्य संबंध फार जवळचा असतो. निरनिराळ्या दिशेनें विशिष्ट प्रश्नांचा पद्धतशीर अभ्यास करणाऱ्या या शास्त्रांना सामाजिक शास्त्रें असें म्हणतात.

समाजांतील सर्वच प्रश्न एकमेकांशीं निगडित झालेले असतात, व त्यांचा अभ्यास करणारीं शास्त्रें पण परस्परावलंबी असतात. पण त्यांचा सखोल अभ्यास करावयाचा असल्यास तो अलग अलगच केला पाहिजे. तरच त्यांतील सर्व प्रश्नांचा सविस्तर विचार करतां येईल. सर्वांचा अभ्यास एकदमच करावयाचा म्हटल्यास नुसता गोंधळच निर्माण होईल. (या सर्व सामाजिक शास्त्रांमधून ज्या प्रश्नांचा विचार केला जातो, ते सर्व प्रश्न एका समान धाग्यानें गुंफलेले असतात. हा धागा म्हणजे समाजांतील परस्परसंबंधच होत, व या धाग्याचा म्हणजे या अन्योन्य संबंधांचा विचार व अभ्यास करणाऱ्या शास्त्राला " समाजशास्त्र " असें म्हणतात.) आपल्या व्यावहारिक जीवनांत जीं विविध नातींगोतीं, नाना संबंध, व हरप्रकारचे अन्योन्य ऋणानुबंध निर्माण होतात

व व्यक्तिव्यक्तीमधील व्यवहार, व्यक्ति व संस्था यांचा संघर्ष, तसेंच हीं सर्वच एकत्र येऊन जो समाजसंबंध निर्माण होतो त्या समाजसंबंधाचा अभ्यास करणें हें समाजशास्त्राचें कार्य होय.) या अर्थानें समाजशास्त्र इतर सर्व सामाजिक शास्त्रांहून व्यापक आहे असें म्हणावयास हरकत नाहीं व या शास्त्राचा इतरांशीं संबंधही अगदीं घनिष्ठ असतो. प्रत्येक सामाजिक शास्त्राच्या अभ्यासांतून कांहीं अत्युपयुक्त निष्कर्ष व सिद्धांत निर्माण होतात. या सर्व शास्त्रीय निष्कर्षांचें व सिद्धांतांचें सहाय्य घेऊन समाजशास्त्र आपला स्वतंत्र अभ्यास करते. त्याचप्रमाणें इतर शास्त्रांचेंही स्वतंत्र कार्यक्षेत्र असतेंच.

नागर–नीति–शास्त्र हें अशा सामाजिक शास्त्रांपैकींच एक आहे. मानसशास्त्र, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, इत्यादि शास्त्रें जशीं माणसाच्या अनेकविध व्यवहारांपैकीं एका विशिष्ट व मर्यादित अंगाचाच अभ्यास करितात, तसेंच नागरशास्त्रही व्यक्तीचा व समाजाचा अभ्यास एका विशिष्ट दृष्टिकोनानेंच करितें. हा अभ्यासही एका विशिष्ट पद्धतीनेंच केला जातो. ('व्यक्ति हा समाजाचा एक अवयव किंवा घटक आहे' हाच तो दृष्टिकोन होय.) समाजांतील एक घटक या सामान्य दृष्टीनें सर्वांचा विचार करण्यांत कित्येक गोष्टींचा समावेश होतो. व्यक्ति तितक्या प्रकृति, या न्यायानें प्रत्येक व्यक्तीचा अभ्यास करणें ही अशक्यप्राय गोष्ट आहे. शिवाय व्यक्ति ही अत्यंत चंचलप्रकृति असते. व समाजाशीं तुलना करून पाहतां प्रत्येक व्यक्ति ही क्षणभंगुरच म्हटली पाहिजे. यामुळें व्यक्तीविषयीं सामान्य नियम अगर सिद्धांत बांधणें अशक्य आहे; पण व्यक्तिसमुच्चय हा निरंतर, अखंड व बराचसा स्थिरप्रकृति असल्यामुळें त्याविषयीं कांहीं निश्चित नियम व सिद्धांत सांगतां येतात. साधेंच उदाहरण घ्या. प्रभावी वक्तृत्वाचा किंवा सूचक भाषणाचा एकाद्या व्यक्तीवर कोणता व कितपत परिणाम होईल हें निश्चित सांगतां येणार नाहीं. पण व्यक्तिसमुदायावर त्याचा काय परिणाम होईल याचा नक्की अंदाज बांधतां येतो. याचाच फायदा घेऊन पुष्कळ ठोकेठोक वक्ते लोकांना चिथवून बरींच कार्यें करवून घेतात. व्यक्ति ही समाजाहून अधिक विचारी, समंजस असते. त्यामुळें तिचा विचार कोणत्या पातळीपर्यंत पोंचेल व कोणत्या दिशेनें वाहील, व कोणत्या थरापर्यंत जाईल, याचा अंदाज लागत नाहीं. पण समुदाय हा फारसा विचार करण्याच्या भानगडींत पडत नाहीं.

न्याल त्या दिशेस वाहवेल, व सांगाल तसा वाहवेल, मात्र त्याची नाडी ओळखतां आली पाहिजे. याच अर्थानें रवींद्रनाथ टागोरांनीं एका ठिकाणीं म्हटलेलें आहे, "माणूस दयाशील असतो; पण माणसें क्रूर असतात." व्यक्तीचें मन खोल, तर समुदायाचें मन उथळ असतें. यामुळें व्यक्तीचें मन ओळखणें कठीण पण समुदायाचें मन ओळखणें सोपे असतें, व समुदायाच्या वर्तनावरून किंवा विचारावरून व्यक्तीचे सामान्य वर्तन अगर विचार यांचें अनुमान करतां येतें. याकरितांच सामाजिक शास्त्रें व्यक्तीचा विचार करतांना समाजांतील एक घटक या दृष्टीनेंच करतात.

## शास्त्र

शास्त्र हा शब्द व्यापक व संकुचित अशा दोन्ही अर्थांनें वापरतां येतो. ज्या वेळीं संकुचित अर्थानें हा शब्द वापरला जातो, त्या वेळीं प्रयोग-शाळा, प्रयोग, नानाप्रकारचीं उपकरणें, इत्यादि गोष्टी आपल्या मनासमोर येतात. विज्ञान, रसायन, इत्यादि शास्त्रें या प्रकारचीं होत. यांना प्रयोगप्रधान शास्त्रें असें म्हणतां येईल. ज्या विषयांत प्रत्यक्ष प्रयोग करून प्रमेयें सिद्ध करतां येतात तीं हीं शास्त्रें होत. व्यापक अर्थानें शास्त्राचा अर्थ कोणत्याही विषयाचा तर्कशुद्ध, समतोल व अकलुषित बुद्धीनें केलेला अभ्यास, अशा प्रकारच्या अभ्यासामुळें त्या विषयाचें ज्ञान सखोल व व्यवस्थित होतें. कोणत्याही विषयांतलि महत्त्वाच्या प्रश्नांची व गुंतागुंतीची उकल करून त्यांची सांगोपांग चर्चा करणें व त्यांमधील कार्यकारणभाव दाखवून देणें हें शास्त्राचें मुख्य कार्य होय. या अर्थानें वर उल्लेखिलेल्या सामाजिक अभ्यासाला शास्त्र असें म्हणावयास हरकत नाहीं.

सामान्यतः शास्त्रांचे तीन प्रकार मानण्यांत येतात. सृष्टींतील निर्जीव वस्तूंचा अभ्यास करणारीं तीं वैज्ञानिक. या प्रकारांत विज्ञान, रसायन, इत्यादि शास्त्रें अंतर्भूत होतात. सजीव वस्तूंचा म्हणजे प्राण्यांचा अभ्यास करणारीं तीं जीवशास्त्रें व समाजाचा अभ्यास करणारीं तीं सामाजिक शास्त्रें. वैज्ञानिक शास्त्रांचा वस्तुविषय अचेतन असल्यानें त्यांत गुंतागुंत कमी, व त्या मानानें अर्थातच वस्तुविषय तितका सोपा व निश्चित असतो. म्हणून या शास्त्रांनीं संशोधिलेले नियम व सिद्धांत प्रायः अचूक व निश्चित

असतात. या दृष्टीनें पाहतां जीवशास्त्राचा अभ्यासविषय अधिक गहन व म्हणूनच समजण्यास कठीण व अनिश्चित. यामुळें या शास्त्राचे नियम इतपत निश्चित व अचूक असणें शक्य नाहीं. वस्तुविषय जितका अधिक दुर्गम व अनिश्चित, तितके नियम व सिद्धांत अधिक ठोकळ व अनिश्चित. याचकरितां वैज्ञानिक शास्त्रांचे नियम प्रायः निश्चित व निरपवाद असे मानतां येतील, व सामाजिक शास्त्रांचे नियम प्रायः सापेक्ष, सापवाद व कांहींसे अनिश्चित असणें अपरिहार्य होय. असें म्हणतात कीं, जगांत प्राणी चंचल, प्राण्यांत माणूस चंचल, व माणसांत मन चंचल. सामाजिक शास्त्रांचा अशा चंचल माणसाशीं व त्याहूनही चंचल अशा त्याच्या मनाशीं संबंध येत असल्यानें त्यांचे नियम निरपवाद व निश्चित होऊंच शकत नाहीत. नागर-शास्त्र हेंही एक सामाजिक शास्त्रच असल्यानें वरील सर्व विवेचन त्यासही लागू पडतें. याही शास्त्राचे नियम स्थितिसापेक्ष, सापवाद व कांहींसे अनिश्चित असतात.

## वस्तुनिष्ठ व आदर्शनिष्ठ शास्त्रें

शास्त्रांचे आणखी एका प्रकारानें दोन विभाग कल्पितां येतातः वस्तुनिष्ठ शास्त्रें, व आदर्शनिष्ठ शास्त्रें. वस्तुनिष्ठ शास्त्रें आपला विषय हाताळतांना " काय करावें, " " कसें करावें किंवा असावें," किंवा, " आदर्श कोणता असावा " या दृष्टीनें विचार न करतां, " काय आहे " व " कसें आहे, " किंवा " अमूक झालें, तर तमूक होईल " या वास्तव दृष्टीनें अभ्यास करतात. उदाहरणार्थ रसायनशास्त्रांत ' प्राणवायु कसा असावा ' असा प्रश्न उद्भवतच नाहीं. प्राणवायु म्हणजे काय, तो कसा असतो, किंवा त्याचे गुणधर्म कोणते व कांहीं ठराविक परिस्थितींत त्याचा इतर वायूंशीं किंवा मूलतत्त्वांशीं संयोग झाला तर अमूक निश्चित गोष्टी घडतात, असा विचारच करण्यांत येतो. या उलट आदर्शनिष्ठ शास्त्रें आपल्यासमोर एक आदर्श ठेवून त्याप्रमाणें झालें पाहिजे असें प्रतिपादन करतात. तर्कशास्त्राचेंच उदाहरण पहा. हें शास्त्र तर्कशुद्ध विचार कसा असावा व आदर्श तर्कशुद्ध विचार कसा असतो, याचा अभ्यास करतें. साधेंच उदाहरण घ्यावयाचें तर दादोबा पांडुरंग तर्खड-करांच्या व्याकरणांतील पहिलेंच वाक्य वाचून पहा. " शुद्ध कसें बोलावें, व शुद्ध कसें लिहावें, हें व्याकरण शिकल्यानें समजतें. " व्याकरण हेंदेखील एक आदर्शनिष्ठ शास्त्र आहे.

या दृष्टीनें नागरशास्त्राचा विचार केला तर असें म्हणतां येईल कीं, या दोन्ही प्रकारचा दृष्टिकोन नागरशास्त्रांत आढळतो. नागरिक कसा आहे व कसा असावा, किंवा समाज कसा आहे व कसा असावा, या दोन्ही दृष्टीनें हे शास्त्र आपल्या विषयाचा अभ्यास करतें. समाज सांप्रत कसा आहे हें दाखवून, तो कसा आदर्श झाला पाहिजे याची शास्त्रीय चर्चा या शास्त्रांत केली जाते. नागर संस्था, व परंपरागत चालीरीती यांच्या गुणदोषांची चर्चा म्हणजेच गुणांचें ग्रहण व दोषांचें निष्कासन असा निष्कर्ष निघतो. समाजांतलि कित्येक संस्था, परंपरा व चालीरीती या हजारो वर्षांपासून चालत आलेल्या असतात. उदाहरणार्थ, विवाह, कुटुंब किंवा जाती या संस्था व परंपरा मानवेतिहासांत फार प्राचीन काळीं सुरू झाल्या. त्यांच्याविषयीं कोणताही निकाल देतांना सर्व साधकबाधक गोष्टी विचारांत घेतल्या पाहिजेत. अशा प्रकारें सर्व माहिती संपूर्णपणें गोळा करून, समतोल व निःपक्षपाती मनानें पूर्ण विचारानंतर आदर्श किंवा ठरविणें ही नागरशास्त्राची अभ्यास करण्याची पद्धति होय.

## नागरशास्त्राच्या अभ्यासाची आवश्यकता

हिंदुस्थानांतलें कोणतेंही शहर किंवा खेडें थोड्याशा बारकाईनें पहा. आपला भव्य इतिहास, उज्ज्वल संस्कृति, यांना शोभण्याजोग्या किती गोष्टी आढळतात याचा जर आढावा घेतला, तर शेंकडा नव्वद गोष्टी त्या संस्कृतीवर आपणास हक्क सांगूं देणार नाहीत. आपण आपली उज्ज्वल संस्कृति विसरून राहिलों आहोंत. ज्या संस्कृतीनें शुद्धि आणि स्वच्छता यांना उच्चतम स्थान देऊन नेहमींच त्यांचा गौरव केला त्या संस्कृतीचें अवशिष्ट लक्षणही आपणांस आपल्यां शहरांत व खेड्यांत दृष्टीस पडत नाहीं. ज्या संस्कृतीचा आम्ही अभिमान धरतों त्या संस्कृतीचीं मूलतत्त्वेंही आपण पाळीत नाहीं.

निर्मलता या शब्दालाच पावित्र्य असा अर्थ आपल्या संस्कृतीनें मान्य केला आहे. अंतःकरणांतील स्वच्छतेइतकेंच महत्त्व शरीराच्या व घरादाराच्या स्वच्छतेला आहे. आपल्या शरीराचा व परिस्थितीचा ठसा आपल्या अंतःकरणावर उमटल्याविना राहणार नाहीं. अर्थात् प्रत्येक माणसाला आपण सुंदर, स्वच्छ व निर्मळ घरांत व शहरांत रहावें अशी इच्छा असतेच हें

सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. पण आवड व इच्छा यांच्या जोडीला कृतीची आवश्यकता असते, व अशा कृतीला श्रम व प्रयत्न यांची जोड अपरिहार्य असते. येथेंच घोडें पेंड खातें. नुसत्या इच्छा व आवडी यांचा कांहींच उपयोग नाहीं. इतकेंच काय पण एकादें शहर किंवा खेडें स्वच्छ राखणें हें एकाद्याच व्यक्तीला करतां येणें शक्य नाहीं. यासाठीं सामुदायिक सहकार्य हवेंच; व त्याबरोबर योग्य मार्गदर्शनही पाहिजे. सामाजिक कार्य करण्यांत मुरलेल्या मार्गदर्शकाची याकरितां फार आवश्यकता आहे. असे सामाजिक कार्यकर्ते तयार करून सामान्य जनतेलाही सहकारादि उपयुक्त गोष्टींची महती पटवून देण्याचे कार्य नागरशास्त्राच्या मदतीनें सुकर होतें.

हिंदी लोकांचा निष्काळजीपणा व बेशिस्त यांबद्दल फारसा मतभेद होण्याला जागा नाहीं. हा दुर्गुण हिंदी संस्कृतीच्या इतिहासांतील शेवटच्या काल-खंडांत प्रादुर्भूत झाला. या कालखंडांतलि अवनतीचीं जीं कारणे आहेत तींच या दुर्गुणाचींही कारणें होत. कारणें कोणतींही व कशामुळेंही उत्पन्न झालेलीं असोत, पण वस्तुस्थिति मात्र असमाधानकारक आहे हें खरें. रस्त्यावर हवी ती घाण टाकणें; नगरपालिकेचे नियम झुगारून देऊन केर-कचरा, उष्ट्या पत्रावळींचा ढीग, व कुसके, नासके पदार्थ पेटींत अगर डब्यांत न टाकतां सर्वत्र भिरकावून देणें; स्वतःच्या घराभोंवतालचीदेखील स्वच्छता न राखणें; या गोष्टी प्रत्येकाच्या परिचयाच्या आहेत. प्रत्येकानें थोडीशी शिस्त व काळजी राखली तरी यांपैकीं बहुतेक किळसवाणे प्रकार बंद पडतील. पान खाऊन रस्त्यावर थुंकण्याऐवजीं थोडीशी तसदी घेऊन मोरींत तोंड साफ केलें तर कितीतरी स्वच्छता पाळतां येईल. धुण्याचें व खरकट्याचें पाणी खिडकींतून भिरकावून पादचारी लोकांना सचैल स्नान घालण्याऐवजीं मोरींत किंवा त्यासाठी तयार केलेल्या जागेंत ओतून साफ करण्यास फारसे अधिक प्रयास पडतील असें वाटत नाहीं. वरच्या मजल्यावर राहणारे लोक तर पादचाऱ्यांचे शत्रूच; खरकट्या घाण पाण्यानें किंवा थुंकीनें केव्हां पवित्र करतील याचा नेम नाही. विशेषतः अरुंद बोळांत तर बोलावयासच नको. तेथें काय अनुभवावें लागेल व काय दृष्टीस पडेल, हें सांगतांच यावयाचें नाही. विशेषतः सार्वजनिक जागा तर सर्वांच्या असतात हें जितकें खरें, तितकेंच त्या कुणाही विशिष्ट व्यक्तीच्या नसतात हेंही खरें. याचकरितां प्रत्येकानें त्यांचा

व्यवस्थित उपयोग केला तर त्या जितक्या सुखावह ठरतात, तितक्याच दुरुपयोगानें हानिकारक होतात. थुंकण्याची वाईट खोड सरसकट सर्व ठिकाणीं आढळते. निष्काळजीपणानें कागदाचे कपटे अगर इतर घाण कुठेंही टाकणें, किंवा थुंकणें अगर नाक शिंकरणें या संवयी वाईट होत याची कल्पनाच कित्येकांना नसते. रस्त्यावर, मोटारींत, आगगाडींत, स्टेशनावर किंवा कोणत्याही सार्वजनिक ठिकाणीं निर्विकार मुद्रेनें घाण करणारे लोक नित्य आढळतात. यांपैकीं पुष्कळांना या संवयी घाणेरड्या, घातुक, व किळसवाण्या आहेत हीं जाणीवच नसते. विशेषत: नाटकगृह व चित्रपटालयांत या गोष्टी बिनचूक पहावयास मिळतात. विड्या, सिगारेट, यांचीं थोटकें, शेंगाचीं फोलपटें, कागदांचे कपटे व पानांच्या पिचकाऱ्या, यांनींच थिएटर चिक्कार भरलेलें असतें. " थुंकूं नये " अगर " सिगारेट व विडी ओढण्याची सक्त मनाई आहे " अशा पाट्यांना कांहीं अर्थ असतो असें लोकांना मुळींच वाटत नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं तर " मे. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट साहेबांच्या हुकुमाची " धमकीही अशीच वायां जाते. कित्येकांना या सूचना वाचतांच येत नाहींत, कित्येकांना त्यांचा अर्थ लक्षांत घेण्याची गरज वाटत नाही, तर कित्येकांना त्या खरोखरच पाळण्याकरतां असतात, याची जाणीवच नसते. जाहिरातीच्या पाट्यांसारख्याच या कायमच्या पाट्या. यांतील पुष्कळसे दोष अज्ञानामुळें उद्भवतात. या गोष्टी दूषणीय आहेत ही जाणीव पुष्कळांना असतच नाहीं. या दोषांची जाणीव त्यांना वारंवार करून दिली पाहिजे. आपल्या नेहमींच्या वागण्यांतदेखील बेशिस्त व अनियमितपणा हीं दिसून येतात. प्रत्येक गोष्ट नियमितपणें वेळच्यावेळीं करण्याची संवय अवश्यमेव लावून घेतली पाहिजे. या संवयीमुळे आपलें व इतरांचेंही कितीतरी नुकसान वांचतें. नियमितपणा हा एक फार मोठा व महत्त्वाचा गुण आहे.

हे विविध गुण केवळ आदर्शवत् असून व्यवहारांत उतरणें अशक्य असें मानण्याचें कारण नाहीं. कांहीं राष्ट्रांनीं हे गुण इतके आत्मसात् केलेले आहेत कीं, ते त्यांचे राष्ट्रीय गुण या नांवानें ओळखिले जातात. विशेषत: जर्मनीविषयीं लिहितांना त्या देशाचे कट्टे शत्रूदेखील त्यांचे हे गुण अत्यादरानें वाखाणतात ! जर्मनीचें कोणतेंही प्रवासवर्णन या गुणांच्या वर्णनानें भरलेलें

आढळेल. जर्मनांचा प्रामाणिकपणा व स्वच्छता यांविषयीं लिहितांना एका लेखकानें पुढीलप्रमाणें माहिती दिलेली आहे:

" प्रस्तुत लेखकानें जर्मनींत बऱ्याच वेळां लांब लांब प्रवास केले आहेत. या सर्व प्रवासांत त्यानें अनेक प्रकारच्या विलासस्थानांत–अगदीं दरिद्री व अति श्रीमंत अशा–वास केला आहे. पण मला एकदांही एकादी घाणेरडी खोली, अगर निष्काळजी, बेमुर्वतखोर व फसवी वागणूक दृष्टीस पडलेली नाही. फक्त एकदांच मात्र एका साधारण खोलीत वास करावा लागला. पण तीदेखील फ्रान्स इत्यादि देशांतील नेहमीं आढळणाऱ्या खोल्यांहून चांगलीच होती यांत शंका नाहीं. फक्त जर्मनींत नेहमींच आढळणाऱ्या खोल्यांहून कांहींशी कमी स्वच्छ होती, इतकेंच.

" जर्मन लोकाच्या प्रामाणिकपणाविषयीं तर प्रस्तुत लेखकाला नितांत आदर आहे. बाजारांत एकाद्या दुकानदारानें कोणत्याही वस्तूची किंमत सांगितली, तर त्याबद्दल संशय मानण्याचें मुळींच कारण नाहीं. जर्मन व्यापारी खोटी किंमत कधींही सांगणार नाहीं, याबद्दल अगदीं निर्धास्त रहावें. जर्मनांचें वर्तन तर इतकें सौजन्यपूर्ण असतें कीं, त्याला इतरत्र तोडच मिळणार नाहीं. मला एकदां एका जर्मन पथिकाश्रमांत जर्मनांच्या प्रामाणिकपणाचें उत्तम उदाहरण पहावयास मिळालें. जर्मन निवासस्थानांत सेवकांना मिळावयाची बक्षिशी धरूनच पैसे आकारण्यांत येतात. त्यामुळें तेथील सेवक कधींही बक्षिशीची अपेक्षा करीत नाहींत व दिली तरी नाकारतात. एकदां एक बडा श्रीमान् अमेरिकन् गृहस्थ मी उतरलेल्याच पथिकाश्रमांत आला होता. तेथील एकंदर वातावरणानें व व्यवस्थेनें स्वारी अगदीं खूष होऊन गेली. जातांना अमेरिकन् रिवाजाप्रमाणें त्यानें थाळींत सेविकेला बक्षिशी म्हणून जादा पैसे ठेविले. नेहमींप्रमाणें सेविकेनें ते नाकारले. त्यानंतर अगदीं वादच सुरू झाला. अमेरिकन् गृहस्थ पैसे परत घेईना व ती सेविकाही ते स्वीकारीना. दोघांचा चांगलाच वाद जुंपला. प्रकरण रंगत आलेलें पाहून मालकानें मध्यस्थी करून कशीतरी त्या गृहस्थाची समजूत घातली. "*

* "Germany in £10" या पुस्तकातून.

अशा राष्ट्रांतील लोकांविषयीं व त्यांच्या जीवनाविषयीं कितीही लिहिलें तरी तें अपुरेंच म्हणावें लागेल. बर्लिन शहरांतील स्वच्छता व टापटीप तर अद्भुत प्रकारांतच गणावी लागेल असें कित्येक जण सांगतात. अनंत काणेकरांच्या "धुक्यांतून लाल ताऱ्याकडे" या पुस्तकांतील जर्मनीचें वर्णन वाचलें तरी याची कल्पना येईल. व्यवस्थितपणा, शिस्त, टापटीप, स्वच्छता, नियमितपणा, सौजन्य, इत्यादि गुणांनीं हे लोक आदर्शवत् झाले आहेत. जर्मनांच्या नियमितपणाबद्दल असें सांगतात कीं, बर्लिन मेल एकदां १७ सेकंद उशीरा आली तर ती बातमी दुसऱ्या दिवशीं सर्व वर्तमानपत्रांत छापलेली होती. आपल्याकडे १७ तास उशीर झाला तरी लोकांना त्याचें फारसें कौतुक वाटत नाहीं. "रोज मरे त्याला कोण रडे ?"

अशा सद्गुणांमुळें व सततोद्योगामुळेंच जर्मनी देश लढाई हरला तरी नेस्तनाबूद न होतां, "कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें" या रीतीनें उफाळून उठतो.

या सर्व सद्गुणांच्या मागें एक प्रचंड तपस्या उभी आहे. या तपस्येचा साद्यंत इतिहास अतिविस्तृत व अतिमनोरंजक आहे. पण इतका विस्तृत इतिहास समजावून घेणें हे फार मोठें कार्य आहे. त्याकरितां सामान्य माणसालाही सुलभ होईल इतपत इतिहास सांगून या विषयाची माहिती घेण्याकरितां नागरशास्त्राचा अभ्यास करणें अवश्य आहे.

प्रकरण दुसरें

# व्यक्ति आणि समाज

## समाजाचें महत्त्व

माणसाची आजपर्यंतची सर्व कमाई म्हणजेच त्याची संस्कृति होय. संस्कृति आणि मानव हीं अविभाज्य आहेत. कारण संस्कृति म्हणजे मानवी संपादनच होय. संस्कृतिहीन नराला मानवप्राणी हें अभिधान देण्याचें मुळींच कारण नाहीं. केवळ शारीरिक वैशिष्ट्यावर माणसाचें मानवत्व अवलंबून नसून, त्याची इतर संपदाही प्रामुख्यानें महत्त्वाची आहे. ही संपदा म्हणजेच संस्कृति. या संपदेची वाढ मानवी सामर्थ्यावर व उद्योगावर अवलंबून असते. तीमुळेंच माणसाला मानवत्व प्राप्त झालें आहे.

संस्कृतीचा व समाजाचा संबंध अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. समाजांतच संस्कृतीची वाढ व प्रगति होऊं शकते. एकांतिक व विविक्त व्यक्ति केवढीही समर्थ असली तरी तिला समाजाबाहेर संस्कृति घडवून आणतां येणार नाहीं. ती स्वभावतःच सामाजिक निर्मिति आहे. तिच्या प्रमुख अंगांचें परीक्षण केल्यास तीं कशीं समाजसापेक्ष आहेत हें दिसेल. संस्कृतीचीं प्रमुख अंगें भाषा, नीतिनियम, धर्म, तांत्रिक व आर्थिक व्यवहार, कलाविलास, शिक्षण, शासनव्यवस्था, तत्त्वज्ञान, शास्त्रें, इत्यादि होत. या सर्वांचें परीक्षण केल्यास समाजाव्यतिरिक्त त्यांची वाढ होणें शक्य नाहीं हें दिसून

येईल.) भाषेचेंच उदाहरण घेऊन पाहूं. आपले विचार इतरांस सांगण्याचें साधन म्हणजेच भाषा. हे " इतर " म्हणजे समाजच नव्हे का ? ज्या ठिकाणीं हे " इतर " नाहींत, त्या ठिकाणीं भाषेची आवश्यकताच नाहीं. समाजांत निर-निराळ्या व्यक्तींचा संबंध येतो, म्हणूनच आपल्या विचारांची देवाण-घेवाण होते, भाषेची सुरुवात व वाढ होते, विचारही वाढत जातात व परिपक्व होतात. विविक्त माणसाला यांपैकीं कशाचीच गरज नसते व त्याची भाषा व विचार अगदींच प्राथमिक अवस्थेंत राहतात. या ठिकाणीं विविक्त माणूस म्हणजे अगदीं जन्मापासून समाजाशीं ज्याचा संबंध आलेला नाहीं असा माणूस होय. ' रॉबिन्सन् क्रूसो ' सारख्या इसमाचें उदाहरण वेगळें असतें. समाजांत वाढलेला एकादा माणूस कांहीं कारणानें विविक्त झाल्यास त्याची भाषा त्याच्या आत्मगत भाषणानेंही टिकते व वाढते. त्याला आपल्या भाषेंतच विचार करण्याची संवय असते. त्यामुळे तो जरी समाजापासून दुरावला तरी त्याचा समाजनिष्ठ स्वभाव सहसा बदलणार नाहीं. सामाजिक संवयी फार बळकट असतात. म्हणूनच अशा माणसाचें उदाहरण " विविक्त " या संज्ञेंत येत नाहीं. यावरून भाषेचा समाजाशीं किती घनिष्ठ संबंध आहे हें दिसून येईल. याप्रमाणेंच इतर सर्व अंगांविषयींदेखील असेंच समाजाचें अपरिहार्यत्व दाखवितां येईल. समाजाच्या कक्षेबाहेर यांची उत्पत्ति व प्रगति होणें शक्य नाहीं. संस्कृति ही अशा प्रकारें समाजनिर्मित आहे असें म्हणतां येईल.]

एकूण, समाज ही एक महान् शक्ति आहे. तिचे व्याप अनंत आहेत व या व्यापांतूनच व्यक्तीच्या व्यक्तिमत्वाची व समाजाच्या संस्कृतीची वाढ होते. समाजानें आपल्यावर केवढे उपकार केलेले आहेत याची गणती करतांच यावयाची नाहीं. कांहीं कांहीं वेळां समाजावर आपण खूप चिडतों व त्याला दोष देतों. समाजांतील पुष्कळ रूढी व नियम जाचक व अन्यायी असतात हें खरें; पण असें असूनही आपण समाजाबाहेर जाऊं इच्छित नाहीं. फार तर एका समाजाचा किंवा समाजविभागाचा त्याग करून आपण दुसऱ्या समाजांत किंवा समाजविभागांत जाऊं. पण समाजाचा सर्वस्वीं त्याग म्हणजे मानवी जीवनाचा त्यागच म्हटला पाहिजे. संन्यासाश्रमांतील तपस्वी हा मार्ग स्वीकारतात. पण 'संन्यास' म्हणजे संपूर्ण विरक्ति, मानवी जीवनाचा त्यागच

होय. संन्यासाश्रमाचें ध्येयच मुळीं वैराग्य; संसाराशीं कोणताही संबंध उरूं द्यावयाचा नाहीं. सामान्य माणसाला समाजाचा त्याग करून आपलें हित साधतां यावयाचें नाहीं. आपल्या जीवनांतील सर्व अधिभौतिक प्रगति समाजावर अवलंबून आहे. याचकरितां समाजाच्या उन्नतीकरितां झटणें व समाजाशीं एकनिष्ठ राहणें हें प्रत्येक व्यक्तीचें पवित्र कर्तव्य होय.

समाज जरी इतका उपयुक्त व अपरिहार्य असला तरी तो नेहमींच हित-कारक, प्रगतिपर व गतिमान् असेलच असें नाहीं. कालाप्रमाणें समाज बद-लावा हें खरें, व तसा तो बदलत असतो हेंही खरें; पण असा इष्ट बदल आप-सुकच होईल असें नाहीं, व हा विकारवेग योग्य प्रमाणांत असेल असेंहि सांगतां यावयाचें नाहीं. या उलट असें म्हणतां येईल कीं समाजाची घडी बदलण्यास बरेच प्रयास पडतात; पण प्रयासामुळें का होईना, पण वेगवेगळ्या काळीं समाजाचीं निरनिराळीं रूपें असतात, व देश-काल-परिस्थितीप्रमाणें हें स्वरूप वेगळें असतें.

सामान्यतः समाज हा रूढिप्रिय व विकारपराङ्मुख असतो, किंवा असें म्हणतां येईल कीं एकदां बसलेली घडी विसकटण्यास तो मन्दोत्सुक असतो. वारंवार बदल झालेला त्याला फारसा मानवत नाहीं. कोणत्याही विवक्षित काळीं प्रत्येक समाजांत दोन प्रकारचे विचारप्रवाह चालू असतात: एक विकारप्रतिकूल व दुसरा विकारानुकूल. कोणत्याही समजांतील माणसांचे दोन वर्ग पडतात: एक संतुष्ट, व दुसरा असंतुष्ट; एक अधिकारयुक्त, तर दुसरा अधिकारहीन. या दोन वर्गांत नेहमीं द्वंद्व चालू असतें. ( अद्याप संपूर्णतया संतुष्ट व वर्गहीन समाज निर्माण होण्याचीं कांहीं लक्षणें दिसत नाहींत.) अशा वर्गांतील संतुष्ट व अधिकारयुक्त वर्ग आपला संतोष व अधिकार यांविषयीं फार सावध असतो व समाजांत कोणताही फरक झाल्यास आपल्या या सुखी स्थितीस बाध येईल अशी त्यास नेहमीं भीति वाटत असते. त्यामुळें तो विकारपराङ्मुख किंवा विकारविरोधी असतो; तर उलट असंतुष्ट व अधि-कारहीन वर्ग आपली स्थिति सुधारण्याकरितां समाजांत बदल करण्यासाठीं धडपडत असतो, अर्थातच तो विकारानुकूल असतो. पहिला वर्ग सामान्यतः कोणत्याही विकारास विरोध करतो, तर दुसरा त्यास उचलून धरतो. पहिल्यास

तत्कालिन सामाजिक रचना पसंत असते, तर दुसऱ्यास ती नापसंत असते. या दोहोंच्या विरोधांतूनच समाजाचा विकास होत जातो. कोणत्याही एकाच पक्षाचा नेहमीं विजय होत राहिल्यास, समाज निर्जीव तरी होतो किंवा विसकटून तरी जातो. विकारविरोधी पक्षाचाच नेहमीं विजय होत राहिल्यास समाज काल-प्रवाहाच्या मागें राहील, व समाज-घटकाच्या अनुरोधानें समाज-घटनेंत जो स्वभावतःच फरक व्हावयास हवा, किंवा झालाच पाहिजे तो रोकला जाईल, व त्यामुळें समाजरचना विकृत होईल, समाजाचा ऱ्हास होईल, व समाज मृतवत् होईल. याविरुद्ध विकारानुकूल पक्षाचाच सदैव विजय होत गेल्यास समाज प्रत्येक क्षणी बदलूं लागेल, व समाजधारणेला आधारभूत अशीं चिरन्तन तत्वें नाश पावतील, व समाज चौखूर उधळूं लागेल, व समाजाचा गाडा कुठे आदळेल हे सांगतां येणार नाही. म्हणून या अनुकूल व प्रतिकूल पक्षांचा ज्या समाजांत योग्य समन्वय होत राहतो तेथें दोन्हीही विचार-प्रवाह परस्परमारक न होतां परस्परपूरक होतात व समाजाचा समतोल विकास होत जातो.

(समाज हा कांही विशिष्ट मूलभूत तत्त्वांवर आधारलेला असतो.) या तत्त्वांची जोपासना जोंपर्यंत समाज-घटक करीत असतात, तोंपर्यंत तो अस्खलित चालत राहतो व त्याची आणि त्यासह व्यक्तीचीही प्रगति चालू असते. हीं शाश्वत तत्त्वें मागील प्रकरणात सांगितलेलींच आहेत. (कोणताही समाज हिंसा, क्रौर्य, चोरी, असत्य, यांवर आधारता येणार नाहीं व त्याची प्रगति होणार नाहीं. या दुर्गुणांमुळें कदाचित तात्कालिक विजय मिळविता येईल; पण सर्व समाजरचनाच त्यावर आधारणें ही निसर्गतःच अशक्य गोष्ट आहे

वरील विवेचनावरून समाजाचें कार्य व महत्त्व हीं दिसून येतील. मानवी जीवनांत समाजामुळेंच क्रान्ति घडून येते. समाजामुळेंच माणूस " माणूस " होतो हें खरेंच; पण या विधानावरून कांहीं प्रश्न सहजच उत्पन्न होतात. संस्कृतीचा उगम व तिची वाढ हीं जर समाजामुळें होतात असें गृहीत धरलें, तर संस्कृतिनिर्मितींत व्यक्तीचा कांहींच वांटा नाहीं कीं काय ? समाज श्रेष्ठ का व्यक्ति श्रेष्ठ ? व्यक्तीवर समाजाचें वर्चस्व कितपत असावें व व्यक्तीनें तें कोणत्या मर्यादेपर्यंत मान्य करावें ?

या प्रश्नाचा थोडासा खोलवर विचार केल्यास आढळून येईल, कीं हे प्रश्न व्यक्ति व समाज यांच्या विरोधावर भर देतात; व्यक्ति व समाज हे जणूं दोन शत्रूच, असे मानतात. खरें पाहिलें असतां असा विरोध अपरिहार्य आहे असें कुठेंच दिसत नाहीं. उलट हीं दोनही एकाच गोष्टीचीं परस्परपूरक अंगे असून एकावांचून दुसरें दुबळें ठरतें. एकाद्या व्यक्तीची समाज हेळसांड करीत असेल हें शक्य आहे; /पण व्यक्तिसमूह म्हणजेच समाज ना ? मग त्यांतील सर्व व्यक्ती जर अन्यायविद्ध झाल्या तर समाज कमकुवत होईलच, शिवाय तो राहणारच नाहीं. व्यक्तींची उन्नति म्हणजेच त्याची उन्नति. म्हणून त्यानें अधिकांत अधिक व्यक्तींची काळजी घेणें आवश्यक आहे. समाज कांहीं एकादी स्वयंपूर्ण व स्वयंप्रेरित अशी शक्ति नाही. अनेक व्यक्तींची कर्तृत्वशक्ति एकवटून त्याची निर्मिति होते; व प्रत्येक व्यक्तीनें आपलें कार्य व कर्तृत्व त्याला समर्पण केल्यानेच त्याची प्रगति होते. संस्कृतीच्या सर्व अंगोपांगांना वळण देऊन त्यांचें संवर्धन करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य होय व ही कर्तव्यपूर्ति म्हणजेच समाजोन्नति. समाजाच्या प्रगतीला एकंदर समाज जितका कारणीभूत होतो, तितकीच व्यक्ति पण असते. या दृष्टीनें व्यक्तीचें महत्त्व समाजाइतकेंच मानलें पाहिजे हें उघड होतें. इतिहासावरून आपल्याला असें दिसून येते कीं, कांहीं व्यक्तींनीं आपल्या निव्वळ वैय्यक्तिक सामर्थ्यानें समाजहितार्थ एवढें प्रचंड कार्य केलेलें आहे कीं, तें सर्व जनसमूहाला कधींच शक्य होणार नाहीं. इतकेंच काय, पण असेंही म्हणतां येईल कीं, लोकोत्तर कार्य करून ज्ञानांत भर टाकण्याच्या कामीं सामान्य समाजाचा विशेष उपयोग नसून, तें एकाद्या लोकोत्तर व्यक्तीच्या प्रयत्नानेंच साध्य होईल. भाषेची वाढ, शास्त्रीय शोध, तात्त्विक विचार, नीतिनियम, कलाविकास, हीं कार्यें समाजांतील बुद्धिमान् व विद्वान् व्यक्तींनींच केली पाहिजेत व आजपर्यंत केलीं आहेत. या प्रचंड कार्याचें अधिकांश श्रेय व्यक्तीलाच दिलें पाहिजे.

यावरून असें दिसून येईल कीं, समाज व व्यक्ति यांमध्यें विरोध असतो असें मानण्याचें कारण नाहीं. पण त्याबरोबरच हेंही खरें कीं, प्रसंगोपात् हा विरोध अपरिहार्य होतो. तर्कशुद्ध विचारानें व कृतीनें ज्ञान संपादन करण्याचा अधिकार समाजाइतकाच व्यक्तीला पण आहे. या मार्गात व्यत्यय

आणणें हें समाजाइतकेंच व्यक्तीला पण दूषणास्पद होय. अशा व्यत्ययाला न जुमानतां आपलें कार्य अविरत चालू ठेवणें हे समाजाइतकेंच व्यक्तीचेंही कर्तव्य होय. व्यक्तीवर समाजानें व समाजावर व्यक्तीनें केलेले उपकार आपण पाहिले. त्याचप्रमाणें समाजानें व्यक्तीवर व व्यक्तीनें समाजावर केलेले अन्याय व अत्याचार इतिहासांत जागोजाग विखुरलेले आहेत. समाज व व्यक्ति यांची तुलना केली तर, व्यक्ति ही अत्यंत क्षुल्लक व निर्बल वाटते. "कुठें समाजाची प्रचंड शक्ति तर कुठें व्यक्तीचा अणुतुल्य पराक्रम" असें वाटणें साहजिकच होय. या विधानांत पुष्कळसें सत्यही आहे. समाजाविरुद्ध व्यक्तीचा टिकाव लागणें अशक्यच होय. पण या विधानांतलें सत्य अपूर्ण आहे. व्यक्तीविरुद्ध समाजानें जितका अन्याय केला आहे तितकाच अन्याय व्यक्तीनेंही समाजाविरुद्ध केलेला आहे हें सिद्ध करून देतां येईल. इतिहासांत व्यक्तीनें समाजाविरुद्ध केलेले अन्याय शेकड्यांनीं मोजतां येतील. म्हणजे समाजच अन्यायी व व्यक्ति मात्र निरपराधी, असें मानण्याचें कारण नाही. समाजच नेहमीं व्यक्तीवर वर्चस्व चालवितो व व्यक्ति समाजापुढें अगदीं हतबल असते असेंही नाही. तसें असतें तर सर्व इतिहासांत सर्व ठिकाणीं समाजराज्येंच दिसून आलीं असतीं. पण इतिहासांतील दाखले बरेचसे याविरुद्ध आहेत. समाजराज्याचा अद्याप कुठेंच पत्ता नाहीं. अगदी सांप्रतचीं लोकतंत्री राज्येंदेखील वस्तुतः कांहीं व्यक्तींनींच चालविलेलीं असतात. "बहूनामप्यसाराणां समवायो हि दुर्जयः" हें खरें; पण केव्हां? हातघाईचा प्रश्न असेल तर. त्या वेळीं समुदायाचा व्यक्तीविरुद्ध सहजच जय होईल हें कोणीही मान्य करील. पण बुद्धिचातुर्याच्या सामर्थ्यावर समाजाला जिंकणें व त्याची दिशाभूल करून त्याला आपल्या ताब्यांत ठेवणें हें चतुर माणसाला सहज शक्य आहे. प्रायः सर्व समाज साध्याभोळ्या माणसांनींच बनलेला असतो. त्यामुळें त्यांना मार्गदर्शनार्थ आपल्या समाजांतील बोटावर मोजण्याइतक्या चतुर व अष्टावधानी पुढाऱ्यावर विसंबून राहवेंच लागतें व त्यामुळें अशा कांहीं व्यक्तींच्या अधिकाराखालीं समाज येतो. शिवाय समाजाची शक्ति संघटित व एकवटलेली असेल तरच तिचा प्रभाव व उपयोग. पण बहुधा कोणताही समाज विस्कळित, अव्यवस्थित, व पक्षोपपक्षांनीं विभागलेलाच असल्यामुळें, "फोडा व झोडा" या न्यायानें, अर्थात् भेदनीतीनें, व्यक्तीविरुद्ध व्यक्ति, संस्थे-

विरुद्ध संस्था, किंवा पक्षाविरुद्ध पक्ष, असे सामने लावून, अगर समाजाच्या असंघटित असहाय्यतेचा फायदा घेऊन कांहीं सुसंघटित लोकांना समाजावर सत्ता गाजवितां येते. अशा सत्तेचें वैशिष्ट्य जरी तिचें संघटित सामर्थ्य हें असलें तरी कोणताही समाज तिचा अन्याय फार काळ चालूं देणार नाहीं हें खरें; पण ही जाणीव समाजांत उत्पन्न होण्याला एक तर अन्याय अतितीव्र व असह्य झाला पाहिजे. सामान्यत: एक राजा प्रचंड व प्रतापी प्रजेवर अधिकार गाजवूं शकतो. लाखों गुलामांना हवे तसे राबवून घेऊन त्यांच्याकडून जनावरासारखे काम करवून घेणारे राजे इतिहासांत अनेक होऊन गेले. जगाच्या इतिहासांतील अन्यायी राजांची गणती करावयाची तर एक प्रचंड इतिहासच तयार होईल. अशा प्रकारचे अन्याय सामर्थ्यशाली समाजानें कां सहन करावे या प्रश्नाचें उत्तर फारसें कठीण नाहीं. समाजांतील सामान्य माणसांचा भोळेपणा व अज्ञान, समाजाचें विस्कळित व विभक्त स्वरूप, सामान्य जनांची दिशाभूल करणारे नियम, रीतिरिवाज, कायदे व अंधश्रद्धा, यांच्या बाजूस व्यक्तीची बुद्धिमत्ता व चातुर्य, संघटना बनविण्याचें सामर्थ्य व अलौकिक गुणधर्म; या वस्तुस्थितीमुळें व्यक्ति ही समाजावर अधिकार गाजवूं शकते व अन्याय करूं शकते.

हें सर्व खरें असलें तरी ही वस्तुस्थितीची एक बाजू झाली. व्यक्तीच्या समाजावरील अन्यायापेक्षां समाजावरील उपकाराची बाजू अधिक उज्ज्वल आहे. वरील विवेचन, व्यक्तिदेखील समाजाइतकीच कार्यक्षम व प्रभावी असते हें दाखविण्याकरितां घेतलें. इतिहासाच्या पानापानावर व्यक्तीनें समाजावर केलेल्या उपकाराचें गुणवर्णन दिसून येईल. सम्राट् अशोक, गुप्तसम्राट्, हर्षवर्धन, वैदिक व उपनिषदिक द्रष्टे, महान् तत्त्वज्ञानी, बुद्ध, ख्रिस्त, शंकर, वगैरे लोकांनीं अहर्निश झटून समाजाच्या उन्नतीकरितां महान् प्रयत्न केला. हजारों शास्त्रज्ञांनीं लोककल्याण्याकरितां प्रसंगीं समाजाचे आघातही सोसून अनेक शोध लावले व समाजाचे जीवन सुखी करण्याचा प्रयत्न केला. कित्येकांनी वर्षानुवर्षें परिश्रम करून समाजांतील शेंकडों कूटप्रश्न सोडविले व समाजाला शांततेच्या व संस्कृतीच्या गाभाऱ्यांत आणून उतरविलें.

या चर्चेवरून असें दिसून येतें कीं, समाजाचें व व्यक्तीचें कार्यक्षेत्र भिन्न असूनही विरोधी नाहीं. निसर्गत:च कांहीं कामें समाजाला करतां येण्या-

जोगीं नसतात. तीं कामें व्यक्तीनेंच पार पाडलीं पाहिजेत. तसेंच कांही इतर कामें व्यक्तींना आटपण्याजोगी नसतात, तीं सामाजिक एकजुटीनें पार पाडणें आवश्यक असतें.(अशा प्रकारें व्यक्तीचें कार्यक्षेत्र समाजाच्या कार्यक्षेत्राहून भिन्न, पण त्या क्षेत्रास पूरक असें असतें. त्याचप्रमाणें समाजाचें कार्यक्षेत्रही व्यक्तीच्या कार्यक्षेत्रास पूरक असतें. हीं कार्यक्षेत्रें भिन्न व अन्योन्यपूरक असून परस्परावलंबीही असतात. त्यामुळें व्यक्ति समाजापासून विलग राहूं शकत नाहीं व समाजाला व्यक्तिबाह्य अस्तित्व नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. त्यांच्या श्रेष्ठ-कनिष्ठपणाचा प्रश्नच उद्भवत नाही )

(व्यक्तीवर समाजाचें व समाजावर व्यक्तीचें कितपत वर्चस्व असावें हा प्रश्नही अत्यंत महत्त्वाचा आहे.) याबद्दल विद्वानांत बरेच मतभेद आहेत. दोन भिन्न टोकांपर्यंत मतें प्रदर्शित झाली आहेत. व्यक्तीचें पूर्णतया वेगळें व स्वतंत्र अस्तित्व मानण्यापासून तों, व्यक्तीला वेगळें अस्तित्वच नाही अशा प्रतिपादनापर्यंत मतभेद आहेत. व्यक्तीचें व समाजाचें कार्यक्षेत्र भिन्न असून तें अन्योन्यपूरक व परस्परावलंबी आहे, हें आपण पाहिलेंच. एका व्यतिरिक्त दुसऱ्याला पूर्णता यावयाचीच नाही. यामुळें दोहोचें स्वतंत्र व वेगळें अस्तित्व जितकें निरर्थक आहे, तितकेंच भिन्नकार्यक्षेत्रत्वामुळें एकानें दुसऱ्यांत पूर्णपणें विलीन होऊन जाणं हेंही निरर्थक आहे हें सिद्धच होतें. वरील दोन्ही मतें अतिरंजित आहेत असे म्हणावयास हरकत नाही.

मात्र समाजांत असंख्य व्यक्तीचे हितसंबंध गुतलेले असल्यामुळें समाजाची हानि किंवा उन्नति म्हणजे पर्यायानें या सर्वांचीच हानि किंवा उन्नति होय. एकाद्या व्यक्तीच्या हानीनें किंवा उन्नतीनें असा विस्तृत परिणाम होत नाहीं. समाजावर एवढी प्रचंड जबाबदारी असते, व त्यामानानें पाहतां व्यक्तीवर समाजाचे कांहींसें वर्चस्व अपरिहार्यच म्हटले पाहिजे पण दोघांनींही आपली जबाबदारी व महत्त्व जाणून कर्तव्यतत्पर राहणें हेंच योग्य होय. समाजाच्या कल्याणाकरितां व्यक्तीला वारंवार माघार घ्यावी लागेल, स्वार्थत्याग करावा लागेल, व प्रसंगी आत्मार्पणही करावें लागेल, व हें सर्व व्यक्तीचें सामाजिक कर्तव्यच होय. पण कर्तव्यानें व्यक्तीच तेवढी कर्तव्यबद्ध असते असें नाहीं. समाजाचीही कर्तव्यें असतातच व त्यांची जाणीव त्यानें

नेहमीं ठेवली पाहिजे. समाज जर नेहमी व्यक्तीच्या उन्नतीच्या आड येऊं लागला, तर समाज कर्तव्यच्युत व समाजघटना दूषित झाली आहे असें जाणून त्यावर उपाययोजना सुरू केली पाहिजे. समाजाची घटना व वृत्ति या सर्वकाल व्यक्तीच्या उन्नतीस पोषक अशा असल्या पाहिजेत, तरच समाज निर्दोष आहे असें म्हणतां येईल. "त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ।" हें सुभाषित अत्यत मार्मिक आहे व त्यांत व्यक्ति व समाज यांचा संबंध व कर्तव्य यांवर झगझगीत प्रकाश पाडलेला आहे.

**व्यक्तीचें समाजांतील स्थान**

व्यक्ति व समाज हीं अन्योन्यपूरक व परस्परावलंबी आहेत हे आपण आतांपर्यंत पाहिलें; त्यावरून व्यक्तीचें समाजांतील स्थान कांहींसें स्पष्ट दिसूं लागतें. "थेंबें थेंबें तळें सांचे" या नियमानें व्यक्ति व्यक्ति मिळूनच समाज होतो; पण ही उपमा मात्र यापुढें चालवितां येत नाही. प्रत्येक थेंब तळ्यांत मिसळून त्यांत विलीन होऊन जातो व त्याचें स्वतंत्र कार्य आणि अस्तित्व हीं विरून जातात. पण या उलट व्यक्तीचें कार्य व अस्तित्व हीं स्वतंत्र आणि वेगळीं असल्याने तीं समाजात विलीन होऊं शकत नाहींत व ते इष्टही नाहीं. तळ्यांतील प्रत्येक थेंब हा दुसऱ्या थेंबाशीं एकजीव व एकरूप होतो; पण समाजांतील प्रत्येक व्यक्ति ही भिन्न प्रकृतीची असते व दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीशीं ती एकजीव व एकरूप होऊं शकत नाहीं. थेंबाला स्वयंप्रेरणा नाही, तर प्रत्येक व्यक्तीला स्वयंप्रेरणा असते. मात्र हे अस्तित्व कितीही स्वतंत्र व कार्य कितीही भिन्न असलें, तरी व्यक्तीचें कार्यक्षेत्र समाजाबाहेर असूं शकणार नाही हे खासच. गैझा येथील प्रचंड पिरॅमिड्मधील शेकडों दालनांप्रमाणें या समाजरूपी पिरॅमिडमधील व्यक्ती या दालनां-प्रमाणेंच होत. हीं विविध दालनें विविध उपयोगांकरितां व कार्यांकरितां आहेत. हा एक अद्वैतांतील द्वैताचा, किंवा निसर्गांतील एकविधत्वांतील विविधत्वाचा प्रकारच होय.

मग असे जर आहे तर समाजाचें महत्त्व अधिक कां व व्यक्तीचें कमी कां, असा प्रश्न परत उद्भवतोच. पूर्वीच्या मराठी पाठ्यपुस्तकांत कांहीं मोठ्या

उद्बोधक गोष्टी असत. उदाहरणार्थ " कांदा व बटाटा यांचें भांडण " किंवा " साखर व कैरी यांचें भांडण " इत्यादि. या गोष्टींत प्रथम कांदा व बटाटा, किंवा साखर व कैरी यांचें आपल्या श्रेष्ठत्वाबद्दल कडाक्याचें भांडण होत असे. अगदीं " वर्दळीवर " येऊन एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या निघाल्यानंतर भांडण जेव्हां अगदीं हातघाईवर येई त्या वेळीं एकादी "आडून ऐकणारी " अन्नपूर्णाबाई मध्यें पडून भांडण सोडवीत असे व मग त्यांचा चांगला " रस्सा " किंवा " मुरंबा " तयार होत असे. या गोष्टींतील वस्तुस्थितीप्रमाणें व्यक्ति आणि समाज यांचा श्रेष्ठ-कनिष्ठतेचा प्रश्न सोडवितांना त्यांचा ' साखर व कैरी ' यांच्यासारखा समन्वय केला कीं हा प्रश्नच मिटतो. समाज व व्यक्ति या प्रश्नाला दोन अर्धोपमा सुचतात; (पहिली वर उल्लेखिलेली तळें व थेंब यांची, व दुसरी सागर व नदी यांची. या दोहोंतील निम्मा निम्मा भाग घेतला तर या प्रश्नाची यथार्थ कल्पना येईल. थेंबाचें कार्य तळ्यांतूनच अधिक परिणामकारक होतें व तळ्याबाहेर त्याला फारसें महत्त्व येऊंच शकत नाहीं, त्याप्रमाणें व्यक्तीचें कार्यही समाजांतच परिणामकारक होतें व तिलाही समाजाबाहेर फारसें महत्त्व येऊं शकत नाहीं. तसेंच तळ्यांतील थेंब नाहींसे झाल्यास तळेंच नाहीसें होतें, त्याचप्रमाणें समाजही. सागराप्रमाणें समाजही व्यक्तींना नवजीवन पुरवितो व नद्यांप्रमाणें व्यक्तींचें कार्य व अस्तित्व हीं स्वतंत्र असतात.)

## समाज हा मानवनिर्मित का निसर्गनिर्मित

समाज म्हणजे व्यक्तींचा समूह हें जरी खरें असलें, तरी इतर मानवी संस्था व समाज यांचें स्वरूप सर्वस्वीं भिन्न आहे. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें, समाज हा मानवप्रणीतच असल्यानें, त्याचें स्वरूप इतर संस्थांहून भिन्न आहे असें समजण्याचें कारण नाहीं. या व्यक्तिनिष्ठवादी लेखकांचें म्हणणें असें कीं, पूर्वकाळीं लोकांना समाजाची गरजच नसे. प्रत्येक माणूस अगदीं स्वयंशासित व स्वतंत्र होता; पण लोकसंख्या वाढत गेल्यामुळें हें स्वातंत्र्य नाहींसें होऊन गोंधळ माजला व माणसाचें जीवन अस्थिर व दुःखी झालें. हा गोंधळ थांबविण्यासाठीं माणसांनीं एकत्र येऊन समाजस्थापना केली. पण ही विचारसरणी निराधार

आहे. तीमधील " वदतो व्याघात " किंवा आत्मविरोध स्पष्टच आहे. एकादें कार्य करण्याकरितां लोकांनीं एकत्र येणें ही कृतीच मुळीं सामाजिक आहे. समाजाच्या पूर्व अस्तित्वाखेरीज ही गोष्ट अशक्य होय. भूमितीचे प्रश्न सोडवितांना कांहीं वेळां आपण एकादी गोष्ट सिद्ध करतांना इतर कांहीं गोष्टी सिद्ध आहेत असें मानून प्रश्न सोडवित असतों; पण त्या कशा सिद्ध करावयाच्या हेंच आपणांस समजत नाहीं. कांहीं कांहीं वेळां तर सिद्ध करावयाचीच गोष्ट सिद्ध मानून आपण उदाहरण सोडवूं लागतो. त्याप्रमाणेंच माणसांनीं एकत्र येऊन समाज स्थापन करणें म्हणजे माणसांनीं आपण माणूस आहोत असें सांगण्यासारखेंच झालें. समाजाची उत्पत्ति माणसाबरोबरच झाली असेंच मानणें भाग आहे. मानवी स्वभावांतच त्याचा उगम आहे. स्वभावतःच माणूस हा समाजशील प्राणी आहे. कांहीं विलक्षण घटनांवरून या विधानाची प्रतीति येते. जीं मुलें कांहीं घटनांमुळें प्रथमपासूनच मानवी समाजापासून दुरावतात, त्यांच्या मानसिक व बौद्धिक अपरिपक्वतेवरून असें दिसतें कीं, समाजाव्यतिरिक्त मानवप्राणी " माणूस " होऊं शकत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी आपल्या देशांत प्रथमपासून अरण्यांतील वन्य प्राण्यांत वाढलेली दोन मुलें आढळलीं. तीं सुमारें सहा ते आठ वर्षांची; पण त्यांची मानसिक व बौद्धिक वाढ इतकी खुरटलेली होती कीं, त्यांना मानव-बालकें म्हणतां येणार नाहीं. त्यांच्यापुढें ठेवलेलें दूध तीं कुत्र्याप्रमाणें भराभर चाटून टाकीत. तीं शक्य तों अंधारांत व कोपऱ्यांत तोंड लपवून व खालीं करून बसण्याचा प्रयत्न करीत. झाडावर चढण्यांत ती अगदीं कुशल असून, वन्य प्राण्यांच्या पद्धतीप्रमाणें चढत. त्यांना ताठ राहून चालतां येत नसे. पण हात व पाय टेकून तीं फार जलद धांवूं शकत. कांहीं महिन्यांपूर्वी वर्तमानपत्रांत अशाच एका मुलाचा फोटो आलेला होता. हा मुलगा ताशीं ५० ते ६० मैल वेगानें पळत असे व त्याला पकडण्याकरितां मोटार ऐन वेगांत सोडावी लागली. आणखी एक मोठें प्रसिद्ध उदाहरण 'कास्पर हॉझर' या दुर्दैवी प्राण्याचें सांगतां येईल. आपल्या मराठी भाषेंतील " वीरधवल " इत्यादि कादंबऱ्यांत ज्याप्रमाणें एकाद्या राजाच्या मृत्यूनंतर त्याच्या वारस मुलाला एकाद्या पक्षानें पळविल्याचें वर्णिलेलें असतें, त्याचप्रमाणें या मुलाला अगदीं बालपणापासून पळवून

मानवी समाजाबाहेर ठेवण्यांत आले. १८२८ साली जेव्हां त्याला न्यूरेम्बर्ग शहरीं आणण्यांत आलें त्या वेळी त्याला ताठ चालतांही येत नसे व या वेळीं तो १७ वर्षांचा असूनही त्याचें मन पूर्णपणें बाल्यावस्थेंत होतें व बालका-प्रमाणेंच अर्थहीन बडबड करीत असे. त्याच्या मनाची कांहींच वाढ झालेली नव्हती. त्याला सजीव व निर्जीव यांतील भेद कळत नसे. त्यानंतरच्या पांच वर्षांत समाजांत ठेवल्यानंतर त्यानें बरीच प्रगति केली होती; पण त्याचे कांहीं स्वाभाविक गुणधर्म कायमचेच बदलले गेले होते. त्यानंतरच्या कारस्थानांत त्याचा अंत झाला व मरणोत्तर तपासणींत त्याच्या मेंदूची वाढ खुरटलेली दिसून आली. अशी उदाहरणें मधून मधून पहावयास मिळतात त्यांवरून असें म्हणतां येईल कीं, समाज हा निसर्गतःच मानवी विकासास आवश्यक व अपरिहार्य आहे; त्याखेरीज मानवी वाढ होणें संभवनीय नाही. समाजाची महती इतकी असल्यानें प्रसंगी व्यक्तीने माघार घेतली पाहिजे समाजाविरुद्ध बंड म्हणजे पर्यायानें आत्मोन्नतीस व्यत्ययच होय. समाजांत व्यक्तीनें पूर्णतया विलीन होऊन जाणें हें जितकें व्यक्तिमत्वास घातक आहे, तितकेंच समाजाविरुद्ध वारंवार बंडखोरी करणें हे पण आहे. तिनें समाजाशीं नेहमीच एकनिष्ठ राहिलें पाहिजे. पण समाजाची कर्तव्यच्युति शांतपणानें सांवरणें हेंही प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्यच होय.

**समाजाची प्रगति**

समाजाच्या प्रगतीचे स्वरूप विविधमार्गी आहे व तिचे अर्थही निरनिराळे होतात. आपणांस इष्ट त्या अर्थाप्रमाणें तिचें वर्गीकरण करतां येतें.

माणसाची एक ' उपव्याख्या ' अशी करतात, " माणूस हा साधनोपयोजी प्राणी आहे." साधनांच्या प्रगतीबरोबरच समाजाचीही प्रगति होत गेली असे म्हणावयास हरकत नाहीं. या साधनांच्या प्रगतीच्या अनुरोधानें वर्गी-करण केल्यास सामान्यतः पुढीलप्रमाणें वर्ग पडतातः– १. प्रस्तरयुगारंभ, जुनें प्रस्तरयुग व नवें प्रस्तरयुग; २. ताम्रयुग; ३. लोहयुग; व ४ विद्युद्युग. याचप्रमाणें प्रत्येक अवस्थेंतलि प्रमुख व्यवसायावरून वर्गीकरण केल्यास, १. अन्नावयवावस्था, २. मृगयावस्था, ३. पशुपालावस्था, ४. कृषकावस्था, व ५. यंत्रोद्यमावस्था, असे वर्ग पडतात; किंवा समाजांतील

लैंगिकसंबंध व रक्तसंबंध यावरूनही वर्गीकरण करण्यांत येतें, तें असें:- १. संमिश्रसंबंध, २. वृन्दविवाह, ३. गणबाह्यसंबंध (एका गणांतील पुरुषास त्याच गणांतील स्त्रीशीं विवाह करतां येत नाहीं), ४ मातृनामी (मातृशासित) समाज, ५. पितृनामी (पितृशासित) समाज-एकसंबंधी (Monogamous) किंवा अनेकसंबंधी (Polygamous). आणखीही एका प्रकारें वर्गीकरण करतां येतें-१. ग्रामसमाज, २. नगरसमाज, ३. सरंजामशाही, ४. राष्ट्रसमाज.

आजपर्यंतच्या समाजाच्या प्रवासांत कित्येक समाज पार धुळीस मिळून गेले आहेत व त्यामुळे कित्येक संस्कृती पार नामशेष होऊन गेल्या, व कांहींची तर नांवेंही शिल्लक नाहीत. आपल्याच देशांतील सिंधप्रांतांत मोहेंजोदारो येथील व पंजाबांतील हरप्पा येथील संस्कृती पार निःशेष झालेल्या होत्या; पण उत्खननानंतर त्या ठिकाणी एका अतिप्राचीन व प्रगत अशा संस्कृतीचे प्रचंड अवशेष प्रकाशांत आले आहेत. तसेंच नर्मदा, गोदावरी, ताम्रपर्णी, इत्यादि नद्यांच्या कांठीं अत्यंत पुरातन वसाहतीचे अवशेष सामान्यतः नदीकांठच्या वाळूंत गाडले गेलेले आढळतात व त्यांचे एकावर एक असे थर असतात.

प्रस्तरयुगारंभ

सर्वांत खालच्या थरांतील अवशेष काहीसे संदिग्ध आहेत. ते वस्तुतः साधनाप्रमाणे उपयोजिले गेले असावेत असें कांहीं तज्ज्ञांचे म्हणणें आहे, तर कांहींचें मत या उलट. निसर्गतः ज्या प्रकारचे दगडी अवशेष पसरलेले असतात, तसलेच हे आहेत तत्कालीन माणसानें बहुधा यांचा उपयोग केला असावा असें दिसते. प्रायः सर्वच पुरातन वसाहतींच्या प्राथमिक अवशेषांत हा थर आढळतो. याच कालास प्रस्तर युगारंभ असें नांव आहे, व हींच मानवप्राण्यांनीं उपयोजिलेलीं पहिली साधनें होत. कदाचित् यापूर्वीही माणूस कोणतीं तरी साधनें वापरीत असेल, तर ती लांकडासारख्या विनाशी पदार्थांची असून तीं नष्ट झालीं असलीं पाहिजेत. या नंतरच्या कालखंडास जुनें प्रस्तरयुग असें नांव आहे. या कालांतील अवशेषांत कांहीं हाडांचीं व इतर दगडांचीं आयुधें

सांपडतात. दगडी आयुधें प्राय: कुऱ्हाड किंवा चाकूप्रमाणे वापरतां येण्यासारखीं असतात; पण सर्वच अगदीं जाडींभरडीं अशीं दिसतात. या कालांतील माणसाचें मुख्य हत्यार बहुधा लांकडी दंडा हें असावें. पण हे दंडे मातींत मिसळून गेले असावेत. कदाचित् या काळीं धनुष्यबाणें पण वापरीत असावेत असें दिसतें. यांपैकीं पुष्कळसे अवशेष डोंगरकपारींतील गुहांतून आढळतात. या गुहांच्या भिंतीवर त्या काळीं कोरलेलीं व रंगविलेली विविध प्राण्यांचीं सुंदर चित्रें अद्याप पहावयास मिळतात. हे लोक वन्य प्राण्यांचीं सुकलेलीं कातडीं व झाडांच्या साली यांचा उपयोग कपड्यांसारखा करीत असत असें दिसतें.

## नवें प्रस्तरयुग

वर उल्लेखिलेला प्रकार शेंकडों वर्षें चालू होता व इतकीं वर्षें माणसाचा अनुभव व त्याचें ज्ञान वाढत होतें. या अनुभवानें माणूस आपलीं हत्यारें अधिकाअधिक चांगलीं घांसून परजून गुळगुळीत व चांगलीं करूं लागला व हत्यारांचे प्रकारही विविध झाले. याच काळांत माणसाला विस्तव तयार करण्याचा अत्यंत उपयोगी असा शोध लागला. बऱ्याच ठिकाणीं हत्यारें व आयुधें बनविण्याचे मोठमोठे कारखानेच आढळतात. हा काल माणसाच्या खऱ्या प्रगतीच्या सुरुवातीचा काळ होय. माणसानें मोठे शोध या काळांत लावले. शेतकीच्या अभूतपूर्व प्रयोगास सुरुवात करून त्यानें आपल्या जीवनांत प्रचंड क्रांति घडवून आणली. पूर्वींच्या आपल्या शिकारी व भटक्या आयुष्याचा त्याग करून तो एकाच ठिकाणीं स्थायिक होऊन शांतपणानें राहूं लागला, व याबरोबरच त्यानें खेडीं वसविण्यास, व जनावरें पाळण्यास सुरुवात केली. या शांततामय चरितार्थांतून संघटित अशा शासनसंस्थेचा व इतर पुष्कळ उपयुक्त संस्थांचा जन्म झाला. मातीच्या ओबडधोबड व हातानें थापटलेल्या भांड्यापासून सुरुवात करून त्यानें चाकावर सुंदर भांडीं तयार करण्यास सुरुवात केली. बांबूच्या व पालापाचोळ्याच्या साध्या झोपड्यांनीं सुरुवात करून उत्तम भाजक्या विटांनीं तो घरें बांधूं लागला. कापूस व लोंकर यांपासून तो कापड तयार करून वापरूं लागला. त्याच्या आचार-विचारांतही बरीच क्रांति झाली.

## ताम्रयुग

नव्या प्रस्तरयुगाच्या अखेरीस माणसाला तांब्याचा उपयोग समजूं लागला व दगडी आणि हाडांच्या आयुधांऐवजीं अधिक बळकट व उपयुक्त अशीं तांब्याचीं आयुधें तो बनवूं लागला, व तांब्याचीं भांडीं, कंगवे, अलंकार, मूर्ती, इत्यादि वस्तू तो घडवूं लागला. अशा बळकट आयुधांच्या व अवजारांच्या सहाय्यानें त्यानें झपाट्यानें प्रगति सुरू केली. प्रचंड इमारती बांधून भव्य शहरें वसविलीं, विविध प्रकारचीं सुखसाधनें निर्माण केलीं, युद्धाकरितां नाना तऱ्हेचीं हत्यारें, गाड्या, रथ, इत्यादि साधनें पण तयार केलीं. याच कालांत बऱ्याच इतर धातूंचाही त्याला शोध लागला.

## लोहयुग

यानंतर या धातूंपेक्षांही उपयुक्त व कणखर अशी धातू आढळली व तिनें एक प्रचंड क्रान्तीच केली. युद्धकलेंत तर फारच प्रगति झाली, व उत्तम लोहधातूच्या हत्यारांच्या सहाय्यानें माणसानें प्रचंड युद्धें केलीं, प्रदेश जिंकले, शहरें वसविलीं, राज्यें निर्माण केली, व " कर्तुमकर्तुम् " असें सामर्थ्य आणि सुखसाधनें कमाविलीं. याच धातूच्या सहाय्यानें त्यानें आधुनिक कालांत राक्षसी कार्य करणारीं यंत्रें, आगबोटी, आगगाड्या, वगैरे सुखावह व विनाशक अशीं लाखों साधनें निर्माण केलीं.

## विद्युद्युग

चालू कालाला विद्युद्युग असें सार्थ नांव देतां येईल. कारण या शक्तीच्या विलक्षण कार्यक्षमतेवर आज केवढालीं प्रचंड कार्यें होत आहेत. गिरण्या, आगगाड्या, कारखाने तीमुळें चालतात; तार, टेलिफोन, रेडिओ, इत्यादि साधनांनीं पृथ्वीवरील कोणत्याही ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं बातमी क्षणांत पाठवितां येते.

या शक्तीहूनही लाखोंपटीनें अधिक कार्यक्षम अशा दुसऱ्या एका शक्तीचा नुकताच शोध लागलेला असून, तिनें कितीं मोठीं कार्यें करतां येतील याचा अद्याप अंदाज करतां येत नाहीं. ही शक्ति म्हणजे परमाणूंचें स्फोटन. या नंतरच्या युगास बहुधा परमाणुयुग असें नांव दिलें जाईल असें दिसतें.

## प्रकरण तिसरें

# व्यक्ति आणि समाज ( पुढें चालू )

### वर्ण आणि आश्रम

व्यक्ति आणि समाज यांच्या अन्योन्य संबंधाचें योग्य नियमन करून दोहोंचीही उन्नति व्हावी, या दृष्टीनें प्राचीन भारतवर्षीय आर्यांची योजना मोठी शास्त्रशुद्ध होती, असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांनीं या प्रश्नाचा मोठ्या चिकित्सक बुद्धीनें विचार केला होता असें दिसतें. त्यांची समाज-रचना अत्यंत मजबूत व शास्त्रशुद्ध पायावर आधारलेली होती; समाजाच्या व व्यक्तीच्या कार्यांचा उत्कृष्ट समन्वय या रचनेंत दिसून येतो. या दोहोंचें कार्यक्षेत्र भिन्न असून अन्योन्यपूरक व परस्परावलंबी असतें. या तत्त्वाचा समाजरचनेंत अंतर्भाव करण्यांत आलेला होता. उपनिषदांतील तत्त्वविचार प्रामुख्यानें व्यक्तिनिष्ठ असले तरी, अद्वैततत्त्वाचा अन्तःप्रवाह सर्वत्र इतका जोरदार होता कीं, या व्यक्तिनिष्ठतेचा समाजावर अनिष्ट परिणाम होण्याची फारशी शक्यता नव्हती. या तत्त्वाला हिंदू संस्कृतींत फार महत्त्व असल्यामुळें, सामाजिक प्रश्नांकडे दुर्लक्ष होण्याचें कारणच नव्हतें व त्याचा समाजाच्या सर्व थरांतून प्रसार झालेला असल्यामुळें, समाजाचें महत्त्व अज्ञात होतें असें मानतां येत नाहीं. या अद्वैतवादामुळेंच समाजांतलि सर्व भेदांचा अनिष्ट परिणाम त्या काळीं होऊं शकला नाहीं.

"समाज हा एक महापुरुष आहे," असें महाभारतांत म्हटलेलें आहे. समाजाचे निरनिराळे विभाग व वर्ग हे या पुरुषाचे अवयव होत, ही कल्पना तर ऋग्वेदकालापासून प्रचलित होती. "ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्‌ बाहूराजन्यः कृतः। ऊरू तदस्य तद्वैश्यः पद्भ्यां शूद्रोऽजायत" अशा प्रकारच्या कल्पना अगदीं आधुनिक लेखकांतही दिसून येतात. ज्या उपपत्तीला इंग्रजींत "Organismic Theory" असे म्हणतात, तीतही समाज हा एक महाप्राणी असून समाजांतील सर्व व्यक्ती या अवयववत्‌ होत, अशी कल्पना मांडलेली आहे. एकूण, ही कल्पना बरीच जुनी असावी असें दिसतें.

## वर्णव्यवस्था

आर्यांच्या समाजरचनेंत वर्णव्यवस्थेला फार महत्त्व आहे. कोणत्याही समाजांत माणसांचे निरनिराळे वर्ग असतातच. निसर्गतःच प्रत्येक व्यक्तीचे गुणधर्म, बुद्धिमत्ता, कार्यक्षमता, आनुवंशिक गुण, हीं भिन्न भिन्न असल्यामुळें सर्व एकाच वर्गात बसूं शकत नाहीत. प्रत्येक व्यक्तीला तिचे गुण, बुद्धि, कार्यक्षमता व अनुवंशिकता यांस अनुरूप असें कार्यक्षेत्र मिळवून देणें हें नैसर्गिकच होय. या दृष्टीनें पाहतां आर्यांची वर्णव्यवस्था तात्त्विकदृष्ट्या आदर्श विभागणीच होती असें म्हणावयास हरकत नाहीं. पुढें अर्थातच या तत्त्वाचा दुरुपयोग केला जाऊन, जाती निर्माण झाल्या व त्यांचाही दुरुपयोग होऊन या आदर्श समाजरचनेचा धुव्वा उडाला, ही गोष्ट निराळी. कोणतेंही साधन त्याच्या योजनेच्या बऱ्या-वाईटपणावर अवलंबून असतें. पूर्वजांनीं सामाजिक उन्नतीकरितां जें साधन उत्पन्न केलें, तेंच वंशजांनीं समाजविभंजनार्थ वापरलें, हा त्या साधनाचा किंवा निर्मात्यांचा दोष नसून, तें वापरणारांचा दोष होय.

## कर्मविभाग किंवा श्रमविभाग

समाजाच्या प्रगतींत श्रमविभागाचें फार महत्त्व आहे. ॲडम्‌ स्मिथ या प्रख्यात इंग्लिश अर्थशास्त्रज्ञानें या तत्त्वाचा अगदीं जोराचा पुरस्कार केला आहे. त्याच्या मतें कर्मविभाग हाच प्रगतीचा पाया होय. आर्यांची वर्णव्यवस्था याच तत्त्वावर आधारलेली होती. भगवद्गीतेंत तसा स्पष्ट उल्लेखच आहे. "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः". तत्कालीन सामाजिक परि-

स्थितीप्रमाणें त्या वेळीं निसर्गतःच समाजाचे चार वर्ग पडले, असें इतिहासावरून दिसतें. प्रथमतः आर्य लोक जेव्हां हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांना दोन कार्यें प्रामुख्यानें करावीं लागत. पहिलें कार्य म्हणजे संरक्षण व भूमिसंपादन व दुसरें कार्य म्हणजे जीवनाची सोय. त्यामुळें सर्वांनींच युद्धावर जाणें इष्टही नव्हतें, व शक्यही नव्हतें. म्हणून समाजांतील चांगल्या शूर व सुदृढ माणसांनीं युद्धावर जावयाचें व इतरांनीं बाकीचे सर्व व्यवहार पहावयाचे अशी प्रथाच पडून गेली. पुढें अशा प्रकारें युद्धावर जाणारांना क्षत्रिय म्हणजे संरक्षक असें योग्य नांव पडलें; प्रसंगीं सर्वांनाच लढावें लागे, त्यामुळें क्षत्रियांप्रमाणेच इतरही युद्धकलेंत निष्णात असत. अर्थातच हा भेद कार्यक्षेत्रापुरताच असून, त्याचा इतर सामाजिक व्यवहारांत कांहींच संबंध येत नसे. सर्वच आर्यजन एकाच कुलांतील असे मानलें गेल्यानें, या भेदाला इतर कोणतेंही महत्त्व नव्हतें. पण कालांतरानें क्षत्रियांचें कार्य विशेष महत्त्वाचें असल्यामुळें व त्यांच्या हातीं अधिकार आल्यामुळें, त्यांना बरेंचसें महत्त्व प्राप्त झालें. यानंतर, या आर्य समाजांत ज्ञानार्जनाची लाट उसळलेली दिसून येते. हें ज्ञानार्जनाचें कार्य ऋग्वेदांत प्रतिबिंबित झालें आहे. या ज्ञानलालसेनें प्रेरित झालेला व ज्ञानार्जनांत मग्न राहणारा एक निराळाच व सन्मान्य वर्ग या काळीं उदयास येत होता. मात्र कोणत्याही वर्गांत रोटीबेटी व्यवहाराचे निर्बंध नव्हते हें खास.

कालगतीबरोबर आर्यांनीं बराच प्रांत पादाक्रान्त केला, शत्रूंना नमविलें, व ते स्थायिक होऊं लागले. ही प्रगति कांहीं अगदीं शांततेनें चाललेली नव्हती. येथील आदिवासी लोकांबरोबर त्यांचीं युद्धें होत. पण एकंदरींत समाजांतील बहुसंख्य लोक शेती करून खेड्यांखेड्यांत शांततेनें राहूं लागले. शांततेच्या काळांत योद्ध्यांचें महत्त्व कमी होऊन, विद्वान् व ज्ञानी लोकांचें महत्त्व वाढतें; यामुळें या शांततेच्या काळांत क्षत्रियांचें महत्त्व लुप्त होऊन ज्ञानमार्गी म्हणजे ब्राह्मण लोकांना महत्त्व प्राप्त झालें. अशा प्रकारें समाजांत ब्राह्मण, क्षत्रिय, व सामान्य म्हणजे वैश्य असे तीन वर्ग पडले. आदिवासियांच्या बरोबर चाललेल्या संघर्षांत त्यांचा पराभव करून आर्यांनीं त्यांनाही समाजांत स्थान दिलें; पण त्यांच्या दास्यत्वामुळें व अज्ञानामुळें त्यांना हीन लेखण्यांत येत असे.

आर्यसमाजांत चातुर्वर्ण्याची उत्पत्ति अशी झाली: मूलत: पहिल्या तीन वर्णांच्या अधिकारांत किंवा सामाजिक दर्जांत फरक असण्याचें कांहींच कारण नव्हतें. ते सर्व एकाच समाजांतील, श्रमविभागाकरितां झालेले तीन वर्ग होते. त्यामुळें प्रथमत: समाजांत मुख्य " थर " असे दोनच म्हटले पाहिजेत: एक आर्य व दुसरा अनार्य.

हळू हळू या सर्व वर्गांचें कार्यक्षेत्र अधिकाधिक आंखीव व भिन्न होऊं लागलें. जसजसे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आपापल्या विशिष्ट कार्यांतच व्यापृत होऊं लागले, तसतसा त्यांच्या कार्यक्षेत्रांतील भेद अधिकाधिक तीव्र व स्पष्ट होऊं लागला; व " समानशीले व्यसनेषु सख्यम् " या न्यायानें प्रत्येक वर्ग अधिकाधिक आत्मकेंद्री होऊ लागला. प्रथमत: जन्मावरून वर्ण ओळखण्याची पद्धति अस्तित्वांत नव्हती; फक्त कार्यक्षेत्रें मात्र सुव्यक्त स्वरूप धारण करीत होतीं व कालमानाप्रमाणें एकाद्या वर्गाचें महत्त्व कमी अधिक मानलें जाई.

जे वर्णभेद नैसर्गिक स्वभावविशेष व गुणविशेष यांवर आधारलेले असतात, त्यांपासून समाजाचा नेहमींच फायदा होतो. कोणत्याही गतिमान् समाजांत अशा प्रकारचे वर्ण किंवा वर्ग अपरिहार्यच असतात. कारण श्रम-विभागाशिवाय आधिभौतिक प्रगति अशक्यच असते. एकाच व्यक्तीनें सर्व कार्यें करावयाचीं ठरविल्यास एकही धड होत नाहीं, हा सामान्य अनुभव आहे. श्रमविभागामुळें कार्यक्षमतेंत अतिशय भर पडते, सतत एकच कार्य करीत राहिल्यानें त्यांतील सर्व खुब्या समजतात व तें काम अगदीं सहजगत्या होत जातें. ॲडॅम स्मिथनें श्रमविभागापासून होणाऱ्या फायद्यांचें मोठें मार्मिक वर्णन केलेलें आहे. तो म्हणतो :--

" श्रमिकाच्या उत्पादनशक्तीची कमाल सुधारणा, व त्याच्या कारागिरीं-तील नैपुण्य, कौशल्य व बुद्धि यांतील प्रमुख श्रेय श्रमविभागासच दिलें पाहिजे. [ यानंतर त्यानें टांचणी-कारखान्याचें उदाहरण दिलें आहे. ] या कारागिरींत वाकबगार नसलेला, व या यंत्रांची कांहींच माहिती ज्यास नाहीं असा एकादा कामगार सर्व दिवसभर राबून कदाचित् एकही टांचणी करूं

शकणार नाहीं, व विसापर्यंत तर त्याची मजल मुळींच जाणार नाहीं, हें खास. पण आजच्या या उद्योगाच्या प्रगतिवरून असें दिसून येतें कीं, हा व्यवसाय एक विशिष्ट उद्योग तर झालाच आहे; पण त्याच्या ज्या विविध उपशाखा आहेत त्यादेखील एकाद्या स्वतंत्र उद्योगाइतपत महत्त्वपूर्ण झाल्या आहेत. एक कारागीर तार तयार करतो, दुसरा ती सरळ करतो, तिसरा तुकडे पाडतो, चौथा त्या तुकड्यांना धार लावतो, पांचवा टांचणीचें डोकें तयार करतो; हें डोकें तयार होण्याकरितां दोन तीन वेगवेगळ्या क्रिया कराव्या लागतात. हा डोकें तयार करण्याचा एक स्वतंत्र व्यवसायच होतो; या टांचण्यांना झिलई देणें हा एक निराळाच उद्योग होतो; इतकेंच काय पण या टांचण्या पुडक्यांत व्यवस्थित बसविणें हासुद्धां एक वेगळा व्यवसायच होतो. अशा प्रकारें हा टांचण्या करण्याचा महत्त्वाचा धंदा, १८ वेगवेगळ्या व्यवसायांत विभागलेला आहे. हे अठरा व्यवसाय कांहीं कारखान्यांत अगदीं वेगवेगळे चालविले जातात; तर कांहीं ठिकाणीं, एकच कारागीर यांपैकीं दोन अगर तीन क्रिया सांभाळतो. मी असा एक लहानसा कारखाना पहावयास गेलों होतों. त्या ठिकाणीं फक्त दहाच कारागीर काम करीत होते व अर्थात्च प्रत्येकाला दोन अगर तीन वेगवेगळीं कामें करावीं लागत. एकंदरींत हा कारखाना साधारणच असल्यानें, तेथें इष्ट यंत्रसामग्रीही यथातथाच होती. पण इतकें असूनही जेव्हां हे कारागीर मन लावून काम करीत, तेव्हां दिवसास १२ पाडांपर्यंत टांचण्या तयार करीत. सामान्यतः एका पौंडांत मध्यम आकाराच्या चार हजारांवर टांचण्या बसतात. म्हणजे हे कारागीर दररोज ४८०० टांचण्या तयार करतात. प्रत्येकीं रोज ४८०० टांचण्या तयार झाल्या. पण तेंच जर यांनीं वेगवेगळा प्रयत्न केला असता व त्यांना जर या व्यवसायाची माहिती नसती, तर प्रत्येकीं २० टांचण्याही करणें अशक्य झालें असतें व कदाचित् एकही टांचणी तयार झाली नसती. याचा अर्थ असा कीं २४० किंवा ४८०० इतपतही काम होऊं शकलें नसतें. ”

यावरून श्रमविभागाचें व श्रमविशेषणाचें महत्त्व लक्षांत येईल. आज आपणांस जें प्रचंड प्रमाणावरचें उत्पादन दिसतें, तें श्रमविभागामुळेंच, असें म्हणतां येईल. याच तत्त्वावर वर्णांची उभारणी झालेली होती व त्यामुळेंच

आर्यांच्या वसाहती थोड्याच काळांत संपन्न झाल्या. या संपन्नतेचें बरेंचसें श्रेय या समाजरचनेस दिलें पाहिजे.

अलीकडे या प्रश्नावर मानसशास्त्रानें, व समाजशास्त्रानें बरेंच संशोधन करून पुष्कळ प्रकाश पाडला आहे. या संशोधनावरूनसुद्धां " गुणकर्मविभागश: " जे " वर्ण " तयार होतात, ते माणसाच्या नैसर्गिक प्रेरणेमुळेंच किंवा स्वभावामुळेंच होत, असें दिसून आलें आहे. प्रो. गिड्डिंग्ज् या समाजशास्त्रज्ञाची " सवर्णविधान " (Consciousness of kind) ही उपपत्तिदेखील वर्णरचनेस पुष्टिकारकच आहे. या उपपत्तीचें थोडक्यांत विधान असें कीं, " सवर्णविधान ( किंवा सजातीयतेची जाणीव ) व्यापकतम अर्थानें पाहिलें तर सजीव व निर्जीव सृष्टींतील भेद स्पष्ट करते; सजीव सृष्टि या सामान्य वर्गांतील उपवर्ग आणि वंश यांना स्पष्ट स्वरूप देते. वंशाविषयींच पहावयाचें तर मानवी वर्ग तसेंच राजकीय पक्ष हे सवर्णविधानामुळेंच निर्माण होतात. वर्णभेदाचें कारणाहि हेंच होय. तसेंच नानाविध जातींचे प्रकार, नात्यागोत्यांचे नियम व त्यांच्या पद्धती हींही यामुळेंच उत्पन्न होतात. " *

## वर्ण आणि जाति

येथें वर्ण आणि जात यांतील फरक स्पष्ट करणें आवश्यक आहे. पुष्कळ वेळां वर्ण आणि जात या संज्ञा समानार्थी वापरण्याची प्रथा आहे. ' वर्ण ' ही संज्ञा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्गांनाच उपयोजितां येईल. व या चार वर्णांचे कालांतरानें जे शेंकडों उपवर्ग झाले, त्या उपवर्गांना ' जाति ' ही संज्ञाच अन्वर्थक होय. त्यांना वर्ण म्हणतां यावयाचें नाहीं. यावरून या दोन संज्ञांतील भेद स्पष्ट होईल.

## जाति

' जाति ' या संज्ञेची ' रिस्ले ' ची व्याख्या समर्पक आहे. " जाति म्हणजे कुलांचा अगर कुलसमूहांचा समुदाय होय. हे समुदाय त्यांच्या विशिष्ट व्यवसायवाचक नांवावरून ओळखिले जातात. ते स्वत:ला एकाद्या दैवी अगर मानवी पूर्वजाचे वंशज मानतात, आपल्या विशिष्ट व्यवसायासच

* प्रो. गिडिंग्ज " Principles of Sociology " पान १८.

चिकटून राहतात आणि एकाद्या स्वतंत्र व एकजिनसी ज्ञातीप्रमाणे मानले जातात. प्रत्येक माणसाचीं सामाजिक आणि घरगुती नातींगोतीं निव्वळ जन्मावरूनच ठरतात व त्याला सर्व आयुष्यभर जेवणखाण, पोषाख, विवाहसंबंध, इत्यादि गोष्टी त्याच्या ज्ञातींतील रिवाजाप्रमाणेंच कराव्या लागतात. ”

जातींचें इतकें प्रकृष्ट स्वरूप हिंदुस्थानांतच पहावयास मिळतें. त्यांचा आरंभ केव्हां अगर कसा झाला, यासंबंधीं निश्चित कांहींच सांगतां येत नाहीं; मात्र त्यांचा कांहींसा इतिहास महाभारतादि ग्रंथांत पहावयास मिळतो. त्या काळीं हें स्वरूप आजच्या इतकें निकृष्ट व निर्जीव झालेलें नव्हतें; मात्र अवनतीची सुरुवात झालेली होती असें म्हणतां येईल. वेदकालांतील साधी परिस्थिति व वर्णयुक्त समाजरचना यांचा समन्वय योग्य असाच होता. पण पुढें लोकसंख्येच्या वाढीमुळें व राजकीय स्थित्यंतरामुळें समाजरचना अधिकाधिक गुंतागुंतीची होत गेल्यानें हाजारो नवे प्रश्न उपस्थित झाले व त्यांच्या अनुरोधानें समाजाचेंही स्थित्यंतर अनिवार्य झालें. खेड्यांतील कृषिप्रधान व्यवस्थेचे महत्त्व कमी होऊन, शहरांतील उद्योगधंद्यांना मानवेल अशी समाजरचना होत गेली व खेड्यांतही उद्योगधंदे निर्माण होऊन तेथेंही असाच बदल झाला. शेंकडों निरनिराळे उद्योगधंदे व हे व्यवसाय चालविणारे कारागीर यांचे वेगवेगळे वर्ग पडूं लागले, प्रत्येक वर्गाचें जीवन निरनिराळें होऊं लागलें व ‘ सवर्णविधाना ’ मुळें, समान वर्ग अधिक जवळ व असमान वर्ग अधिक दूर होऊं लागले.

कालांतरानें हे व्यवसाय वंशपरंपरा चालविले जाऊ लागले. सुरुवातीस जे केवळ परिस्थितीमुळें व गुणकर्मविभागशः होत होते, ते व्यवसाय वंशपरंपराच रूढ होऊं लागले व ‘ गुणकर्म ’ तत्त्व विसरलें जाऊन वंशपरंपरेचें तत्त्व प्रचारांत आलें. बापाचा धंदा मुलानें चालविणें ही एक अनिवार्य रूढीच होऊन बसली. तसेंच वर्णसंकराच्या भीतीमुळें ब्राह्मणादि उच्चवर्णीय लोक, शक्य तों, खालील वर्गापासून दूरदूर राहण्याचा प्रयत्न करूं लागले व रोटीबेटी व्यवहारनिर्बंधांस सुरुवात झाली. अशा प्रकारें हे परस्परांपासून अधिकच दुरावत जाऊन जातिसंस्था ही एक समाजांतील

सर्वव्यापी रूढीच झाली. विवाहनिर्बंधांना न जुमानतां व्यवहारांत प्रथमतः अनुलोम विवाह—उच्चवर्णीय पुरुष व अधोवर्णीय स्त्री यांचा विवाह—प्रचारांत आला व सर्व वर्गाच्या वाढत्या दळणवळणामुळें, प्रतिलोम विवाहही—उच्चवर्णीय स्त्री व अधोवर्णीय पुरुष यांचे विवाह—प्रचलित झाले. हे सर्व प्रकार व्यवहारांत चालत असले तरी रूढीचा व धर्मशास्त्राचा त्याला प्रचंड विरोध होता. ते शास्त्रसंमत व शिष्टसमंत कधींच होऊं शकले नाहींत. त्यामुळें अशा धर्मशास्त्रबाह्य विवाहापासून जी संतति होत असे तिला अत्यंत हीन व समाजबाह्य मानण्यांत येत असे. त्यानंतरची पायरी म्हणजे सर्व संकरविवाह. या सर्व समाजमंथनामुळें, व्यस्त संबंधांमुळें आणि व्यवसाय-बाहुल्यामुळें नाना प्रकारच्या जाती व उपजाती निर्माण झाल्या.

अशा प्रकारें जाती उत्पन्न होण्याचीं प्रमुख कारणें चार प्रकारचीं मानतां येतातः १ व्यवसाय भेद; २ वर्णसंकराची भीति व तज्जन्य प्रतिबंध; ३ आर्य व अनार्य यांचे मिश्रण; आणि ४ अनुलोम, प्रतिलोम, व व्यस्त विवाह.

## जातींचे प्रकार

जातींच्या वर्गीकरणांत तीन प्रकारच्या प्रमुख जाती आढळून येतातः व्यवसायवाचक, संप्रदायवाचक, व वंशवाचक. यांपैकीं पहिला प्रकार हा फार सामान्य असून हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतो. यामुळें व्यवसायसाधर्म्या-मळेंच सर्व जाती उत्पन्न झाल्या, अशी एक मतप्रणाली प्रचलित आहे. पण "व्यवमायसाधर्म्य हे अनेक कारणापैकी एक आहे इतकेच म्हणतां येईल. पण तेंच एकमेव कारण आहे असें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून होईल. याउलट आपणांस असें दिसून येतें कीं, समान व्ययसाय करणारे लोक क्वचितच एका जातीचे निघतात. उदाहरणार्थ, एकाच प्रांतांतील सर्व कोष्टी एकाच जातीचे आढळत नाहींत." रिस्ले. भिक्षुक, वाणी, कोष्टी, कोळी, सुतार, कुंभार, धोबी, न्हावी, इत्यादि जाती व्यवसायवाचक होत. संप्रदायवाचक जाती या सांप्रदायिक मतभेदामुळें उत्पन्न झालेल्या जाती होत. लिंगायत, वैष्णव, स्मार्त, इत्यादि जाती या प्रकारांत येतात. वंशवाचक जातीही सर्वत्र आढळतात. बंगालप्रांतांतील चांडाळ, संयुक्त प्रांतांतील भार व चेर, मुंबई प्रांतांतील महार, पंजाबांतील जाट, मद्रासकडील नायर, वगैरे जाती वंशवाचक होत.

तज्ज्ञांच्या मतें जाती व उपजाती यांची संख्या तीन हजारांपर्यंत जाते. यावरून या संस्थेची व्याप्ति लक्षांत येईल.

## जातिसंस्थेची इष्टानिष्टता

हिंदुस्थानांतील जातिसंस्था ही इतकी अद्वितीय व विचित्र संस्था आहे कीं, प्रत्येक देशांतील समाजशास्त्रज्ञांना तीबद्दल विलक्षण कुतूहल आहे. प्रत्येक देशांतील समाजांत वर्ग असतात. पण इतके विविध व विलक्षण वर्ग कुठेंच आढळत नाहींत. या अद्वितीय वैशिष्ट्यामुळें या विषयावर नानाप्रकारचे ग्रंथ निर्माण झाले आहेत. " नुकतेंच, एका अमेरिकन् हिंदु शास्त्रज्ञानें या विषयावर लिहिल्या गेलेल्या पांच हजारांवर पुस्तकांची यादी केल्याचें प्रसिद्ध केलें आहे." या पुस्तकांच्या संख्येवरून या विषयाबद्दल सर्वत्र किती कुतूहल आहे व विषय किती महत्त्वाचा आहे, हें दिसून येईल.

सांप्रत या जातिभेदाविरुद्ध एक प्रचंड मोहीमच सुरू आहे व एका दृष्टीनें ती योग्यच आहे असें म्हणावें लागेल. आधुनिक समाजरचनेस व व्यक्तिनिष्ठ विचारप्रणालीस जातिसंस्थेचें सहाय्य फारसें होत नसून विरोधच होत आहे, असें मत सर्वसामान्यतः प्रकट करण्यांत येतें. मात्र एका काळीं या संस्थेनें प्रचंड समाजसेवा केली आहे, हें नाकबूल करतां येणार नाहीं. हजारों वर्षे ज्या संस्थेनें लोकोपयोगी कार्य केलें ती सर्वस्वीं दोषरूप आहे असें छातीठोकपणें सांगणें धाडसाचें होईल. आज समाजरचना व समाजाची मनोभूमिका बदलली आहे व तदनुरूप संस्थाही बदलल्या पाहिजेत ही गोष्ट खरी; पण कोणती तरी समाजरचना व कोणत्या तरी संस्थांनीं या सनातन संस्थांची रिकामी जागा भरून काढलीच पाहिजे. यासाठीं या पुराण संस्थांचें गुणदोषविवेचन करून त्यांमधील दोष टाकून गुण घेतले पाहिजेत व त्या आधारावर नव्या संस्था निर्माण केल्या पाहिजेत. जातिसंस्थेनें पुढील प्रकारें समाजसेवा केली आहे :

१. व्यवसायभेद साधल्यामुळें तिनें समाजाला श्रमविभागापासून व श्रमविशेषणापासून होणारे फायदे मिळवून दिले आहेत; २. आनुवंशिकतेच्या सिद्धांताप्रमाणें पाहतां, तिनें कारागिरांचें कौशल्य वाढण्यास मदत केली आहे; वंशपरंपरा एकच व्यवसाय करण्यास भाग पाडल्यामुळें तितपत

मदत झाली; ३. प्रत्येक समाजांत उद्योगधंद्याकरितां उमेद्वारांना शिक्षण देण्याचा प्रश्न फार महत्त्वाचा व बिकट असतो. जातिसंस्थेनें हा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविला. बापाइतक्या कळकळीनें दुसरा कोणताही गुरु मुलांस शिकवूं शकणार नाहीं. वंशपरंपरा व्यवसायामुळें हा प्रश्न सुटला; ४. या संस्थेचा अन्योन्य सहकारी संस्थेप्रमाणें उपयोग होत असे; ५. या संस्थेनें उच्चवर्णीयांची अवनति रोकून धरली. सुजननशास्त्रान्वयें असें म्हणतां येईल कीं, दोन सर्वस्वीं भिन्न वंशांच्या संबंधापासून निकृष्ट प्रजोत्पत्ति होते. आर्य आणि अनार्य हे सर्वस्वी भिन्न वंशाचे असल्यामुळें त्यांच्या संबंधापासून प्रजा निकृष्ट झाली असती. अशा संबंधांस शक्य तों प्रतिबंध करून तिनें ही निकृष्ट प्रजोत्पत्ति थांबविली असें म्हणतां येईल; ६. तीव्र स्पर्धेला प्रोत्साहन न देतां सहकारी तत्त्वावर समाज चालविल्यानें तिनें दुर्बलांचें रक्षण केलें.

या संस्थेचे सांप्रतचे दोष पुढीलप्रमाणें समासित करतां येतील: १. भिन्न व्यवसाय करण्याची कारागिराला योग्य सोय नसते, पिढीजाद व्यवसायच अनुसरावा लागतो; २. यामुळें बरेचसे व्यवसाय अपात्र व बुद्धिहीन माणसांच्या हातीं राहतात व सत्पात्र व योग्य कारागिरांची कुचंबणा होते; व व्यवसायाचाही तोटा होतो; ३. अंधश्रद्धा व पूर्वग्रह निर्माण होऊन शेतीसारख्या व्यवसायांची हानि होते; उदाहरणार्थ, सोनखत, माशांचे व हाडांचें खत वापरण्यास विरोध; ४. जातीमुळें व्यवसाय ठराविक व मर्यादित होतात व पर्यायानें व्यक्तीची महत्त्वाकांक्षा व चिकाटी यांना वाव रहात नाहीं. ५. जाती या श्रमाचें पावित्र्य मानीत नाहींत; सर्व श्रम पवित्रच हें तत्त्व जातिसंस्थेनें मान्य केलेलें नाहीं. बहुतेक सर्व कारागिरांना व विशेषत: भंगी, महार, मांग, इत्यादि कामें करणारांना समाजरचनेंत फार हीन स्थान देण्यांत आलें आहे. ६. जातींमुळें शिक्षणप्रसाराला अडथळा होतो व शिक्षण मर्यादित होतें; ७. जन्माच्या योगायोगानें गुरु व शिष्य एकत्र येतात. पिता हा जरी अत्यंत कळकळीचा गुरु असला, तरी तो त्या व्यवसायांतील उत्तम गुरु असेलच असें नाहीं. कळकळ व ज्ञान या गोष्टी भिन्न आहेत, ८. प्रचंड प्रमाणावरील उत्पादनाला जातिसंस्थेचा अडथळा होतो. अशा उत्पादनास कुशल कारागीर व स्पर्धा हीं अवश्य

असतात. कुशल कारागीर एकाच जातींत हवे तितके मिळूं शकत नाहींत व सहकारी तत्त्वामुळें तीव्र स्पर्धेला अवसर मिळत नाहीं; ९. जातिसंस्थेमुळें प्रचलित झालेले, अंतःसंबंधी विवाह-निर्बंध वंशाच्या अवनतीस कारणीभूत होतात; १०. तीमुळें व्यक्तिमत्वावर मोठा अनिष्ट परिणाम होतो. व्यक्तीस कोणत्याही प्रकारचें स्वातंत्र्य असत नाहीं व त्यामुळें व्यक्तिमत्वाला वाढण्यास संधी मिळत नाहीं.

आधुनिक समाजास ही जातिसंस्था फारशी उपयुक्त नाहीं. तिचें सद्यःस्वरूप अत्यंत हिणकस व निर्जीव झालेलें आहे. तींत कालानुरूप परिवर्तन होण्याची फारशी शक्यता दिसत नाही. पूर्वींचा ज्वलंत सजीवपणा व गतिमत्व नाहींसें होऊन विकृत बाह्यस्वरूप तेवढें अवाशिष्ट राहिलें आहे. आपल्या सर्व समाजरचनेचीच अशी अवस्था झालेली आहे. याविषयीं बाबू अरविंद घोस म्हणतात, " जर प्राचीन भारतांतील उपनिषत्कालीन किंवा बुद्धकालीन, त्यानंतरच्या सुवर्णयुगांतील एकादा माणूस आज भारतभूमींत आला तर......हा आपलाच वंशज निव्वळ गतकाळांतील चिंधोट्या, शंखशिंपले व आकार यांनाच कवटाळून राहिला आहे, त्यामधील नऊ दशांश अर्थ नाहींसा झालेला आहे, असें त्याला आढळेल. मानसिक दारिद्र्याचें विक्राळ स्वरूप, गतिहीनता, निर्जीव अनुकरण, शास्त्रांचा अन्त, प्रगतिहीन कलास्फूर्तींचा क्षयरोगी प्रवाह, हीं सर्व पाहून तो स्तिमितच होईल. "

## जातिसंस्थेचें भवितव्य

जातिसंस्थेच्या भवितव्याविषयीं आतां निःशंकपणें निराश होण्यास हरकत नाहीं. विशेषतः गेल्या दोन अडीच तपांत जी मुख्यतः राजकीय चळवळ झाली, तिनें समाजांतील सर्व थर, संस्था, वर्ग, परंपरा व चालीरीती बुसळून व हादरून टाकल्या आहेत. ज्या अज्ञानांधकारांत जातीयतेचे दोष वावरत होते तें अज्ञानपटलच दूर होत आहे. समाजांतील सर्वच वर्गांना आतां आपल्या सामाजिक व राजकीय अधिकारांची जाणीव होऊं लागली आहे व जातींतील उच्चनीच भावाला चांगलाच हादरा बसला आहे. हीं चिन्हें एकंदरींत समाजाच्या प्रगतीचीं द्योतक आहेत, असें सामान्यतः मानण्यांत येतें. मात्र या समाजाची एक आधारभूत संस्था निःशेष होत असतांना

तिनें वाहिलेली धुरा तोलून धरण्याची जबाबदारी इतर संस्था व जनता यांवर असते, याची फारशी जाणीव कुठेंच दिसत नाहीं. समाजांत आमूलाग्र परिवर्तन करणें, ही अशक्यप्राय गोष्ट होय. म्हणून प्रचलित संस्थांना कालानुरूप स्वरूप देणें, हेंच योग्य होय. जातिसंस्था नष्ट करून समाज-रचना धुसळून टाकणें ही गोष्ट फारशी सोपी नाहीं. हजारों वर्षे टिकून दृढमूल झालेली एक प्रचंड संस्कृति या सर्व संस्थांच्या मागें उभी आहे. हे सर्व संस्कार एका दिवसांत पुसून जाण्याइतके कच्चे नाहींत. प्रथमतः जाती-जातींमधील वैमनस्यें नाहींशीं करून समाजांत सलोखा निर्माण झाला पाहिजे. आज तर परिस्थिति अगदी उलट झाली आहे. हीं वैमनस्यें वाढत आहेत. यामुळें जातिसंस्था तर नाहींशी होणार नाहींच; उलट तिच्यांतील दोष अधिकच घातक होत जातील. कायद्यानें कोणत्याही वर्गास, तो उच्च असो कीं नीच असो, विशेष सवलती देतां कामा नयेत. धर्म, जात, गोत्र, वर्ग, इत्यादि शब्द सरकारी कोशांतून नाहींसे झाले पाहिजेत. या बाबा निव्वळ वैय्यक्तिक ठरवून, प्रत्येक व्यक्तीला समान अधिकार व कर्तव्यें आहेत याची जाणीव करून दिली पाहिजे, प्रत्येक जातीनें प्रथमतः आप-ल्यांतील उपजातींना समाविष्ट करून घेतल्या पाहिजे; पण त्याबरोबरच इतर जातीशीं आपलें वैर आहे असें समजतां कामा नये. या उपजाती नामशेष झाल्यानंतर मुख्य जातींनीं एकत्र येऊन आपापसांत सलोखा निर्माण करून जातिसंस्थेंतील उच्चनीच भाव पार नाहींसा केला पाहिजे.

### आश्रम

आर्यांची व्यक्तीच्या जीवनक्रमाकडे पहावयाची दृष्टि आश्रम-व्यवस्थेंत व्यक्त झालेली आहे. या व्यवस्थेनें प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाचे चार विभाग कल्पिले आहेत : पहिला ब्रह्मचर्याश्रम, दुसरा गृहस्थाश्रम, तिसरा वानप्रस्थाश्रम व चौथा संन्यासाश्रम. त्या वेळच्या समाजनियमांप्रमाणें मुलगा सुमारें सात आठ वर्षें वयाचा झाल्यानंतर त्याचा उपनयन-समारंभ होत असे. उपनयन याचा अर्थ गुरूपाशीं विद्याभ्यासाकरितां नेणें. या समारंभाच्या शेवटीं मुलाला गुरुगृहीं अत्यंत साधेपणानें, म्हणजे भिक्षा मागून चरितार्थ चालविण्याची दीक्षा देण्यांत येई व नंतर त्याला गुरुगृहीं पाठविण्यांत येत असे.

मुलगा सात आठ वर्षांचा होईपर्यंत त्याचे गुरु म्हणजे आईबापच. या वयापर्यंत मुलांना जितक्या शिक्षणाची आवश्यकता असे तितकें शिक्षण देण्यास आईबाप समर्थ असत. पण यानंतर निरनिराळ्या विषयांचें विशेष शिक्षण देणें हें काम 'येरा गबाळाचे' नसल्यामुळें, त्याला गुरुगृहींच पाठवावें लागे. त्या काळीं ठिकठिकाणीं विद्वान् गुरुंचे आश्रम असत. तशींच तक्षशिला, काशी, इत्यादि ठिकाणीं विशाल विद्यापीठें असत व या आश्रमांत आणि विद्यापीठांत सर्व प्रांतांतून, कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंतचे विद्यार्थी विद्याभ्यासासाठीं येत. या वयांत सर्व प्रकारचें सामर्थ्य वाढविणें अवश्यच असतें. या वयांत इतर कोणत्याही गोष्टी-कडे लक्ष द्यावयाचें नाहीं असा गुरुजनांचा दंडक असे. विद्या, कला व शास्त्रें शिकण्याचा हाच समय; शरीरसामर्थ्य व बुद्धिसामर्थ्य वाढवावयाचें तें याच वयांत; याच वयांत तेजस्वी व आरोग्यसंपन्न व्यक्तिमत्व घटवावयाचें; या कालांत घरादाराची किंवा अन्नावस्त्राची काळजी भासतां कामा नये; याकरितां घरापासून दूर अशा आश्रमांत अत्यंत साध्या अशा अन्नावस्त्रावर ठेवण्यांत येई, व पडेल तें काम करून व मिळेल तें खाऊन रहावें लागत असल्यानें, सर्व प्रकारचे प्रसग आनंदानें व हंसतमुखानें सहन करण्याचा कणखरपणा अंगीं येत असे. कोणत्याही प्रसंगाला डरण्याची बात नाहीं.

तत्त्वत: या आश्रमांत श्रीमंत आणि गरीब असा भेद नसे. प्रत्येकाला अंगभर काम व अभ्यास करावाच लागे. सम्राटाच्या मुलालादेखील तेंच काम, तेंच जेवण व तीच वागणूक. विद्यार्थिदशेंत गरिबाप्रमाणें श्रीमंतालाही विद्या-शास्त्रें शिकणें अपरिहार्यच असल्यामुळें गरिबी श्रीमंती हा भेद असतां कामा नये. पहिल्या तीन वर्णांतील प्रत्येक मुलाचें उपनयन झालेंच पाहिजे व गुरुगृहीं राहून त्यानें विद्याभ्यास केलाच पाहिजे, असा धर्मशास्त्राचा नियम होता. त्यामुळें पहिले तीन वर्ण पूर्णतया सुशिक्षित असत. हा शिक्षणक्रम वयाच्या सुमारें वीस ते चोवीस वर्षांपर्यंत चाले. वेदाध्ययन, धनुर्विद्या, शास्त्रें, कला, राजकीय व सामान्य ज्ञान, यांचें शिक्षण देण्यांत येई.

अशा प्रकारें विद्या, बल आणि शील कमावून विद्यार्थी २० ते २४ व्या वर्षाच्या सुमारास गुरूची अनुज्ञा घेऊन स्वगृहीं जाई व यानंतर गृहस्था-

श्रमास सुरुवात होत असे. हा आश्रम सर्वांत महत्त्वाचा असें समजलें जातें. याच आश्रमांत माणसाला इहलोकींची सर्व सामाजिक व वैय्यक्तिक कर्तव्यें करावयाचीं असतात. ब्रह्मचर्याश्रमांत विशेषतः वैय्यक्तिक कर्तव्यें अधिक असत, तर गृहस्थाश्रमांत सामाजिक कर्तव्यांना अधिक महत्त्व असे. याचमुळें गृहस्थाला सर्व प्रकारचीं कर्तव्यें पार पाडून आपलें ऋण फेडावें लागे. हा कर्तव्यप्रधान आश्रम असून हीं कर्तव्यें नाना प्रकारचीं असत.

या आश्रमांत चार पुरुषार्थ व तीन ऋणें यांविषयींचीं कर्तव्यें मुख्यतः बजावावीं लागत. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष, या चार पुरुषार्थांचें साधन करतां करतांच माणसाची सर्व सामाजिक व वैय्यक्तिक कर्तव्यें पार पाडलीं जात. धर्म आणि अर्थ यांचें संपादन करून सामाजिक कर्तव्यें पार पाडावयाचीं व काम आणि मोक्ष यांचें साधन करून वैय्यक्तिक कर्तव्यें पार पाडावयाचीं असत. धर्म आणि अर्थ यांना मोठा व्यापक अर्थ आहे. धर्म याचा अर्थ कर्तव्य असाच होतो. धर्माचरणांत दान व परोपकार यांना मोठें मानाचें स्थान आहे. समाजांत ज्यांना सहाय्याची गरज असते त्यांना यावच्छक्य सहाय्य करणें हें महान् धर्माचरण होय. गृहस्थानें अतिथी, ब्रह्मचारी, संन्यासी, याचक व नोकरमाणसें, यांना प्रथम भोजन घालून मगच अन्नसेवन करावें, असा गृहस्थाश्रमाचा बाणा असे. पीडितांची सेवा करणें हेंही गृहस्थाचें कर्तव्यच होय. या सर्व कार्यांकरितां अर्थाची म्हणजे पैशाची जोडणी करणें आवश्यक आहे. पैसा व मानमान्यता मिळविण्याकरितां गृहस्थानें सतत प्रयास करावा; पण या पैशाचा विनियोग योग्य कार्यांतच झाला पाहिजे. पैशाचा सांठा करणें हें सर्वस्वीं निंद्य मानलेलें आहे. आपल्या कुटुंबाचा चरितार्थ उत्तम रीतीनें चालवून, जें धन शिल्लक राहील त्याचा दानधर्मांत विनियोग केला पाहिजे. आपला चरितार्थ चालविण्याकरितां व असहाय्यांना सहाय्य करण्याकरितांच पैसा मिळवावा. अर्थ म्हणजे नुसतें द्रव्यच नव्हे, तर इहलोकींचीं इतर जीं बाह्य सुखें असतील तींही मिळविलीं व अनुभविलीं पाहिजेत.

काम या पुरुषार्थाचें साधन म्हणजे आपलें मानसिक व शारीरिक सुख मिळविणें. समाजांतील विविध नातींगोतीं व ऋणानुबंध, स्नेहीसोबती, यांजपासून आपणांस अत्यंत समाधान प्राप्त होतें. हें सुख अधिकांत अधिक

मिळविणें, म्हणजेच काम या पुरुषार्थाचें साधन होय. आपल्या कुटुंबांतील माणसांना सुखांत ठेवणें, त्यांच्याकरितां प्रयास करणें व त्यांच्या सहवास-सुखाचा आस्वाद घेणें, यांत जीवनांतील मोठा आनंद सांठविलेला असतो. याचाच अर्थ कामसाधन. कामसाधनानें संतति निर्माण करून पितृ-ऋण फेडलेंच पाहिजे.

कर्तव्यतत्परतेनें धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचें साधन करून त्यांपासून निवृत्त झाल्यानंतर मोक्ष या पुरुषार्थाच्या साधनाला खरी सुरुवात होते व याचा मुख्य संबंध तिसऱ्या व चौथ्या आश्रमांतच येतो. गृहस्थाश्रमांतील कर्तव्यें पार पाडल्यानंतर, उतार वयांत माणसानें संसाराच्या गुंतागुंतींतून व पाशांतून आपली सुटका करून घ्यावयास लागावें. या वयांत शरीरसामर्थ्य कमी झालेलें असतें व या पाशांत गुंतल्यामुळें अधिकाधिक त्रासच होत जातो. या वयांत आपलीं पोरेंबाळेंही संसाराची धुरा वहावयास समर्थ झालेली असतात. त्यांना त्यांचें कर्तव्य करण्यास वाट पूर्ण मोकळी करून दिली पाहिजे. दगदगीपेक्षां शांतपणानेंच समाधान मिळविलें पाहिजे. गृहस्थाश्रमांत वाहिलेली धुरा हळू हळू दूर करून संसारांतून मोकळें होण्याच्या व वनास निघावयाच्या तयारीलाच वानप्रस्थाश्रम असें नांव आहे. सर्व-संग परित्याग करून वनाला निघण्याची तयारी झाल्यानंतर सपत्नीक अगर एकट्यानेंच वनांत जावयाचें व सर्व जगताशीं संबंध तोडून सुखदुःखाची पर्वा न करतां निव्वळ मोक्षसाधना करावयाची. संन्याशाला कोणतेंही बंधन असतां कामा नये. त्यानें आपला सर्व वेळ ईश्वरचिंतनांत घालवीत प्राणत्याग केला पाहिजे. हाच खरा संन्यासाश्रम होय.

प्रकरण चौथें

# संस्था, परंपरा व चालीरीती

मानवी जीवनांत समाजाचें स्थान आणि कार्य हीं किती महत्त्वाचीं आहेत व हें कार्य करण्याकरितां श्रमविभाजनाची किती आवश्यकता आहे, हें आपण पाहिलें. आतां हें कार्य कसें चालविलें जातें याचा विचार करावयाचा आहे.

## संस्था

आपलें उद्दिष्ट साधण्याचे तीन मार्ग आपण पाहिलेच आहेत. पहिला माग म्हणजे कुणाचेंही सहाय्य न घेतां स्वतंत्रपणें कार्य करणें; दुसरा, इतरांना विरोध करून; व तिसरा म्हणजे इतरांशीं सहकार्य करून. यांपैकीं पहिले दोन्ही मार्ग फारसे फलदायक नाहींत; पण तिसऱ्या मार्गानें प्रचंड कार्यें पार पाडतां येतात. या सहकार्याच्या मार्गाचा परिपाक म्हणजेच समाजांतील संस्था, परंपरा व चालीरीती होत. प्रत्येक माणसाचे कांहीं निश्चित उद्देश ठरलेले असतात व ते संपादन करण्याकरितां तो प्रयत्न करीत असतो. अशा उद्देशांत बरेचसे समानच निघतात. असे समान उद्देश साधण्याकरितां प्रयत्न करणाऱ्या कांहीं व्यक्ती एकत्र येतात व परस्परसहकार्यानें तें उद्दिष्ट संपादण्याचें ठरवून एकादी संघटना तयार करतात. अशा संघटनेलाच संस्था असें नांव आहे.

सामाजिक कार्याचा बराच मोठा भाग अशा संस्थांमधूनच पार पडतो. हें कार्य बहुविध स्वरूपाचें असतें. सामाजिक, राजकीय, आर्थिक व नैतिक या स्वरूपाच्या अत्यंत व्यापक अर्थांतही हें सामावणार नाहीं. शिवाय या प्रत्येक विभागांतच सहस्रावधि विविध कार्यांचा समावेश होतो. आर्थिक विभागाचेंच उदाहरण घेतलें तर, शेतकी व तीमधील सहस्रावधि व्यवहार, खाणीकाम, यंत्रोद्यम व अनेक प्रकारचे इतर व्यवसाय, व्यापार, व्यवहार, बांधकामें, इत्यादि लक्षावधि कामांचा आर्थिक व्यवहारांत समावेश होतो. या सर्व प्रकारच्या कार्यांकरितां निरनिराळ्या संस्थांची आवश्यकता असते. निव्वळ व्यक्तीकडून या कार्यांतील अणुही पार पडणार नाहीं. इतरांच्या सहकारानें हीं कार्यें करतां येतात.

" समानशीले व्यसनेषु सख्यम् " या न्यायानें, समानगुण व समान उद्देशाचीं माणसें एकत्र येऊन कार्य करतात. दोन माणसांचें उद्दिष्ट जर अभिन्न ( Identical ) असेल, तर बहुधा त्यांच्यांत विरोध येईल; पण जर उद्दिष्ट समान असेल तर त्यांच्या परस्परसहकारानेंच तें लवकर साध्य होईल. यामुळेंच समान उद्देशाचीं माणसें एकत्र येऊन आपला उद्देश साध्य करण्याकरितां संस्था उभारतात. अशा संघटनेंतील श्रमविभाजनामुळें किती फायदा होतो, हें आपण पाहिलेंच आहे. " गुणकर्मविभागशः " व्यक्तींचे गट पडतात व या गटांनाच संघटनेमुळें संस्थेचें स्वरूप येतें. मागच्या प्रकरणांतील टांचणीच्या कारखान्याचें उदाहरणच पाहिलें तर, या दहा कारागिरांत टांचणी करण्याचें कौशल्य व ज्ञान हा सामान्य गुणधर्म असल्यामुळें ते सर्व एकत्र आले व त्यांनीं कळत न कळत आपली एक संघटित संस्था बनविली हें दिसून येईल. टांचण्या तयार करणें, हें त्यांचें तत्कालिक उद्दिष्ट होय. या दहांच्या सहकार्यामुळें किंवा श्रमविभाजनामुळें टांचण्या किती भराभर होतात, हेंही आपण पाहिलेंच आहे. अशी संघटना म्हणजेच संस्था.

[ यावरून जातींचें प्रारंभींचें स्वरूप व संस्था यांतील साम्य लक्षांत येईल. जाती या खरोखरी पाहतां संस्थाच होत; पण कांहीं विशिष्ट रूढींच्या दडपणामुळें त्यांचें स्वरूप कालान्तरानें अत्यंत विकृत झालें. जातिव्यवस्थे-

च्या सुरुवातीपासूनच समाजाच्या विशिष्ट स्वरूपामुळें अशा प्रकारच्या विचित्र रूढी या संस्थांवर आपला प्रभाव गाजवूं लागल्या व शेंकडों वर्षांनीं या सहकारी संस्थांचें रूपांतर धार्मिक अंध रूढींत झालें. प्रारंभींचा समाज जर एकजिनसी असता, तर या व्यवस्थेचें स्वरूप प्रचंड संस्थांतच दिसलें असतें. ]

प्रत्येक संस्थेला विशिष्ट उद्दिष्ट हें असलेंच पाहिजे, समाजांतील कोणतीही संस्था पाहिली तरी, हें दिसून येईल. विशिष्ट उद्देशाखेरीज संस्था अस्तित्वांत येऊंच शकत नाहीं. अशा उद्देशानेंच संस्थेची सुरुवात होते. समान साध्याकरितां प्रयत्न करणारीं माणसें एकत्र आल्यानेंच संस्था उदयास येते, वाढते व प्रगत होते. ठराविक माल उत्पन्न करण्यासाठीं कारखाने उभारले जातात; शिक्षणाच्या उद्देशानेंच विद्यालयें, महाविद्यालयें व विद्यापीठें, इत्यादि शैक्षणिक संस्था स्थापिल्या जातात; रुग्णशुश्रुषेकरितां रुग्णालयें, व्यायामाकरितां आखाडे, मनोरंजनाकरितां चित्रपट, नाटक, इत्यादि दाखविणाऱ्या संस्था, कलाविकासाकरितां कलामंडळें, गायनसमाज, आर्थिक हिताकरितां निधिसंस्था ( Banks ), सहकारसंस्था, विश्वस्त संस्था, इत्यादि संस्था विविध उद्देशानें विविध कार्य करीत असतात. सामान्य वाक्प्रचारांत संस्था या नांवानें अपरिचित अशा कांहीं संस्था असतात; उदाहरणार्थ कुटुंब, खेडें, शहर, इत्यादि संघटना यादेखील व्यापक अर्थानें संस्थाच होत. त्याचप्रमाणें ‘ संस्थान ’, ही देखील एक संस्थाच होय. संस्था ही तिच्या उद्दिष्टाप्रमाणें छोटी अगर मोठी असते; राष्ट्रासारखी ती प्रचंड व सर्वव्यापी आणि विविध कार्यांनीं युक्त अशी असेल किंवा दोन माणसांच्या पातीदारीप्रमाणें अगदीं लहान व एकादेंच कार्य करणारीही असेल; ती सार्वजनिक असूं शकेल, किंवा खासगीही असेल.

## संस्थान आणि कुटुंब

अशा सर्व लहानमोठ्या संस्था आणि व्यक्ती मिळूनच समाज होतो आणि या समाजाचें संरक्षण करून त्यांत व्यवस्थितपणा व शांतता राखण्याकरितां जी एक व्यापक संघटना असते, तिलाच संस्थान म्हणतात. अशा प्रकारच्या कांहीं अत्यंत महत्त्वाच्या संस्था फार पुरातन कालापासून विकास

आवत आल्या आहेत. माणसाच्या परिस्थितींतून व गरजांतून त्यांचा उगम झाला व त्या परिस्थितीच्या व गरजांच्या विकासाबरोबर त्यांचाही विकास झाला. माणसाच्या कांहीं गरजा अति महत्त्वाच्या व अनिवार्य असतात व पर्यायानें त्यांविषयींच्या संस्थाही अति महत्त्वाच्या असणारच. प्राण्याच्या अगदीं प्राथमिक गरजा म्हणजे जीवितरक्षण, पालनपोषण व वंशरक्षणाकरितां प्रजोत्पत्तीची व्यवस्था, या होत. जीवितरक्षणाचें कार्य संस्थान करतें व पालनपोषण व वंशरक्षण यांची व्यवस्था कुटुंबसंस्थेंतून होते. कुटुंबसंस्थेवर एका कुटुंबाचीच जबाबदारी असते. म्हणजे प्रत्येक कुटुंब आपापली व्यवस्था पहात असतें. त्यामुळें जबाबदारीही तितकी विभागली जाते. पण संस्थानावर सर्व समाजाची जबाबदारी असल्यामुळें कार्यक्षेत्र अत्यंत व्यापक असतें. समाजव्यवस्थेंत थोडासा जरी गोंधळ उत्पन्न झाला तरी सर्व समाजास उपद्रव सहन करावा लागतो. याकरितां ही व्यवस्था अत्यंत काटेकोर कसोशीनें करावी लागते, व त्यासाठीं निश्चित नियम करावे लागतात, व ते एकनिष्ठतेनें पाळणें हें व्यक्तीचें व समाजाचें कर्तव्य होय, व ते योग्य प्रकारें पाळले जातात कीं नाहीं हें पाहणें हें संस्थानाचें कर्तव्य होय. संस्थानाचे नियम किंवा 'आदेश' ( Law ) म्हणजे समाजाचेच नियम. "उद्धरेदात्मनात्मानम् । नात्मानमवसादयेत्" या उक्तीप्रमाणें संस्थानानें समाजाचें रक्षण करावयाचें म्हणजे समाजानेंच आपलें रक्षण करणें होय. कारण संस्थान म्हणजे समाजाचा प्रतिनिधि व सेवक. म्हणून संस्थानाचे 'आदेश' निष्ठेनें पाळणें हें फार महत्त्वाचें कर्तव्य होय. याचकरितां इतर सर्व संस्था व व्यक्ती यांहून संस्थान श्रेष्ठ मानलें जाते, यांत आश्चर्य नाहीं.

समाजाचें रक्षण, पालनपोषण व उन्नति यांकरितां संस्थान ही संस्था निर्माण झाली. याचप्रमाणें व्यक्तीचें रक्षण, पालनपोषण व उन्नति यांसाठी कुटुंब संस्था निर्माण झाली. समाजाचें संस्थानाशीं जें नातें आहे, तेंच व्यक्तीचें कुटुंबाशीं आहे असें मानतां येईल. संस्थानाचें व कुटुंबाचें कार्य बरेंचसें समान आहे. संस्थानाचें कार्य अत्यंत व्यापक असल्यामुळें, प्रत्येक माणसाकडे व्यक्तिशः लक्ष देणें हें त्यास शक्य असत नाहीं व इष्टही असत

नाहीं, याचकरितां कुटुंब हें व्यक्तिदृष्ट्या एखाद्या छोट्या आटोपशीर संस्थानासारखेंच होय, असें म्हणतां येईल. व्यक्तीच्या आयुष्याचा बराच मोठा भाग कुटुंबांतच व्यतीत होतो व त्या मानानें तिच्या व्यक्तिमत्वावर कुटुंबाचा परिणाम होत असतो; इतकेंच काय पण असेंही म्हणतां येईल कीं, कुटुंब हें संस्थानाहून पुष्कळ प्रकारें श्रेष्ठ आहे. समाजांतील प्रत्येक घटक प्रथमतः कुटुंबांतच तयार होतो व त्याचे आचार आणि विचार यांवर कुटुंबाचा जबरदस्त परिणाम होत असतो. यावरून असें म्हणतां येईल कीं, पर्यायानें समाजाचा वाट पुष्कळ अंशीं कुटुंबांतच आकार धरतो.

समाजरचना अशी अनेकरंगी व विषमांगी असते. तिचे निरनिराळे अवयव व घटक हे अत्यंत चित्रविचित्र आहेत. तिचें " विश्वरूपदर्शन " होण्यास एका रीतीनें "दिव्यनेत्र"च पाहिजेत. या रचनेच्या विविध स्वरूपाचें संपूर्ण आकलन अद्याप कुणासही झालेलें नाही. इतकी विविधता व इतकें वैचित्र्य सृष्टींत इतरत्र क्वचितच आढळतील. नाना प्रकारच्या व्यक्ती, नाना तऱ्हेच्या संस्था, प्रत्येकीचें निरनिराळें कार्य आणि या सर्वांमधून वाहणारे विविध विचारप्रवाह, यांच्या सरमिसळीने समाज इतका अनेकरंगी बनला आहे. प्रत्येक संस्था आणि व्यवस्था यांच्या विशिष्ट परंपरा (Institutions) यांमुळेंही समाजाच्या वैचित्र्याला मदतच होते. " समाजांत कार्य करण्याची जी रूढ पद्धति असते तिलाच " परंपरा " असें नांव आहे. "

अशा परंपरा, चालीरीती, रूढी व प्रचार यांनी समाजाची आडवी उभी वीण विणलेली असते. वरून वरून पाहणाराला सुंदर रेशमी वस्त्राचा मोहक रंगच तेवढा दिसावा; पण नाजूक पोत व धागे दिसूं नयेत, त्याप्रमाणें समाजाचे अवयव व घटक चट्कन नजरेंत भरतात; पण समाजांतलि अन्तरंगांत सतत सरस्वतीप्रमाणें स्त्रवणारा परंपरा व चालीरीती यांचा पाझर एकदम लक्षांत येत नाहीं. या परंपरा व चालीरीती यांमधून समाजाच्या जीवनाचें सम्यग्दर्शन होतें. जीवनांतील प्रत्येक हालचालींत, कृतींत व विचारांत ह्यांचें प्रतिबिंब पडलेलें असतें. नुसत्या कुटुंबसंस्थेचेंच उदाहरण घेतलें तरी सहस्रावधि परंपरा व प्रत्येकीचे हजारों प्रकार आढळतील. आपल्याच कुटुंबाचा सकाळपासून रात्रीपर्यंतचा कार्यक्रम टिपून ठेवून

पाहा; या कार्यक्रमांत नानाविध चालीरीती व परंपरा आपल्याला दिसून येतील; तसेंच आपले सामान्य व्यवहार व उद्योग यांतही त्यांचा प्रकर्ष आपल्याला आढळून येईल. आपले मित्र, नातेवाईक किंवा परिचित लोक भेटतांच आपण त्यांना नमस्कार करतों. या चालींतच कितीतरी वैचित्र्य दिसतें. प्रत्येक समाजाची आदरदर्शनाची पद्धत निराळी असते. कांहीं शिरस्त्राण काढतात, तर कांहीं पादत्राण काढतात; कांहीं हस्तांदोलन करतात, तर कांहीं मिठी मारतात; कांहीं नाक परस्पराशीं घासतात, तर कांहीं जीभ बाहेर काढतात; कांहीं दोन्ही हात जोडतात, तर कांहीं एक हात वर उचलतात. जेवणाच्या अनेक पद्धती पहा; कांहीं लोक टेबल-खुर्चीवर जेवतात, तर कांहीं जमिनीवर बसतात; जमिनीवर बसण्याच्या पद्धती तरी किती निरनिराळ्या! आपण हिंदु लोक सामान्यतः आसनमांडी घालून पाटावर बसतों, तर चिनी व जपानी लोक वीरासन घालून बसतात. आपण हातानें अन्न उचलून खातों, तर चिनी व जपानी काड्या वापरतात व पाश्चात्त्य लोक कांटे-चमचे वापरतात. खाण्याच्या पदार्थांत तर वैचित्र्याची कमालच असते. प्रत्येक समाजांत अशा लक्षावधी चालीरीती प्रचलित असतात व त्यांमधून समाजाचें प्रत्यक्ष कार्य चाललेलें असतें. या सामान्य चालीरीतींप्रमाणेंच नाना परंपरा समाजांत रूढ असतात. अन्तःसंबंधी व बाह्यसंबंधी ज्ञाती, गोत्र व सपिंड निर्बंध, विधवाविवाहविरोध, बालविवाह, इत्यादि प्रधान परंपरा दर्शवितात.

'संस्था' हा शब्द आपल्या भाषेंत अनेकार्थी वापरला जातो. पण आपल्या व्याख्येप्रमाणें या शब्दाला एकच निश्चित अर्थ येतो. 'विशिष्ट उद्देशानें कार्य करणारा संघटित समूह,' अशी आपण 'संस्था' या संज्ञेची व्याख्या केली आहे. या अर्थानें कुटुंबाला संस्था असें म्हणतां येईल; पण विवाह, वंशदाय किंवा गृहव्यवस्था यांना संस्था म्हणतां येणार नाहीं. विवाह किंवा वंशदाय हा कांहीं एकादा समूह होऊं शकत नाहीं. यांना पद्धति किंवा परंपरा असें म्हणतां येईल.

परंपरा व चालीरीती ( Customs ) यांत पण भेद आहे. हा फरक मात्र कांहीं अंशांचाच आहे असें म्हणावें लागेल. परंपरा या फार प्राचीन असून,

अधिक सन्मान्य व विशेष महत्त्वाच्या कार्यपद्धती होत. विवाहाला आपण परंपरा म्हणूं; पण नमस्काराला चाल किंवा प्रघात असें म्हणणेंच अधिक सयुक्तिक ठरेल. 'पद्धति' हा शब्द परंपरा व चालीरीती या दोन्ही अर्थानें वापरतां येण्यासारखा आहे. परंपरानिहित संबंध हे सामाजिक असोत कीं वैय्यक्तिक असोत, त्यांना सामाजिक महत्त्व असतें; पण चालीरीतींना विशेषत: वैय्याक्तिक महत्त्वच असतें. उदाहरणार्थ, विवाहपद्धतींत जर आपण एकदम फरक केला तर तात्काळ आपल्या समाजाचें लक्ष आपल्याकडे लागून राहील व कदाचित् समाजाचा रागही आपणास सहन करावा लागेल. तेंच जर नमस्कार करण्याच्या पद्धतींत आपण बदल केला, तर कांहीं व्यक्तीच मात्र तिकडे लक्ष देतील. याप्रमाणें परंपरेला सामाजिक महत्त्व व मान्यता हीं अधिक असतात व तिच्या परिपालनाविषयीं समाज अधिक तत्पर व दक्ष असतो.

## संस्थांचें प्राचीनत्व

मानवी समाज आणि कांही संस्था या मानवाइतक्याच प्राचीन आहेत. कांहीं प्राणिविशेषांतदेखील समाजाचे आस्तित्व दिसून येतें. मुंग्या, मुंगळे, माकडें, यांचेही समाज असतात. त्यांचीही समाजव्यवस्था चांगली सुसंघटित असते. यावरून, समाज ही निव्वळ मानवाविशिष्ट निर्मिति आहे असें मानण्याचें कारण नाहीं, हें दिसून येईल. अगदीं प्राचीन माणसेंही कुटुंब करूनच रहात, व अशा कुटुंबांचे गटही एकत्र रहात असत, असें आढळतें. प्रत्येक माणसाने वेगळें राहण्याची परिस्थिति कधीं काळीं असेल असें वाटत नाही. मानवी अपत्यें स्वतंत्रपणें कार्यक्षम होण्यास बराच अवधि लागतो, व त्यापूर्वीं तीं सर्वस्वीं आईबापांवर अवलंबून असतात व कार्यक्षम होईतोंपर्यंत त्यांचें पालनपोषण करणें, ही एक सहजप्रेरणाच माणसांत असते. यामुळें या प्रदीर्घ कालावधींत आईबाप व मुलें यांमध्यें एक नैसर्गिक स्नेहतंतु निर्माण होतो व कार्यक्षमतेनंतरही मुलें आईबापांपासून दूर जाऊं इच्छित नाहींत व निसर्गत:च कुटुंबसंस्था निर्माण होते.

मागच्या प्रकरणांत समाजाच्या प्रगतीचा विचार करतांना, समाजाला कोणकोणत्या विविध स्थित्यंतरांतून जावें लागलें आहे, हें आपण पाहिलें.

अति प्राचीन काळीं समाज अगदीं साधा असा होता, व गुंतागुंत किंवा भानगड अशी फारशी नव्हतीच. समाजाच्या गरजा पण अगदीं सामान्य व प्राथमिक अशा होत्या. पण तरीही त्या साध्य करण्याकरितां अविश्रांत प्रयत्न व श्रम करावे लागत. प्रारंभीं तर कसाबसा निर्वाह करणें, व थंडीवाऱ्या-पासून निवारा पाहणें, हीं दोनच मुख्य कार्यें. पण त्यांकरितां कोण प्रयास करावे लागत! त्या काळीं श्रमविभाजन नव्हतें व इतर कोणतीं साधनेंही नव्हतीं. प्रत्येकाला आपल्या सर्व गरजा आपणच भागवाव्या लागत. यामुळें माणसाचा सर्वच वेळ अन्न जमा करण्यांत व आत्मसंरक्षण करण्यांत खर्च होत असे. शेंकडों वर्षांच्या धडपडीनंतर व अनुभवानंतर तो हळूहळू साधनांचा उपयोग करूं लागला व त्यानें अधिकाधिक साधनें हस्तगत केलीं. या उत्कर्षाबरोबरच मानवी समाजही वाढत होता व नवे नवे प्रश्न उद्भवत होते. या नाना प्रकारच्या कार्यांतूनच संस्थांचा उगम झाला. श्रमविभाजन व गत पिढ्यांचा अनुभव यांच्या सहाय्यानें माणसानें आपल्या कार्याचा व्याप वाढविण्यास सुरुवात केली. समाजाचे हे सर्व प्रश्न सोडविणारे पुढारी निर्माण झाले व त्यांचें महत्त्व वाढूं लागलें. संकटकाळीं सर्वांची एकजूट करून मार्ग दाखविणें व संकटनिवारण करणें, यासारखें महत्त्वाचें कार्य हे पुढारी करीत. त्यामुळें इतर सामान्य लोक त्यांचा शब्द पाळीत हे पुढारी आपल्या-मधील इतरांना प्रत्येकाच्या ऐपतीप्रमाणें कामें वांटून देत व हे प्रतिनिधी ज्ञातींतील इतर लोकांना सहकारार्थ पाचारण करीत. कांहीं कालानें वेगवेगळीं कामें करणारे हे समूहच संस्थारूप झाले. अशा पुढारीपणांतूनच पुढें राजसंस्था उदयास आली व इतर सामाजिक, राजकीय, आर्थिक, इत्यादि संस्थाही विकासूं लागल्या. नव्या प्रस्तरयुगापर्यंत या संस्थांनीं बरीच आघाडी मारलेली दिसते. या काळीं नाना प्रकारचे उद्योगधंदे सुरू झालेले होते. शस्त्रांचे कारखाने, भांडीं बनविणें, अलंकार घडविणें, घरें बांधणें, नांगर, औतें, इत्यादि साधनें तयार करणें, शेती व व्यापार उदीम करणें, वगैरे बरेच व्यवसाय व तदनुषंगिक संस्था यांची भरभराट झालेली होती. या बरोबरच खेडीं आणि शहरें यांची पण वाढ झाली. खेडीं आणि शहरें या एक प्रकारच्या प्रचंड संस्थाच होत. या विराट संस्थांमध्यें लहानमोठ्या असंख्य

संस्था असतात. त्यानंतर ताम्रयुग व लोहयुग या युगांतही कालमानाप्रमाणें विशिष्ट संस्था निर्माण झाल्या.

**संस्थांचा विकास**

या प्रचंड कालखंडांत या संस्थांचें स्वरूप कालानुरूप बदलत गेलें आहे. बदल हा तर सर्व समाजांचा स्वभावच होय. मग संस्था बदलतात, यांत काय आश्चर्य ? त्यांचें स्वरूपही अंतर्बाह्य बदलत राहिलें आहे. समाजांत बदल होणे, हें किती आवश्यक व अपरिहार्य आहे, हें आपण पाहिलेंच आहे. तोच नियम संस्थांना पण लागू आहे. समाजापेक्षांही संस्था अधिक विकारक्षम पाहिजेत. कारण या मानवनिर्मित असून, त्यांचें अस्तित्व कांही विशिष्ट कार्याकरितां असते. म्हणून जेव्हां त्यांच्या उद्दिष्ट कार्याचें स्वरूप बदलतें, तेव्हां तिच्यांत अनुरूप असा बदल झालाच पाहिजे. उद्योग-धंद्यांचें व सामाजिक कार्याचें स्वरूप आज पार बदलून गेलें आहे. कारागिराच्या घरीं कुटुंबांतील मंडळींच्या साहाय्यानें चाललेले व्यवसाय आज यंत्रावर कारखान्यांत होत आहेत. या विकारानुरोधानें तद्विषयक संस्थांचें स्वरूप बदलत गेलेंच पाहिजे. स्थलकालपरत्वें संस्थांतही हा बदल झालाच पाहिजे.

विविक्त ( Isolated ) समाजांत ही परिस्थिति कांहीशी निराळी असते. इतर बाह्य समाजांशी त्याचा संबंध येत नसल्यामुळें, असा समाज अधिकाधिक रूढिप्रिय होत जातो व विकारविमुख राहतो. बाह्य समाजाशीं जितका अधिक संबंध येईल, तितपत संस्था व परंपरा बदलत जातात व समाज प्रगतिप्रिय होतो. तेच जर बाह्य संबंध तुटला तर त्या दृढ व एकछापी होतात. नव्या संस्था, नव्या परंपरा, नव्या चालीरीती दृष्टिपथांत आल्या तर विचारांना चालना मिळते व समाज आपल्या संस्था, परंपरा व चालीरीति यांच्या गुणदोषांचें विवेचन करूं लागतो, व दोष टाकून, गुण आत्मसात् करण्याकडे त्याची प्रवृत्ति होते. पण जर नवें कांही पहावयास मिळालें नाहीं तर, " तातस्य कूपः " असें म्हणत समाज खारट पाण्यावरच समाधान मानूं लागतो. सामान्यतः समाजाची प्रवृत्ति अनोळखी भुतापेक्षां ओळखीचें बरें म्हणून विकारविरोधीच असते; पण कुणी जर त्याला प्रयोगानें पटवून दिलें

कीं अनोळखी भुतांत अधिक गुण किंवा कमी दोष आहेत, तर तो विचार करूं लागतो. समाजांतील संस्था व परंपरा यांत बदल होण्याचें हें एक मुख्य कारण आहे. या कारणाच्या अभावामुळें विविक्त समाजांत बहुश: संस्था व परंपरा यांचें बरेंच जुनें स्वरूप पहावयास मिळतें. आपल्या देशांतील खेडीं अगदीं परवां परवांपर्यंत पुष्कळशीं विविक्त व स्वयंपूर्ण होतीं. अद्यापही हजारों खेडी तशीं आहेतच. या खेड्यांतून बऱ्याच जुन्या संस्था, परंपरा व चालीरीती पुराण्या अवस्थेंतच आढळतात. यांतील कांहींनीं कालाबरोबर आपला वेग राखून प्रवास केल्यामुळें त्या उपयुक्त आहेत; पण बऱ्याचशा भारभूतच झाल्या आहेत.

## संस्था आणि उद्दिष्टें

आतांपर्यंत आपण संस्थांचे सामान्य स्वरूप पाहिलें. त्या साधनरूप असल्यामुळें उद्देशविहीन संस्था म्हणजे आत्मविरोधी विधानच म्हटलें पाहिजे. यामुळें एकाद्या संस्थेचा सामान्य हेतु याचा अर्थही मर्यादितच असतो. पुष्कळ ठिकाणी मित्रसमाज असतात; त्यांचा कांहीं विशेष उद्देश निश्चितपणें प्रथमत: ठरविलेला नसला तरी, त्यांच्या कार्याचें स्वरूप मर्यादितच असतें. सामान्यत: असे “ समाज ” मनोरंजनाकरितां किंवा ज्ञानसंवर्धनाकरितां असतात. हेच समाजांतील व्यापाराचे किंवा व्यवहाराचें काम करणार नाहींत. कांहीं समानशील लोक एकत्र जमतात व त्यांच्यामधील समानगुणधर्मांभोंवतीं त्या ‘ समाजाचें ’ कार्य फिरूं लागतें. अशा समाजांचा सामान्य हेतुदेखील मर्यादितच असतो.

संस्थांचे हेतु सामान्यत: राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक, नैतिक, मनोरंजक किंवा ज्ञानवर्धक व सांस्कृतिक या सदरांखालीं येतात. पण हे सर्व विभाग किंवा सदरें अन्योन्यव्यापक ( over-lapping ) आहेत; पण सर्वव्यापी ( Exhaustive ) आहेत असें म्हणतां येणार नाही. पण सामान्यत: बहुतेक संस्था यांपैकीं एका किंवा अनेक सदरांखालीं येतात.

पुढील परिच्छेदांत कांहीं संस्था आणि त्यांचे उद्देश दाखविलेले आहेत. मात्र त्या त्या संस्थेचा उद्देश दर्शविल्याप्रमाणेंच मर्यादित असेल असें नाहीं. निर्दिष्ट

उद्देशास मुख्य उद्देश असें म्हणतां येईल. तसेंच कित्येक संस्थांचे उद्देश अन्योन्यव्यापकही असतात. संस्थांच्या उद्देशाला महत्त्व देऊन संस्था या उदाहरणादाखल दाखविल्या आहेत.

| *उद्दिष्ट | *संस्था |
|---|---|
| **(१) अंतिम उद्देश किंवा सामान्यत: निश्चित कार्याकरितां निवडलेले उद्देश:-** | मित्रसमाज, निवासस्थानें, अन्योन्य-सहाय्यक संस्था. परोपकारी संस्था, इ. इ. |
| (अ.) सामान्य हेतू किंवा सामान्य समान-गुणधर्मावर आधारलेले हेतु, | कुटुंब, विवाह आणि रक्तसंबंध यांविषयीं संस्था. |
| (आ) विशिष्ट हेतू:- | |
| (१) शरीरधर्मप्रधान हेतू (क) लैंगिक; (ख) लैंगिकेतर (खाद्य, पेय, वस्त्र, निवारा, शारीरिक आरोग्य व कार्य) | शेतकी, औद्योगिक व व्यापारी संस्था; आरोग्य, औषध व शरीर-विच्छेदनविषयक संस्था. |
| (२) मुख्यत: मानसधर्मदर्शक हेतू:- | |
| (क) शास्त्रीय, शैक्षणिक व तात्त्विक हेतू. | विद्यालयें, महाविद्यालयें, विद्यापीठें, अभ्यासमंडळें, शास्त्र आणि तत्त्वप्रसारक संस्था. |
| (ख) कलात्मक आणि धार्मिक हेतु - | रंगभूमि, कला, संगीत आणि वाङ्मयप्रसारक संस्था; देवळें, धर्मप्रसारक संस्था, संघ, मठ; |
| (ग) सामर्थ्य व प्रतिष्ठाप्रधान हेतू:- | राष्ट्रीय आणि साम्राज्याविषयक संस्था. |
| **(२) परीक्षाहेतू किंवा प्रतिष्ठाप्रधान हेतू यांखेरीज इतर साध्यांकरितां अनुसरलेले हेतू:-** | |

| | |
|---|---|
| (१) आर्थिक हेतू | निधिसंस्था, विश्वस्तमंडळें, विश्वस्त संस्था, व्यापारी मंडळें, सहकारी संस्था, इ. इ. मजूरसंस्था, मालकसंस्था, अनेक प्रकारच्या व्यवसायसंस्था, व (१. आ. ) सदरांत उल्लेखिलेल्या संस्था. |
| (२) राजकीय हेतू | संस्थान, साम्राज्य. |
| (क) ज्ञातिविषयक हेतू | संस्थानाचे विभाग, नगरपालिका, ग्रामपंचायती. |
| (ख) समूहविषयक हेतू | राजकीय पक्षोपपक्ष |
| (ग) विशिष्ट हेतू | एकाद्या विशिष्ट कायद्याच्या प्रसाराकरितां उभारलेल्या संस्था; ज्ञातिप्रतिनिधित्वाकरितां किंवा प्रमाणानुरूप प्रतिनिधित्वाकरितां झटणाऱ्या संस्था. |

प्रत्येक मनुष्य कोणत्या ना कोणत्या संस्थेचा सदस्य असतोच. कांही संस्था अशा असतात की, त्यांची सदस्यता मुलाच्या जन्माबरोबरच सुरू होते व ती अनिवार्य असते. उदाहरणार्थ, संस्थान व कुटुंब या संस्थांतच मुलाचा जन्म होतो. कांहीं संस्थांचें सदस्यत्व सामान्यतः स्वीकारावेंच लागतें. पण इच्छेप्रमाणें तोडण्याची शक्यता असते. उदाहरणार्थ, धर्म, जात, ज्ञाति, इ. संस्थांचें सदस्यत्व. इतर बहुसंख्य संस्थांचें सदस्यत्व ऐच्छिक असतें.

## आधुनिक संस्थांचा व्याप

आधुनिक कालांत संकीर्ण व व्यापक समाजव्यवस्थेमुळें समाजांतील संस्थांचा व्यापही प्रचंड असतो. उद्धृत उदाहरणें हीं फक्त सामान्य वर्गांचीं

* R. M. MacIver " The Elements of Social Science " पानें ७३ – ७४ – ७५.

होत. यांचे शेंकडा प्रकार व उपप्रकार असतात व यांच्या कित्येक शाखा प्रत्येक शहर व खेडे यांतून काम करीत असतात. पुढील परिच्छेदांत या व्यापाचें प्रातिनिधिक स्वरूप म्हणून फक्त " औद्योगिक " ( Industrial ) या उपवर्गांत बसणाऱ्या संस्था किती व्यापक कार्य करतात व किती उद्योग पार पाडतात हें दाखविलेलें आहे. त्यांत फक्त उद्योगांचे प्रकारच उल्लेखिलेले आहेत व या प्रत्येक उद्योगाच्या शेकडों संस्था असतात.

**उद्योगांचें प्रकारः-** *

**संरक्षणविषयक उद्योग :**

१. अग्निशस्त्रें व त्यांचे भाग ( लष्करी, हवाई, व नाविक ). २. शस्त्रास्त्रें, काडतुसें, स्फोटक द्रव्यें, स्फोटास्त्रें, नौभेदक इ. इ. ३. रणगाडे, चिलखती गाडे, व इतर लष्करोपयोगी यंत्रसामुग्री. ४. युद्धनौका व विनाशिका. ५. सर्व प्रकारचीं रणविमानें. ६ युद्धोपयोगी वायु व वायुमुखवटे.

**प्रेरक उद्योग**( Key Industries ):

१. विद्युच्छक्ति ( जलजन्य व उष्णताजन्य ). २. जळण, दगडी कोळसा, लांकूड, खनिज तेलें, अल्कोहोल, नैसर्गिक वायु. ३. धातुः लोहमय व लोहेतर, खाणींतून मिश्रधातू ( ore ) काढणें. ४. यांत्रिक उपकरणांचे धंदे. ५. यंत्रें व त्यांचे भाग बनविणारे कारखाने. ६. नौका, संचारक ( Locomotives ), गाड्यांचे डबे, स्वयंवाहक (automobiles ), विमानें, इत्यादि बांधण्याकरितां प्रचंड कारखाने. ७. साधनें व उपकरणें: व्यापारी, औद्योगिक व शास्त्रीय. ८. रसायने, भारी रसायनें, हलकीं रसायनें-रंग, खतें, इ.

**सार्वजनिक उद्योग :**

१. विजेचा व वायु आणि इतर शक्तींचा प्रसार. २. सार्वजनिक रस्ते आणि वाहनें. ३. पाणी पुरवठा. ४. स्वच्छता राखणें.

**घरगुती उद्योग** ( Cottage Industries ):

---

* National Planning Committee : " Manufacturing Industries " वरून.

१. वस्त्रें ( रेशमी, लोंकरी व सुती ), सूत कांतणें व विणकाम. २. वस्त्रें रंगविणें व खडी काम. ३ कापसांतील सरकी काढणें व साफ करणें. ४. तेल गाळणें. ५. साबण आणि प्रसाधनें. ६. लांकडी सामान व इमारती काम. ७. लेखनाकरितां कागद. ८. साखर. ९. तांदूळ सडणें; तांदळाच्या गिरण्या. १०. तांबें, पितळ व चांदी यांचीं भांडीं. ११. चरबी, कातडी धागे ( guts ) व सरस. १२. कातडीं कमावणें, पादत्राणें तयार करणें. १३. मातीचीं व चिनी मातीचीं भांडीं. १४. कांचेच्या बांगड्या. १५. कांचेचे मणी. १६. चकाकी, रंग व वॉर्निश. १७. किल्ल्या-कुलपें. १८. खिळे. १९. लोहारकाम. २०. कर्तन-साधनें. २१. ताग व तत्सम वस्तू. २२. केंस व धागे. २३. विटा. २४. कौलें. २५. सोनें व रूपें यांच्या तारा. २६. मीठ. २७. खेळणीं. २८. छत्र्या. २९. डिंक, गोंद. ३०. राळ. ३१. काड्यांच्या पेट्या. ३२. छकडे व गाड्या. ३३. खेड्यांतील व्यवसाय. ३४. शिवणकाम. ३५. भरतकाम, विणकाम. ३६ लोकर विणकाम. ३७. बटनें. ३८. गालीचे. ३९. मेवामिठाई. ४०. मुरबे. ४१. दुग्धव्यवसाय.

**घरगुती जिन्नस** ( Household Articles ):

१. यंत्रांकरितां केसांचे पट्टे. २. इतर पदार्थांचे पट्टे. ३. कुंचल्याकरितां केस, धागे. ४. रंग व वार्निशचे कुंचले. ५. सर्व प्रकारचे केस. ६. केसांचे जिन्नस ( प्रसाधनाव्यतिरिक्त ). ७. इतर कुंचले. ८. केरसुण्या. ९. दोर. १०. काथ्या. ११. चटया व जाजम.

लांकडापासून:—१. काठ्या, वेत २. खुर्च्या, इ. इ. ३. मेणबत्त्या. ४. लांकडी चकाकी.

धातूंपासून:– कर्तनसाधनें, लोखंडी पत्र्याच्या बादल्या, घरगुती सामान, एनॅमलचीं भांडीं, साधनें व अवजार ( शेतकीविषयक, यंत्रसाधना-व्यतिरिक्त ), दिवे व त्यांचे भाग, तिजोऱ्या व धातूच्या बळकट पेट्या, शेगड्या, इतर प्रकार.

मातीपासून व चिनी मातीपासून खडू, मातीचीं भांडीं, चिनी मातीचीं भांडीं.

**कापड व तत्संबंधी उद्योग :**

यंत्राचे कापडी पट्टे, बॉबिन्स, तेलकापड, सतरंज्या, पीठ, खळ, चरबी, व तद्भव पदार्थ, इतर चरबी व ग्रीझ.

**सूत :**

तलम सूत: करडे, पांढरें, रंगीत; मर्सेराईझ्ड् कापड; छापील अगर रंगीत छत्रींचें कापड; लेस् व जाळीं; शिवण्याचा व रफू करण्याचा दोरा, तागी धागे; लहानसहान कपडे तयार करणें; रेशीम कच्चें व पक्कें; लोंकर-कच्ची व पक्की; कृत्रिम रेशीम; धागे, विणकाम व कापड; धागे व सूत जलाभेदीकरण ( Water-proofing )

**प्रसाधनें :**

कुंचले; धातूची व इतर बटनें; हिऱ्यामोत्याचें काम; तेलें; सुगंध; साबण व इतर प्रसाधने.

**कांचसामान :**

बांगड्या, मणी, खोटे मोती, बाटल्या, नसराळी, फुगे, कांचेच्या चिमण्या; शास्त्रीय उपकरणें; तावदानें; कांचेचीं भांडीं; इतर कांचसामान; दिवे व कांचा; उपकरणें, अवजारें, साधनें व त्यांचे भाग; विजेचे दिवे व त्यांचे भाग; विजेचे ज्योतिर्दीप ( glow-lamps ); वायुपूर्ण विजेचे फुगे, निर्वात फुगे, इतर प्रकारचे फुगे, विद्युद्दीपांचे भाग व इतर सामान; विजेऱ्या, वगैरे; चष्म्याच्या कांचा.

**खाद्य पदार्थ :**

केशर ( खरें व कृत्रिम ); जिलेटीन; माशाचें तेल; साखर; चहा, कॉफी, कोको व इतर तत्सम पदार्थ; तंबाकू, चिरूट, सिगारेट्, इतर प्रकार; बिस्किटें, केक्स्, मेवामिठाई; तयार अन्नपदार्थ ( दुग्धोद्भव पदार्थांखेरीज ); इतर पदार्थ.

**कातडी सामान :**

यंत्राकरितां कातडी पट्टे; पादत्राणें, कातडीं कमावण्याकरितां साली, कोचिनील, गँबिअर, इ. पदार्थ; कातडी सामान; चकाकी.

**रबरसामान :**

मोटारी, मोटार सायकली व सायकली यांकरितां, नळ्या, धांवा; मोटार-वाहनाकरितां भरींव धांवा; इतर जिन्नस ( पोषाखाखेरीज ), पादत्राणे: तळ व सर्व रबरी; औषधी आणि आरोग्यसाधनें.

**पुस्तकें, इत्यादि :**

गोंद, रंग, रंगसाहित्य, चित्रसाहित्य, कागद, जाड पुठ्ठे; पॅकिंग व रॅपिंग पेपर; ब्राऊन पेपर; रंगीत व घोटीव कागद; मॅनिला व सल्फाईट् पाकिटें, उंची कागद; तेल, मेण व इतर प्रकारें जलाभेद्य केलेला कागद; लेखनाकरितां कागद, पाकिटें व इतर उंची प्रकार; टिपकागद; पेस्टबोर्ड, मिलबोर्ड; कागदास उपयुक्त साहित्य, लांकडी रधा, चिंध्या व इतर जिन्नस; पेन्सिली, टांक, फाउंटन् पेन्स्, छापखान्याकरितां शाई; पत्ते; इ. इ.

ही यादी बरीच लांबवितां येईल. या प्रत्येक वस्तूकरितां कित्येक संस्था कार्य करीत असतात. यावरून या संस्थांचा व्याप किती प्रचंड आहे हें लक्षांत येईल.

## प्रकरण पांचवें

# कुटुंबसंस्था

समाजरचनेंत कुटुंबाचें किती महत्त्व आहे हें आपण पाहिलेंच आहे. " कुटुंब " या सामाजिक घटकाला आपण संस्था असे म्हटलें असले तरी तें सर्वतया योग्य आहे असें नाहीं. इतर संस्थांमध्यें न आढळणारा एक अत्यंत महत्त्वाचा गुणधर्म कुटुंबांत आढळतो व तो म्हणजे नैसर्गिकता. आपण मागील प्रकरणांतच पाहिलें कीं निसर्गतः मानवी अर्भक अत्यंत परावलंबी असतें. व हें परावलंबित्व बराच काळ लांबणें अपरिहार्य असतें. या नैसर्गिक रचनेंमुळेंच आई, बाप व मूल, यांमध्यें एक अकृत्रिम स्नेह-तंतु निर्माण होतो व कुटुंब हा घटक निसर्गतःच बनतो. इतर सर्व संस्था मात्र या दृष्टीनें कमीअधिक प्रमाणांत कृत्रिमच म्हटल्या पाहिजेत. कारण त्यांचा संबंध मुलाच्या जीवनांत बऱ्याच उशीरा येऊं लागतो. आरंभीं कुटुंबाशिवाय इतर कोणत्याही संस्थेचा त्याच्यावर परिणाम होत नाहीं व आयुष्यांतील पहिलीं पांचसहा वर्षें तरी कुटुंब हेंच त्याचें विश्व अशी परिस्थिति असते. शिवाय आयुष्यांतील हा कालखंड अतिशय संस्कारक्षम व दीर्घपरिणामी असतो. या काळांत मुलावर झालेले संस्कार हे कायम स्वरूपाचे असतात. या वयांतील संस्कारांची पकड विलक्षण बळकट असते. अर्थातच इतर कोणत्याही संस्थेचा संबंध या कालांत येत नसल्यानें हे सर्व संस्कार कुटुं-

बांतच होतात. याच अर्थानें वर्ड्स्वर्थनें " Child is the father of the man " असें मुलाचें योग्य वर्णन केलें आहे.

या दृष्टीनें कुटुंबाकडे पाहिलें तर समाज, ज्ञाति व संस्था, या त्रयींचें मिश्रण यांत दिसून येतें. समाजाप्रमाणें नैसर्गिक व अपरिहार्य, ज्ञातीप्रमाणें बह्वंश गरजा पुरविणारा किंवा जीवनाचा मुख्य भाग व्यापणारा व संस्थेप्रमाणें संघटित असा हा घटक आहे. व्यक्तीच्या दृष्टीनें पाहिल्यास, समाज, ज्ञाति व संस्था या तीनही घटकांहून हा घटक अधिक महत्त्वाचा आहे. व्यक्तीचा सर्वांत अधिक निकटचा संबंध कुटुंबाशींच येतो. समाजाच्या दृष्टीनेंही या घटकाचें महत्त्व कमी नाहीं. सर्व प्रकारच्या खस्ता खाऊन समाजसेवेकरितां उत्तम नागरिक तयार करण्याची पाठशाला म्हणजे कुटुंबच. ही जबाबदारी फारच मोठी आहे व ती आजपर्यंत तरी या संस्थेनें कौशल्यानें पार पाडली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

या संस्थेचे प्रकार निरनिराळ्या काळी व निरनिराळ्या देशांत विविध तऱ्हेचे आढळून येतात. पण आपण पाहिलेंच आहे कीं, ही संस्था मानवी स्वभावांतील कांहीं शाश्वत, मूलभूत तत्त्वांवर आधारलेली आहे. त्यामुळें प्रत्येक प्रकारांत कांहीं निश्चित परंपरा आढळतात व त्यांवरच ही संस्था बदलत्या स्वरूपांत का असेना पण महत्त्वाचें सामाजिक कार्य करीत आहे.

ज्यामध्यें कित्येक व्यक्तींचा अंतर्भाव झालेला असतो अशा व्यापक संयुक्त कुटुंबापासून तों पतिपत्नीच्या आटोपशीर " इन् मीन तीन " संसारापर्यंत सर्वांनाच कुटुंब असें म्हणतां येईल; व त्याचा रक्तसंबंध कित्येक इतर कुटुंबांपर्यंत पोंचून त्यांचाही याच्याशीं संबंध येतोच. याकरितां, कुटुंब या शब्दाचा अर्थ निश्चित केला पाहिजे. "ज्या समूहांत संततीचें जनन आणि प्रतिपालन करतां येईल इतपत व्यक्त व लैंगिक संबंध असेल त्यास कुटुंब असें म्हणतां येईल. "

याबरोबरच इतर, समान किंवा गौण नातीं असतील; पण दांपत्याच्या सहवासानेंच कुटुंब तयार होतें व त्यांच्या संततीसह त्यांना एक स्पष्ट एकरूपत्व प्राप्त होत असतें. * अर्थातच ज्या समूहांत असा संबंध किंवा नातें

* R. M.McIver : " Society" : पान १०६

नसेल त्याला कुटुंब म्हणतां येणार नाहीं. कारण, त्यामुळें अशा समूहास संघटित स्वरूप रहाणार नाहीं व कुटुंबविशिष्ट असें कार्यही रहाणार नाहीं. एकत्र राहणाऱ्या अविवाहित पुरुषांच्या किंवा स्त्रियांच्या समूहाला कुटुंबाचें मुख्य लक्षण म्हणजे संततीचें जनन व प्रतिपालन. नुसतें एकत्र व एका घरीं राहून स्वयंपाक करणें व जीवन घालविणें हें कुटुंबाचें मुख्य लक्षण नव्हे. दुसरा प्रश्न असा येतो कीं संततिविहीन दांपत्यें या व्याख्येच्या कक्षेंत येतात कीं नाहीं ? पण थोडा विचार करतांच असें दिसून येईल कीं त्यांना या कक्षेंतून वगळणारा एकही शब्द व्याख्येंत नाहीं.

कुटुंबाच्या लक्षणांपैकीं खालील पांच लक्षणें बहुशः सर्वत्र आढळतात: १ दांपत्यसंबंध; २. दांपत्यसंबंध घडवून आणणारी व चालू ठेवणारी विवाहपद्धति; ३. वंशाचें नांव धारण करणें व वंशावळ; ४. आर्थिक व्यवस्था व ५. बहुशः एकत्र राहण्याकरितां घर अगर इतर सोय.

हीं पांच लक्षणें सर्वत्र आढळत असलीं तरी त्यांचा प्रकार आणि प्रचार प्रत्येक समाजांत वेगवेगळा असतो. दांपत्यसंबधांत कित्येक प्रकार आढळून येतात. वृन्दविवाहापासून सुरू होऊन संस्कार-विवाह, अनेकपत्नीक, अनेकपतिक व एकपत्नीकापर्यंत सर्व प्रकार असूं शकतात. कांहीं समूह अंत:संबंधी असतात तर कांहीं बाह्यसंबंधी. विवाहपद्धतींतदेखील असेंच वैचित्र्य दिसून येतें. वंशासंबंधींहि असेंच म्हणतां येईल. कांहीं ठिकाणीं मातेच्या वंशांतून नांव घेतलें जातें तर अन्यत्र, पित्याच्या. कांहीं कुटुंबें वंशगणना मातेकडून करतात, तर कांहीं पित्याकडून. कांहींत, नवरा वधूगृहीं जातो, तर कांहींत वधू ही पतिगृहीं जाते. कांही ठिकाणीं तर कांहीं दिवस इकडे तर कांहीं दिवस तिकडे असें ठरलेलें असतें. अशा कुटुंबांना अनुक्रमें " मातृनामी, पितृनामी; " " मातृवंशी, पितृवंशी; " व " मातृस्थानी, पितृस्थानी " आणि " उभयस्थानी " असें म्हणतात.

## कुटुंबसंस्थेचा विकास

कुटुंबसंस्था ही प्राणिमात्राच्या स्वभावधर्मावर आधारलेली आहे. त्यामुळें या संस्थेचा जन्म अमुक काळीं झाला असें सांगतां येत नाहीं. वरील व्याख्येप्रमाणें कित्येक पशुपक्ष्यांतही कुटुंबें आढळतात. व मानवप्राणी

तर कधीं काळीं कुटुंबसंस्थेशिवाय असेल हे शक्य दिसत नाहीं. अगदीं प्रथमावस्थेंतही माणूस कुटुंब करुनच रहात असे.

या संस्थेच्या अंगोपांगांचा विकास मात्र वेगवेगळ्या दिशांनीं झाला आहे. प्रथमावस्थेंत, माणसांतील दांपत्यसंबंध हे सर्वस्वीं, इतर प्राण्यांतील लैंगिक संबंधाप्रमाणेंच अनियमित व अनिर्बंध असावेत असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. या अवस्थेंत माणसांत व इतर प्राण्यांत फारसा फरक नव्हता. त्याची विचारशक्ति कोतीच होती व त्याचे सर्व व्यवहार इतर प्राण्यांप्रमाणेंच चालत. असा जर एकादा काल इतिहासांत खरोखरच होऊन गेला असेल तर त्या वेळच्या कुटुंबपद्धतीविषयीं साधारणपणें अनुमान बांधतां येईल, तें असें: अशा अनिर्बंध लैंगिक संबंधामुळें कुटुंब पद्धतींत फार मोठा फरक उत्पन्न होतो. संततीची सर्व जबाबदारी मातेवरच येणार! अर्थातच दांपत्यसंबंध याला कांहीं अर्थच रहात नाहीं. विवाहपद्धति म्हणजेच लैंगिक संबंधाचें नियमन. म्हणजे अशा समाजांत विवाहपद्धति शक्य नाहीं; वंशाचा संबंध दाखवितां येणें शक्य नाहीं; आर्थिक व्यवस्था ही कुटुंबांतील मंडळींनीं पहावयाची असते; पण मातेखेरीज इतर कुटुंबांतील माणसाचा पत्ता लागणें शक्य नसलेल्या लोकांनीं एकत्र राहण्याकरितां कांहीं व्यवस्था केली असणें शक्य नाहीं. एकूण अशा समाजांत कुटुंबपद्धति असण्याची शक्यताच नाहीं. पण कुटुंबव्यवस्था तर प्रथमावस्थेंतही असली पाहिजे हे आपण नुकतेंच पाहिलें आहे. या व्यवस्थेविना मानवी संततीचें योग्य पोषण होण्याची शक्यता फारच कमी. याचकरितां कोणत्याही अवस्थेंत मानवी समाजांत अनिर्बंध संबंध असतील हें अशक्य दिसतें. ज्या प्राण्यांचीं अर्भकें अत्यत परावलंबी असतात व मातापित्याखेरीज ज्यांचे बालपणीं पोषण होणें शक्य नसतें, अशा बहुतेक प्राण्यांत कुटुंबावस्था एका ना दुसऱ्या स्वरूपांत दिसून येते. निदान गर्भधारणेपासून तों मुलें हिंडूंफिरूं लागेपर्यंत तरी लैंगिक संबंध नियमित असतो.

कांहीं समाजांत हे संबंध विविध प्रकारचे आढळून येतात व त्यावरूनच कांहीं लेखकांनीं असें अनुमान केलें आहे कीं प्राथमिक अवस्थेंत मनुष्य-प्राण्यामध्येंही अनिर्बंध लैंगिक संबंध असलेली समाजस्थिति असावी. कांहीं

अरण्यवासी जमातींत समूहविवाह आढळून येतात. या जमातींत कांहीं पुरुष व कांहीं स्त्रिया यांचा एक मर्यादित समूह होतो व अशा समूहांत अनियंत्रित व अनिर्बंध लैंगिक संबंध असतात. अर्थातच अशा समूहांत उत्पन्न झालेल्या संततीच्या पालनपोषणाची जबाबदारी त्या समूहाची. कांहीं समाजांत ( उदाहरणार्थ, तिबेटी समाज ) अनेकपतित्वाची चाल असते. सामान्यतः वडील भाऊच तेवढा विवाह करू शकतो; पण इतर भावांचाही त्या पत्नीवर अधिकार असतो. कांहीं समाजांतील कुटुंबें मातृसत्ताक असतात व अशा कुटुंबांत संततीवर बापाचा अधिकार न चालतां आईचा किंवा आईच्या भावाचा चालतो. कांहीं समाजांत बहुपत्निकत्वाची चाल असते व कांहीं समाजांत एकपत्निकत्वाची पद्धत असते.

या सर्व विविध परंपरा व चालीरीतींवरून या अभ्यासकांनीं वरील सर्व प्रकार यथाक्रम उत्क्रान्त होत गेले असा कयास बांधला. म्हणूनच यांचें म्हणणें असें कीं अगदीं प्रथमावस्थेंत अनियंत्रित लैंगिक संबंध असले पाहिजेत व याची साक्ष आपणांस अद्यापि कांहीं मागासलेल्या समाजांत मिळते. हे समाज प्रथमावस्थेचे निदर्शक होत. यानंतरची विकासाची पायरी म्हणजे अनेकपतित्व. बऱ्याच समाजांत ही परंपरा आढळते. हे समाज अर्थातच पुष्कळच सुधारलेले समजावेत. या विकासाची शेवटची पायरी अर्थातच एकपत्नित्व होय. हे समाज सर्वांत अधिक सुधारलेले होत.

ही उपपत्ति मानवी स्वभावाशीं विसंगत व विसंवादी आहे. सर्वच परंपरा व चालीरीतींचा असा संबंध लावावयाचा झाल्यास आणखी कित्येक उपपत्त्या मानाव्या लागतील. अनियंत्रित लैंगिक संबंध असलेल्या समाजांतील संततीच्या पालनपोषणाची उपपत्ति कशी लावावयाची हा मोठाच प्रश्न आहे. शिवाय या विविध परंपरा त्या त्या समाजाच्या विशिष्ट परिस्थितीमुळें फार नंतर सुरू झाल्या असण्याचीच शक्यता अधिक आहे व कांहींच्या विषयीं तर तसें स्पष्ट दाखवितां येतें. शिवाय "पुरुषाचा मत्सर" हें एक त्रिकालाबाधित सत्य आहे. यामुळें अनियंत्रित लैंगिक संबंध शक्यच होत नाहींत.

एकंदरींत पाहतां, कुटुंबव्यवस्थेच्या विकासाची ही उपपत्ति समाधानकारक वाटत नाहीं.

## मातृशासित व पितृशासित कुटुंबपद्धति

ज्या कुटुंबांतील मंडळीवर मातेची सत्ता चालते अशा कुटुंबास मातृशासित कुटुंब असें नांव देण्याची प्रथा आहे. अति प्राचीन काळीं म्हणजे सामान्यत: प्रस्तरयुगांत माणसाचा प्रमुख व्यवसाय मृगया हा होता हें आपण पाहिलें आहे. या काळांत पुष्कळ कुटुंबें एकत्र रहात असत; त्यांना गण असें म्हणतात. या गणांतील पुरुषवर्ग हा मृगया करी व इतर सर्व प्रकारची घरगुती कामें स्त्रियांकडे असत. पुरुषवर्गाचा बराच काळ अरण्यांत शिकार करण्यांतच जात असे; व कांहीं कांहीं वेळां तर दिवसानुदिवस व मासानुमास हे शिकारी अरण्यांत असत. यामुळें गणांतील मुलांची व इतर मंडळींची व्यवस्था करण्याचें काम अर्थातच स्त्रियांच्याकडे येत असे; व पुरुषवर्गाचा कुटुंबांशीं संबंध जवळ जवळ तुटल्यासारखाच असल्यानें कुटुंबांत आईचीच सत्ता चालत असे. मुख्य पुरुष किंवा बाप घरीं आला तरी मुलांशीं त्याचा विशेष संबंधच नसल्यानें तोही याविषयीं उदासीनच असे. हा प्रकार शेंकडों वर्षें चालू राहिल्यानें मातृशासित कुटुंबपद्धति चालू झाली असें कांहीं तज्ज्ञांचें मत आहे. पण या माताचे विरोधी तज्ज्ञ असें सांगतात कीं, आजच्या कोणत्याही समाजांत अशी पद्धति आढळत नाहीं. सर्वस्वीं मातेची सत्ता असलेलीं कुटुंबें कुठेंच आढळत नाहींत. म्हणूनच ‘ मातृशासित पद्धति ’ हें एक तुटपुंज्या आधाराचें अनुमान आहे. फक्त, आईच्या कुलांतून गणना करणारीं व त्या कुळाचें नांव धारण करणारीं कुटुंबें आढळतात; व अशा कुटुंबांतील मुलांवर खरोखर आईची सत्ता न चालतां तिच्या भावाची किंवा तिच्या कुळांतिल कर्त्या पुरुषाची चालते. मातृशासित पद्धति कधीं काळीं अस्तित्वांत होती व तिच्यांतूनच पुढें पितृशासित पद्धति विकसित झाली असें म्हणण्यास पुरेसा आधार नाहीं. या विरुद्ध कोणत्याही काळीं कुटुंबावर पुरुषाचीच सत्ता चालत असे हें दाखविण्यास मात्र अनेक पुरावे आहेत. मद्रासेंतील नायर जातींत मात्र अशा कांहीं चाली नुकत्याच कायद्यानें बंद करण्यांत आल्या कीं, ज्यांवरून त्या जातींत मातृशासित पद्धति होती असें म्हणतां येईल. या

जातींत वंशार्जित मिळकतीची विभागणी आईच्या कुळाकडून होत असे. एखाद्या पुरुषानें संपादन केलेली मिळकत त्याच्या बहिणीच्या मुलांस जात असे व त्याच्या मुलांस त्यांच्या मामाची मिळकत मिळावयाची. इतकेंच नव्हे तर मुलांवर आईची सत्ता बरीच चालत असे. पण या उदाहरणावरून सर्व कुटुंबें एके काळीं मातृशासित होतीं असें विधान करणें चुकीचें होईल. या उलट या जातीचा इतिहास पाहिला तर हा आधारही नाहींसा होतो. एके काळीं या जातींतील सर्वच पुरुष योद्धे व लुटारू होते असें दिसून येतें; व त्यांचा सर्व काळ घराबाहेरच जाई. यामुळें या जातींत बायकांचेंच राज्य असे व कुटुंबांतील सर्वच कामें त्या करीत. या कामांची पुरुषमंडळींना दादही नसे. या योगानें ते जो थोडासा काळ घरीं काढीत त्या वेळीं त्यांना घराविषयीं कांहींच माहिती नसल्यानें तेही उदासीन राहूं लागले. या विशिष्ट परिस्थितीमुळेंच मातृशासित पद्धति सुरू झाली; मुळांत ती तशी नव्हती.

जगांतील अधिकांश समाजांत पितृशासित पद्धति दिसून येते. निसर्गतः पुरुष हा स्त्रीपेक्षां अधिक बलवान असतो असें मानण्यास हरकत नाहीं; तसेंच निसर्गतः कांहीं विशिष्ट काळांत तरी स्त्री ही पुरुषाहून अधिक परावलंबी असते हेंही मान्य करावें लागेल. या विशिष्ट निसर्गरचनेमुळें पुरुष हा केव्हांही वर्चस्वी किंवा अधिकारी मनोवृत्तीचा असतो. या घटनेमुळें आरंभापासून पितृशासित पद्धति प्रचारांत होती असें दिसून येतें. नंतरच्या काळांत परिस्थितीमुळें कांहीं ठिकाणीं मातृवंशी पद्धति सुरू झाली; पण मूळची रचना पितृशासितच असावी.

अशा कुटुंबावर त्यामधील मुख्य पुरुषाची सत्ता अनियंत्रित चालते, कुटुंबांतील इतर सर्व मंडळींनीं त्याचा शब्द मानलाच पाहिजे, व सर्व व्यवहार त्याच्या मताप्रमाणेंच चालले पाहिजेत. बहुतेक सर्व प्राचीन समाजांत कुटुंबप्रमुखाची ही अनियंत्रित सत्ता आढळते. रोम, ग्रीस, हिंदुस्थान, इजिप्त, इत्यादि देशांत प्राचीन काळीं ही सत्ता फारच विस्तृत असे. कायद्याच्या किंवा धर्मशास्त्राच्या कक्षेबाहेर न जातां तो आपल्या ताब्यांतील मंडळींना कोणतेंही शासन करूं शकत असे. इतकेंच नव्हे तर कांहीं कांहीं देशांत त्याचा शब्द अवमानणाऱ्याला कायद्यांत अत्यंत कडक शिक्षा

सांगितलेली आढळते. प्राचीन रोमन कायद्यांत पित्याचा अवमान करणाऱ्या मुलांस कडक शासन सांगितलेलें आहे. हिंदु, ग्रीक व इजिप्शियन् कायद्यांतही असाच प्रकार दिसून येतो.

पण या विस्तृत अधिकाराबरोबरच त्या सर्वांचा प्रतिपाळ करण्याची जबाबदारीही त्याच्यावरच असे. हवे ते कष्ट करून धनधान्य मिळविलें पाहिजे व कुटुंबाचा चरितार्थ चालविला पाहिजे. नुसते अधिकार व सत्ता कुठेंच आढळणार नाहींत. त्यांच्याबरोबरच कर्तव्य व जबाबदारी हीं येणारच. हीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां त्याला इतर कुटुंबियांचीही मदत हवीच. यामुळें सर्व कुटुंबांतील बहुतेक व्यवहार सहकार्यानेंच होत असत. अनियंत्रित सत्ता वापरण्याचे प्रसंग अपवादात्मकच मानले पाहिजेत.

या कुटुंबांत वंशगणना पितृकुळांतूनच होत असते व पितृकुळाचेंच नांव धारण केलें जातें. त्याचप्रमाणें पतीच्या घरींच वधू राहते; व या दांपत्याची संतति पण त्याच घरीं राहते. हें ओघानेंच आलें. पितृशासित पद्धति पितृवंशी, पितृनामी व पितृस्थानीही असते. या पद्धतींत आणखी एक अत्यंत महत्त्वाची परंपरा असते. ती म्हणजे दायभागाविषयींची होय. वंशसंपादित संपत्ति पुरुषमुलांनाच मिळते. बहुशः मुलींना त्यांतील कोणताही भाग मिळावयाचा नाहीं. अर्थातच ही परंपरा प्रत्येक समाजांत सारखीच असते असें नाहीं. कांहीं समाजांत सर्व मुलांना समान वांटणी असते, तर कांहींत वडील मुलाला अधिक तर इतरांना कमी; अन्यत्र फक्त वडील मुलालाच सर्व संपत्ति दिली जाते व इतरांना आपली व्यवस्था वेगळी पहावी लागते. कित्येक समाजांत मुलींना व इतर नातेवाईकांना पण कांहीं भाग द्यावा लागतो.

## संयुक्तकुटुंबपद्धति

या पद्धतीचा अवशेष विशेषतः हिंदुस्थानांतच आढळतो. कृषिप्रधान समाजांत या पद्धतीला विशेष अवसर असतो. उद्योगप्रधान देशांत समाज अधिकाधिक गुंतागुंतीचा होत गेल्यानें व्यक्तिनिष्ठ समाजरचना होऊं लागते व संयुक्तकुटुंबपद्धतींतील अन्योन्य संबंध ढिले होऊं लागतात. अशा रीतीनें ही पद्धति विलीन होऊन तिच्या जागीं व्यक्तिनिष्ठ पद्धति अस्तित्वांत येते.

हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून संयुक्तकुटुंबपद्धति अस्तित्वांत आहे. फक्त पतिपत्नी व मुलें एवढ्यांचाच वेगळा प्रपंच न मांडतां भाऊभाऊ, त्यांचीं बायकामुलें, बाप, आजोबा, पणजोबा, इत्यादि सर्वच मंडळी एकत्र राहतात. यालाच संयुक्त कुटुंब म्हणतात. अशा कुटुंबांतील प्रमुखच सर्व कौटुंबिक व्यवहार एकाद्या विश्वस्ताप्रमाणें दक्षतेनें चालवितो. प्रत्येक माणसानें आपली मिळकत सामान्य निधींत द्यावयाची व आपल्या गरजे-प्रमाणें त्यांतून विनियोग करावयाचा. "अशा प्रकारें ही पद्धति समाजसत्तावादी समाजाच्या अत्यंत निकटची ठरते. रक्तसंबंधाइतपत धर्म, सामाजिक परंपरा, आर्थिक परिस्थिति व प्रवासांतील अडचणी याही ही पद्धति टिकविण्यास कारणीभूत झाल्या"

या परंपरेनें आजपर्यंत समाजाची सेवा उत्कृष्टपणें केली आहे. समाजाच्या उन्नतीकरितां आवश्यक असे शेंकडों गुण नागरिकांच्या अंगीं बाणविण्यास या परंपरेचा फारच उपयोग झालेला आहे. सहकार्य, काटकसर, चिकाटी, श्रमविभाजन, स्वार्थत्याग, शिस्त, आज्ञाधारकता, नम्रता, सौजन्य, विनय, इत्यादि सद्‌गुण संयुक्त कुटुंबांत राहणाऱ्या माणसाच्या अंगीं आपोआपच येतात. अशा कुटुंबांत सर्वांशींच सहकार्यानें वागण्याचें शिक्षण प्रथमपासूनच मिळतें. दुसऱ्यांचे दोष विसरून गुण स्वीकारण्याची प्रवृत्ति आपोआपच उत्पन्न होते. सहिष्णुतेचा पहिला धडा घरींच मिळूं लागतो. समाज-धारणेस हा गुण अत्यावश्यक आहे. उत्तम प्रकारें चाललेल्या संयुक्त कुटुंबांतील प्रत्येक मनुष्य आपल्या ऐपतीप्रमाणें मिळवितो व गरजेप्रमाणें काटकसरीनें खर्च करतो. वेगळाले संसार मांडण्यांत जो अकारण जादा खर्च होतो तो पण येथें वांचतो. एकीमुळें कुटुंबाचें सामर्थ्य वाढतें. काम करण्यास किंवा इष्ट स्पर्धा करण्यास अधिक उत्साह व चिकाटी प्राप्त होते. खेड्यांत अद्याप अशीं शेंकडों उदाहरणें पहावयास मिळतात. मोठें कुटुंब जर एकीनें चालत असेल तर ते तात्काळ पुढें येतें. असलें कुटुंब शेतांतील कामें भराभर उरकूं शकतें व त्यास पगारी मजूर घ्यावे लागत नाहींत; कामें करतांना आपापल्या बुद्धीप्रमाणें व ऐपतीप्रमाणें प्रत्येक जण भराभर खातें वांटून घेतो व चटाचट सारीं कामें उरकला जातात. शहरवासियांना याचें आश्चर्य

वाटेल; पण खेड्यांत जाऊन प्रत्यक्ष पाहिल्यास या वर्णनांत कोण-तीच अतिशयोक्ति नाहीं हें दिसून येईल. कुटुंबांतील वयस्क, अपंग व अनाथ ( विधवा किंवा आईबापविहीन मुलें ) माणसांना अन्न व आसरा देऊन समाजावरची ही जबाबदारी कुटुंबच पार पाडतें. ही सर्व व्यवस्था स्वार्थत्यागावर आधारलेली आहे. अशा कुटुंबांत एकादा जरी स्वार्थी घटक असला तरी सारी घडी बिघडून जाते व कुटुंबाची विभागणी अप-रिहार्य होते. पण प्रथमपासूनच सहिष्णुतेची शिकवण मिळत गेल्यानें शक्य तों जुळतें घेण्याचीच प्रवृत्ति प्रत्येकांत दिसून येते. आपल्या दायभागपद्धतींतील कांहीं दोष या परंपरेमुळें नाहींसे होतात. वंशाच्या मालमत्तेची अमर्याद विभागणी या पद्धतीच्या योगानें कांहींशी थांबविली जाते. या व्यवस्थेंत सर्वांनाच प्रमुख माणसाच्या व्यवस्थेप्रमाणें वागावें लागत असल्यानें शिस्त, आज्ञाधारकता, नम्रता, सौजन्य, इत्यादि गुण सहजच उत्पन्न होतात. हे गुण सामाजिक वर्तनांत फारच उपयुक्त असतात. समाजाच्या करड्या शिस्तीपेक्षां कुटुंबांतील प्रेमळ सूचनेनेंच हे गुण अधिक दृढतर होतात.

वरील गुण अतिशयच महत्त्वाचे आहेत व ते संयुक्तकुटुंबपद्धतीमुळें साध्य होतात यांत शंका नाहीं. पण ही या प्रश्नाची एक उज्ज्वल बाजू झाली. या प्रश्नाची काळी बाजू पाहणे आवश्यक आहे. कोणतीही संस्था किंवा परंपरा सर्व दृष्टींनीं निर्दोष असणें शक्य नाहीं. प्रत्येकींत कांहीं दोष अपरिहार्य असतात.

संयुक्त कुटुंबांत प्रत्येकानें आपल्या ऐपतीप्रमाणें मिळवावें व गरजेप्रमाणें खर्च करावें असें सामान्यत: असल्यानें एकाद्या व्यक्तीच्या गरजा अधिक व मिळ-कत कमी असणें हें साहजिक आहे. पण यामुळें इतरांना त्याचा द्वेष वाटणें शक्य आहे. शिवाय कांहीं कामचुकार व्यक्ती अंग चोरून काम करीत असतात. आपण कितीही कमी काम केलें तरी आपला वांटा मिळणारच, ही खात्री असल्यामुळें कांहींजण झटून काम करीत नाहींत व श्रम करण्याची उत्सुकता बोथट होते. याच्या योगानें आळसाला वाव मिळतो. आळस केला तरी जर आपल्याला त्याची झळ लागत नाहीं; तर मग काम करा कशाला, अशा विचारानें आळसांत व आरामांत वेळ दवडण्याची संवय

होते. याचमुळें बहुतेक संयुक्त कुटुंबांत कांहीं ऐतखाऊ लोक असतातच. वैय्यक्तिक मिळकतीची काळजी अगदीं जातीनें व झटून घेतली जाते; पण संयुक्त मिळकतीची बरीचशी हेळसांड होण्याची शक्यता असते. संयुक्त कुटुंबांतील मिळकत सर्वांमध्यें विभागली जात असल्यानें धनसंचय करणें कठिण पडतें. त्याचप्रमाणें प्रमुखाच्या हुकमतीखालीं वागावें लागत असल्यानें व्यक्तिवैशिष्ट्याला वावच मिळत नाहीं. आज्ञाधारकपणा हा गुण कितीही स्तुत्य असला तरी व्यक्तीच्या विशिष्ट सामर्थ्याला त्यामुळें आळा बसतो.

या गुणदोषविवेचनावरून असें दिसून येईल कीं, या पद्धतीचे गुण तिच्या दोषांपेक्षा अधिक प्रभावी आहेत. पण आधुनिक समाजांतील व्यक्तिनिष्ठविचारप्रवाह त्याहूनही प्रभावी ठरल्यामुळें या पद्धतीचीं पाळेंमुळें शिथिल होत चाललीं आहेत व कांहीं वर्षांनीं ही पद्धत समूळ नष्ट होईल अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. या विनाशाचें मुख्य कारण आधुनिक कालांतील आर्थिक व यांत्रिक क्रांति व तद्भव व्यक्तिनिष्ठविचारप्रणाली हेंच होय. अशा समाजरचनेला संयुक्तकुटुंबपद्धति मानवणें शक्यच नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याच्या जोरदार प्रवाहामुळें या पद्धतीचीं पाळेंमुळें खिळखिळीं व्हावीं हें साहजिकच होय. यांत्रिक युगामुळें कोणताही विचार चारी दिशांना पोंचण्यास फारसा अवधि लागत नाहीं. शिवाय यांत्रिक वाहनामुळें प्रांतांप्रातांतील अंतर तोडणें सोपें झालें आहे आणि याच्या योगानें अर्थार्जनाकरितां माणसें दूरदूरच्या प्रदेशांत जाऊन राहूं लागतात व त्यांचा आपल्या मूळ कुटुंबांशीं संबंध तुटत जातो. कायद्यानेंही या पद्धतीविरुद्ध व्यक्तीच्या बाजूने निकाल दिला. दायभागपद्धतीमुळें सर्वच मुलांना वांटा मिळत असल्याने निरनिराळीं कुटुंबें प्रस्थापित करणें सहज शक्य झालें आहे. या सर्व कारणांच्या समन्वयानें ही पद्धति आधुनिक काळांत पडक्या घराप्रमाणें भराभर ढांसळत आहे.

एकंदरींत पहातां या परंपरेचें भवितव्य अंधकारमयच दिसतें. व्यक्तिनिष्ठविचारप्रवाह इतका जोरकस व सतत वाहतो आहे कीं त्यापुढें अशा संयुक्त पद्धती टिकणें शक्य दिसत नाहीं. संयुक्तकुटुंबपद्धतीचाच नव्हे तर एकंदर कुटुंबपद्धतीचाच भविष्यकाळ निराशामय दिसतो. स्त्री ही

कुटुंबांतील समतोलपणा राखणारी व कुटुंबास चिरंतनता आणणारी प्रभावी शक्ति. सर्व प्रकारचे मतभेद मिटवून संसारांत स्थैर्य निर्माण करणारी ही शक्तीच बदलत चालली आहे. तिचा ओघ कुटुंबपराङ्मुख होत आहे. व्यक्तिस्वातंत्र्याबरोबरच स्त्रीस्वातंत्र्याची जी एक प्रचंड लाट उसळली, तिच्याखालीं कुटुंबसंस्थेचा जीव गुदमरून गेला आहे. या स्वातंत्र्याच्या भ्रांत कल्पनेमुळें स्त्रीला संसार व मुळेंबाळें हीं ओझ्यासारखीं वाटून स्वैरवृत्तीची ओढ तिच्या मनाला लागलेली दिसते. या वृत्तीला पूरक असें कार्य करण्यास संस्थानें आज तयार होत आहेत. त्यांचें कार्यक्षेत्र आतां सामाजिक कार्यापुरतें मर्यादित राहिलें नसून सर्वत्र पसरत आहे व बालकांच्या जोपासनेचें कार्य संस्थानाकडूनच अधिक उत्तम होईल असें प्रतिपादन केलें जातें. अर्थातच संस्थानचें सामर्थ्य प्रचंड असल्यानें सर्व प्रकारचीं उत्तमोत्तम साधनें जोपासनेकरितां उपयोजिलीं जातील हें खरें; पण मातेचें प्रेम बाजारांत विकत मिळण्याची कांहीं सोय नसल्यानें हीं मुलें यंत्रासारखीं निर्माण होतील की काय अशी भीति वाटणें साहजिक आहे.

या विचारप्रवाहामुळें कुटुंबसंस्थेची आधारभूत अशी दुसरी एक परंपरा गटंगळ्या खात राहिली आहे. ती म्हणजे विवाहपरंपरा. विवाहपद्धतीमुळें ही संस्था समाजांत स्थिर झालेली आहे. \ लैंगिक संबंधावर नियंत्रण ठेवून त्यास व्यवस्थित व नैतिक स्वरूप आणण्यास विवाहपरंपरेचा अत्यंत उपयोग झाला आहे. /पण आज या परंपरेचा जीवही त्रिशंकूप्रमाणें अंतराळांत लटकत राहिलेला आहे. विशेषतः पाश्चात्त्य देशांत हा प्रश्न विशेष गंभीर झालेला आहे. तिकडील विवाहाचे व घटस्फोटाचे आंकडे पाहिल्यास हें लक्षांत येईल. अमेरिकन संयुक्त संस्थानांत १९३५ सालीं एक लाख लोकसंख्येमागें १०० विवाह व १७ घटस्फोट झाले; म्हणजे साधारणपणें १० लग्नांपैकीं दोन, घटस्फोटानें मोडल्याप्रमाणें झालें. इंग्लंडमध्यें ही संख्या १०० विवाहास १$\frac{1}{4}$ घटस्फोट अशी होती. १९२८ सालीं इंग्लंडमध्यें एकूण ४०१८ घटस्फोट जाहीर झाले. व हा आंकडा पूर्वीच्या सर्व आंकड्याहून इतका मोठा होता कीं पुष्कळ ब्रिटिश वर्तमानपत्रांनीं याचा " राष्ट्रीय अधःपात " असा केला. त्याच वर्षी संयुक्त संस्थानांत एकूण १९५९३९ घटस्फोट देण्यांत

आले. यावरून दरवर्षीं घटस्फोट कसे वाढत जात आहेत हें लक्षांत येईल. व त्याबरोबरच विवाहपरंपरेची किती अनुकंपनीय स्थिति झाली आहे, हेंही दिसून येईल.

कुटुंबाचीं प्रमुख कार्यें तीन : वंशपरंपरा अखंड राखणें, लैंगिक संबंधाला स्थैर्य देणें व पार्थिव, सांस्कृतिक आणि स्नेहजन्य आनंद निर्माण करून गृहव्यवस्था राखणें. या तीनही कार्यांची आजदेखील माणसाला पूर्वी-इतकीच आवश्यकता आहे व कुटुंबाविना हीं समाधानकारक रीतीनें होतील असें दिसत नाहीं. अर्थातच या प्रश्नावर अनेक मतभेद असणें हें स्वाभाविकच होय. विशेषत: दुसऱ्या व तिसऱ्या कार्याविषयीं मतभेद असणें अगदींच शक्य आहे. लैंगिक समाधानाची कल्पना व प्रकार व्यक्तीगणिक भिन्न असतात, तसेच आनंदसंपादनाचे मार्ग व प्रकारही भिन्न असतात. कित्येकांना कुटुंबाबाहेरच समाधान वाटतें. पण अर्थातच हें समाधान कौटुंबिक सुखांत कांहीं विशेष न्यून असल्यानें किंवा कौटुंबिक सुखाशीं परिचयच नसल्यानें वाटतें कीं खरोखरच कांहीं लोकांची मनोवृत्तीच तशी असते हें सांगणें कठिण आहे, आणि कौटुंबिक सौख्य पूर्णतया मिळत असूनही त्यांत न रमतां कुटुंबबाह्य सुखाची अभिलाषा धरणारे कांहीं जण असतात किंवा काय हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे.

कुटुंबसंस्था खिळखिळी झाली आहे व ती अधिकाधिक अस्थिर होत चालली आहे, त्याकरितां तिला स्थैर्य आणिलें पाहिजे असेंच मत सामान्यतः सर्व ठिकाणीं आढळून येतें. अर्थातच हें स्थैर्य कोणत्या उपायांनीं साध्य करावें हा मोठा कठिण प्रश्न आहे. ही ढांसळणारी संस्था पुनरुज्जीवित करण्याकरितां फारच परिश्रम केले पाहिजेत हें निर्विवाद आहे. तरी पण या संस्थेचा पाया बळकट व भरभक्कम असल्यानें निराश होण्याचें कारण नाहीं. ही इमारत मानवी स्वभावाच्या मूलतत्त्वावरच आधारलेली असल्यानें तिचें पुनरुज्जीवन फारसें अशक्य नाहीं. पण याकरितां मुख्य विचारप्रवाहाची दिशाच बदलली पाहिजे. यांत्रिक युगांत माणसाला यांत्रिक सुखाची भ्रामक गोडी लागली असल्यामुळें तो अत्यंत स्वार्थी बनलेला आहे. कमालीच्या व्यक्तिस्वातंत्र्याचा अर्थ थोडक्यांत "आत्मकेंद्री समाधान" असाच होतो.

शिवाय, मानसिक समाधान व शान्ति यांऐवजीं शारीरिक समाधान व शान्ति यांजकडे माणूस अधिक आकृष्ट होत आहे किंवा थोडक्यांत सांगावयाचें तर माणसाला आज साधन व साध्य यांत फरक वाटेनासा झाला आहे आणि मनःसमाधानाकरितांच केवळ तयार करण्यांत आलेलीं साधनें यांनाच तो साध्य मानून धांवतो कीं नाहीं याचा तो विचारच करूं शकत नाहीं. साधनांच्या प्रचंड वैचित्र्यामुळें " हें वापरूं का तें वापरूं " या संभ्रांत मनः-स्थितींत त्याला साध्याचाच विसर पडला आहे. साध्य व साधन यांच्या संभ्रमामुळें सांप्रतच्या सर्व " आधी " सुरू झालेल्या आहेत. अतिरिक्त व्यक्तिस्वातंत्र्यवाद व साध्यसाधनसंभ्रम या दोन कारणांचा परिहार करितां आला तरच ही संस्था टिकण्याची आशा आहे.

प्रकरण सहावें

# विवाह-पद्धति

समाजरचनेच्या स्थैर्याकरितां कुटुंबसंस्थेची व कुटुंबसंस्थेच्या स्थैर्याकरितां विवाहपद्धतीची किती आवश्यकता आहे हें आपण पाहिलें. मागच्या प्रकरणाच्या प्रारंभी प्राचीनतम समाजांतील लैंगिक संबंधाचा विचार करतांना आपण पाहिलेंच आहे कीं अनियंत्रित लैंगिक संबंध कोणत्याही मानवसमाजांत अशक्य होत. समाज व्यवस्थित चालावयाचा असेल तर कोणत्या तरी प्रकारें लैंगिक संबंधांचें नियंत्रण हें झालेंच पाहिजे. शिवाय अनियंत्रित संबंध हे मानवी स्वभावास धरून नाहींत. अशा संबंधांमुळें संततीची योग्य जोपासना होणें शक्य नाहीं. समाजांतील लैंगिक संबंधाचें नियंत्रण करून समाजाला व कुटुंबसंस्थेला स्थैर्य आणणारी व्यवस्था म्हणजेच विवाहपद्धति होय.

अर्थातच कोणत्याही व्यवस्थेमुळें हे संबंध नियंत्रित केले तर तिला विवाहपद्धति असेंच म्हटलें पाहिजे. संस्कार, मंत्रतंत्र, धार्मिक विधी व चालीरीती हे गौण प्रश्न आहेत. या पद्धतीला पावित्र्य आणण्याकरितां निरनिराळ्या समाजांत निरनिराळे संस्कार व विधी करण्यांत येतात. असे संस्कार प्रत्येक समाजांत हमखास आढळतात. समाज कितीही मागासलेला असला तरी असे धार्मिक विधी पार पाडले जातातच. उलट असें म्हणतां येईल कीं समाज जितका अधिक मागासलेला तितके विधी अधिक क्लिष्ट असतात.

बहुतेक सर्व समाजांनीं या व्यवस्थेची धर्माशीं सांगड घालून तिला पावित्र्य आणण्याचा प्रयत्न केला आहे व शक्य तों तींत ढवळाढवळ होऊं नये अशी खबरदारी घेतली आहे. आधुनिक सुधारलेल्या समाजांत धर्म ही निव्वळ वैय्यक्तिक बाब झालेली असल्यामुळें अर्थातच धर्माची व या पद्धतीची फारकत झाली व तिच्यांतील पावित्र्य संपुष्टांत येऊन तिला कराराचें स्वरूप आलें.

## विवाह-पद्धतीचा विकास

अगदीं प्राचीन समाजांत या पद्धतीचें निश्चित स्वरूप कसें होतें हें सांगण्यास फारसे पुरावे नाहींतच. यामुळें या प्रश्नावर आत्यंतिक मतभेद आहेत. एका पक्षाला अतिप्राचीन समाजांत या पद्धतीचें अस्तित्वच मान्य नाहीं. त्यांच्या मतें या काळीं मानवसमाज पशुतुल्य होता व लैंगिक संबंधावर कोणतें-ही बंधन किंवा नियंत्रण नव्हतें. अशा प्रचारापासून तों एकपत्निकत्वापर्यंत एक लांबच लांब व सावकाश उत्क्रांति होत गेली. आजच्या मागासलेल्या समाजांत या मताला पुष्टिकारक अशा चालीरीती प्रचारांत आहेत. समूह-विवाह, अनेकपत्निकत्व, मातृशासित-कुटुंबपद्धति व इतर कांहीं समाजांतील विलक्षण चाली, यांवरून या मताला पुष्टि मिळते.

## अनिर्बंध संबंध

या मताच्या पुष्टयर्थ ज्या चालीरीती दाखविल्या जातात त्या अशा: आज-देखील कांहीं आदिवासी समाजांत समूहविवाह आढळतो. या समाजांत कांहीं निश्चित विभाग किंवा समूह असतात, व त्या समूहांतील स्त्रीपुरुषांना अनियंत्रित संबंध राखतां येतो. असे समाज अर्थातच फार थोडे आहेत. पण ते आहेत ही गोष्ट नाकारतां येत नाहीं. हे समाज प्राथमिक संमिश्र संबंधांचे निदर्शक होत. असें या पक्षाचें म्हणणें आहे. कांहीं जमातींत उत्सवप्रसंगीं स्त्री-पुरुषांना अनियंत्रित संबंध करण्यास मुभा असते व कांहीं समाजांत बायकांची अदलाबदल करण्याची चाल असते. अशाच अनेक चाली आहेत. कांहीं समाजांत रक्तसंबंध गणण्याचा कांहीं एक विशिष्ट प्रकार आढळून येतो. याला "वर्गीकरण पद्धति" असें म्हणतात. ही पद्धति बरीचशी गुंतागुंतीची आहे. पण थोडक्यांत असें सांगतां येईल कीं या समाजाचे बाह्यसंबंधी गणांत

विभाग पाडलेले असतात. अर्थातच एका गणांतील स्त्रीपुरुष एकमेकांशीं विवाह करूं शकत नाहींत. व एका पिढींतील सर्वच स्त्रीपुरुष भावंडें होत असें मानण्यांत येतें. तसेंच आधींच्या पिढींतील सर्व पुरुष बाप व सर्व स्त्रिया माता असें मानलें जातें. पण एक गण दुसऱ्या गणांतील स्त्रीपुरुषांशीं विवाह करूं शकतो व अर्थातच त्या पिढींतील दुसऱ्या गणांतील सर्व मुली "पत्नी व सर्व मुले "पति" असें मानलें जातें. म्हणजे 'अ' व 'ब' हे गण जर आपापसांत विवाह करूं शकत असतील तर 'अ' गणांतील एका पिढींतील सर्व मुलांच्या दृष्टीनें 'ब' गणांतील सर्व मुलींना 'पत्नी' असें समजावयाचें व सर्व मुलींच्या दृष्टीनें सर्व मुलें 'पति' असें समजावयाचें. ही पद्धतिही प्राथमिक संमिश्र संबंधाची निदर्शक आहे, असें या पक्षास वाटतें. पण बहुतेक या चालीरिती त्या त्या समाजाच्या विशिष्ट परिस्थितीमुळें प्रचारांत आल्या असणेंच अधिक शक्य आहे. एवढ्यावरून प्राचीन काळीं संमिश्र संबंध असला पाहिजे असा निर्णय देणें शक्य नाहीं. यांपैकीं बऱ्याचशा चालीरीती व परंपरा परिस्थितीमुळे प्रचारांत आल्या असें दाखवितां येईल व इतरांवर संशोधन केल्यास अधिक प्रकाश पडेल.

**अनेकपतिकत्व**

कांहीं ज्ञातींत एका स्त्रीला अनेक पती करतां येतात किंवा असें म्हणतां येईल कीं अनेक पुरुषांना एकच पत्नी करतां येते. मद्रास प्रांतांतील नायर जातींत व हिमालयांतील कांहीं पाहाडी जातींत, तसेंच तिबेटी लोकांत असा प्रघात आहे. या बहुतेक जातींत पूर्वकाळापासून स्त्रियांची संख्या पुरुषांच्या संख्येहून कमी असल्यामुळें असें करणें भागच होतें. परिस्थितीच्या अनिवार्यतेमुळें कित्येक विलक्षण चाली आढळून येतात. त्याचप्रमाणें हा प्रकारदेखील परिस्थितीच्या अनिवार्यतेला माणसानें दिलेलें उत्तरच असें मानलें पाहिजे. या पद्धतीच्या विवाहांत हे अनेक पती बहुधा भाऊ असतात. तिबेटांत फक्त वडील भाऊच लग्न करतो व लहान भावांचा या स्त्रीवर हक्क असतो. मात्र हे संबंध कडक निर्बंधानें नियंत्रित असतात व यांत अनिर्बंध संबंधाचा थोडासा अंशही दिसत नाहीं. नायर जातींतदेखील असाच प्रकार दृष्टीस पडतो. व यांना संमिश्र संबंधाचे निदर्शक म्हणण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

**अनेकपत्नीत्व**

एका पुरुषानें अनेक स्त्रियांशीं लग्न करण्याचा प्रघात सर्वत्र आढळतो. अगदीं सुसंस्कृत अशा समाजांतही ही पद्धति अद्याप प्रचलित आहे. पुरुषाची रुचिवैचित्र्याची आवड, संपत्तीचा बडेजाव दाखविण्याची हौस, कांहीं आर्थिक फायदे, संततीची परंपरा राखण्याची धर्माज्ञा, इत्यादि कारणांमुळें ही पद्धति प्रचलित झाली असावी असें म्हणण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानांत तर फार पुरातन कालापासून असा प्रघात आहे. पण कांहीं प्रांतांत हल्लीं कायद्यानें या प्रघातास बंदी करण्यांत आली आहे. या चाली-विषयीं फारसें अनुकूल मत प्रतिपादन करतां येत नाहीं. स्त्रियांच्या व्यक्तिमत्वावर तिचा अनिष्ट परिणाम होतो. शिवाय कुटुंबांत मत्सर, द्वेष, इत्यादि सूडभावनांना वाव मिळतो. आपल्याकडे सवतीमत्सर प्रसिद्धच आहे. अनेक कुटुंबांतील आनंद यामुळें नष्ट झालेलीं उदाहरणें पुष्कळ दाखवितां येतील. अर्थातच याला कांहीं अपवाद असणें नैसर्गिकच होय. पण याकरितां स्त्रियांत आत्यंतिक समजुतदारपणा; सहिष्णुता व स्वार्थत्याग प्रथमपासूनच पाहिजे. नाहींतर संसारसुखास सुरुंग लागणें फारच संभवनीय होय.

**आदर्श व्यवस्था**

कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी एक पुरुष व एक स्त्री यांचा विवाह हीच आदर्श व्यवस्था होय. यामुळें दोघांच्याही व्यक्तिमत्वाला वाव मिळून आदर्श कुटुंबसौख्य अनुभवावयास मिळतें. या पद्धतींत आंतरिक असे कांहीं दोष नाहींत. यामुळें अलीकडे कायद्यानेंच ही पद्धति चालू करण्याकडे लोकांचा कल आहे. कांहीं अपवादात्मक उदाहरणें सोडून दिलीं तर सामान्य परिस्थितींत हीच पद्धति मान्य केली पाहिजे. कांहीं समाजांत धर्मानेंच या पद्धतीला पाठिंबा दिला आहे.

कोणत्याही समाजांत अनियंत्रित व्यभिचार चालूं देणें शक्य नाहीं. समाज-व्यवस्था संघटित व सुखावह करावयाची असल्यास जीं कांहीं बंधनें अप-रिहार्य असतात, त्यांत या नियंत्रणास प्राधान्य दिलें पाहिजे. आजच्या कोणत्याही समाजांत, तो मागासलेला असो कीं सुधारलेला असो, या नियं-त्रणाविषयींची संघटित व्यवस्था बिनचूक आढळून येते. कांहीं समाजांत

घटस्फोट मिळणें सोपें असतें, व इतरांत कठीण असतें, ही गोष्ट निराळी; पण घटस्फोट मागावा लागणें याचाच अर्थ संघटित व्यवस्थेचें अस्तित्व होय. अर्थातच कांहीं समाजांतील याविषयींचे नैतिक नियम अत्यंत कडक असतात, तर कांहींत ते कांहींसे शिथिल असतात. अगदीं मागासलेल्या वन्य जमातींतदेखील असे नियम अत्यंत कसोशीनें पाळले जातात. आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, अंदमान, इत्यादि प्रांतांतील कांहीं वन्य जमाती इतक्या मागासलेल्या आहेत कीं, त्यांना कपड्याचा उपयोगही माहीत नाहीं. पण अशा जमातींतदेखील असे नीतिनियम अत्यंत विस्तृत व कडक दिसून येतात.

## वयोमर्यादा

विवाहपरंपरेविषयीं आणखी एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे वधूवरांची वयोमर्यादा. विशेषतः आपल्या देशांत तर बालविवाहाची चाल फारच पसरलेली आहे. कांहीं प्रांतांत कायद्यानें बंदी करूनही ही चाल मोडलेली नाहीं.

शास्त्रीय दृष्ट्या वधू व वर हीं पूर्ण वयांत आल्याखेरीज विवाह करणें दोघांच्याही शारीरिक व मानसिक आरोग्यास हानिकारक होतें; इतकेंच नव्हे तर अशा विवाहापासून संतति झाल्यास ती अशक्त व अल्पायुषी निपजते. हा शास्त्रीय विचार अत्यंत प्राचीन काळापासून ज्ञात होता. हिंदुस्थानांतील आर्य लोकांत वेदकाळापासून तों हर्षवर्धनाच्या काळापर्यंत प्रौढविवाहच रूढ होता असें खात्रीपूर्वक सांगतां येतें. सुश्रुत, चरकादि प्रख्यात भिषक्‌शास्त्रज्ञांनींदेखील असेच नियम घालून दिलेले आढळतात. आजच्या शारीरिक व मानसिक शास्त्रांच्या मतेंही बालविवाहाचा वधूवरांवर अत्यंत अनिष्ट परिणाम होतो. सामान्यतः विवाहसमयीं वधूचें वय १६ ते १८ च्या आंत असूं नये व वराचें २४ चे आंत असूं नये. या वयाचे सुमारास त्यांची शारीरिक व मानसिक वाढ योग्य झालेली असते. त्यामुळें त्यांचा विवाह आयुष्यवर्धक व आनंददायकच होतो.

कांहीं समाजांत हा प्रवाह अगदीं उलट्या दिशेनें वहात जाऊन अगदीं वयस्क होईपर्यंत विवाह न करण्याची प्रथाच पडत चालली आहे. ही प्रथा-

देखील तितकीच घातक आहे. तीमुळें निरानिराळे शारीरिक व मानसिक रोग उत्पन्न होतात व प्रकृति खालावत जाते. याचकरितां हीं दोन्ही टोंकें कसोशीनें टाळलीं पाहिजे.

## विवाहांतील चालीरीती

प्रत्येक समाजांत, समाजांतील जमातींत, जमातींतील जातींत व उपजातींत विवाहाच्या वेगवेगळया चालीरीती आढळून येतात. इतकेंच काय पण उपजातींतील निरनिराळ्या कुटुंबांतही वेगवेगळया चाली आढळतात. या चालीरीती इतक्या विविध व चित्रविचित्र असतात कीं, त्या सर्व जर एकत्रित करावयाच्या म्हटलें तर एक प्रचंड वाङ्मयच तयार होईल. यांपैकीं महत्त्वाच्या चालीरीतींचाच विचार थोडक्यांत करणें आपणास शक्य आहे.

प्रत्येक समाजांत भिन्न जाती किंवा वर्ग असतातच. कांहींत हे वर्ग जन्म आणि रोटीबेटीव्यवहार, व्यवसाय यांचे अंत:संबंध व बाह्य संबंध यांवर आधारलेले असतात, तर कांहीं समाजांत श्रीमंत, मध्यम व गरीब असे भेद पडतात. पण थोड्या फार अंशानें या दोन्ही प्रकारच्या समाजांत हे वर्ग अंत:-संबंधी बनतात. श्रीमंत वर्गांतील लोक गरीबांशीं सहसा संबंध करूं इच्छित नसल्यामुळें या तीनही वर्गांना सर्वसाधारणपणें अंत:संबंधी म्हणावयास हरकत नाहीं. श्रीमंतांचा श्रीमंतांशीं, गरीबांचा गरीबांशीं व मध्यम वर्गाचा मध्यम वर्गाशींच संबंध सामान्यत: दृष्टीस पडतो. याला अर्थातच अपवाद असतात. पण जातिबद्ध समाजांत मात्र असे संबंध धर्मशास्त्रानेंच धर्मबाह्य ठरविलेले असल्यानें अपवाद फारच क्वचित् आढळतात. या जातींत उच्च नीचपणाच्या कल्पना हजारों वर्षापासून दृढमूल झालेल्या असल्यामुळें उच्च जातींतील गरीब मनुष्य नीच जातींतील श्रीमंताशींही संबंध करूं इच्छित नाहींत. यामुळें या जाती अतिरिक्त अंत:संबंधी असतात. मात्र कांहीं जातींत मोठे विचित्र रिवाज आढळून येतात. दोन उच्च व नीच जातींत विशिष्ट प्रकारें संबंध होऊं शकतो. बंगाल प्रांतांत जालीय कैवर्त व हालाय कैवर्त या नांवाच्या दोन जाती आहेत. कैवर्त म्हणजे कोळी. पण कांहीं काळानें या कैवर्ताच्या नांवाच्या वरील दोन जाती झाल्या. एकीनें आपला पारंपरीण व्यवसाय (म्हणजे कोळ्याचा) ठेविला,

तिला जालीय म्हणतात व दुसरीनें शेतकीचा धंदा हातीं घेतला, तिला हालीय म्हणतात. अर्थातच शेतकी करणारे स्वतःला उच्च मानूं लागले व आपल्या मुली जालीयांच्याकडे देण्यांत त्यांना कमीपणा वाटूं लागला. पण फार पूर्वींच्या परंपरेप्रमाणें जालीयांच्या मुली मात्र ते स्वीकारूं लागले. या संबंधांत ते जालीयांच्याकडून प्रचंड हुंडा मागूं लागले. पण कांहीं कालानें हालीयांनीं हा व्यवहार बंदच केला व स्वतःची " महिष्य " या नांवाची स्वतंत्र जातच बनविली. उच्च जातीनें नीच जातीशीं एका दिशेनें संबंध ठेवण्याचीं उदाहरणें बरींच असतात. या पद्धतीस " कुलीनता " असें नांव आहे व ही पद्धति वंगप्रांतांत आढळते. तेथील सद्गोपे जातींत अशाच दोन उपजाती असतात. त्यांतील उच्च जात नीच जातींतील मुली स्वीकारते; पण आपल्या मुली तींत देत नाहीं. तसेंच तेथील राहरी ब्राह्मणांच्या दोन उपजाती आहेत. एक कुलीन व दुसरी श्रोत्रिय. या श्रोत्रियांचे परत तीन भाग पडतात. सिद्ध, साध्य व कष्ट कुलीन वराला कुलीन, सिद्ध किंवा साध्य वधू करतां येते; सिद्ध वराला सिद्ध किंवा साध्य वधू चालते; पण साध्य व कष्ट वरांनीं आपल्या जातींतूनच वधू निवडली पाहिजे. या चालीचा परिणाम पुष्कळ वेळां हानिकारक होतो. याचें उदाहरण पहावयाचें झाल्यास कुलीन जातींतील वर तीन जातींतलि वधू करूं शकतो. पण त्या जातींतील वधूला त्याच जातींतील वर पाहिला पाहिजे. त्यामुळें या जातींत कित्येक मुलींना अविवाहित रहाणें भागच पडतें; पण त्याबरोबरच मुलींना अविवाहित ठेवतां कामा नये हा पण नियम आहे. अशा वेळीं अत्यंत घातक प्रसंग निर्माण होतो. यांतून सुटका म्हणून मग कुलीन वरच पुष्कळ लग्नें करितो; पण त्यांचा प्रतिपाळ करण्याची त्याला ऐपत नसते. मद्रास प्रांतांतील नंबुद्री व नायर या जातींत मोठा चमत्कारिक रिवाज आढळून येतो. नंबुद्री ही उच्च ब्राह्मण जात असून ते पितृशासित असतात, तर नायर ही मातृशासित शूद्र जात होय. पण नंबुद्री जातींतील सर्वांत वडील भावानें मात्र आपल्याच जातींतील वधूशीं लग्न लावावयाचें व इतर भावांनीं नायर जातींतील मुलींशीं लग्न करावयाचें असा विचित्र प्रघात आढळतो.

प्राचीन काळीं हिंदुस्थानांत आपल्या मनाप्रमाणें वर निवडण्याची वधूला पूर्ण मुभा असावी असें दिसतें. विशेषतः राजकन्यकांचीं तर स्वयंवरें होत. सर्व

देशांतील प्रमुख राजांना व राजकुमारांना एकत्र जमवून त्यांच्यापैकी कुणालाही पसंत करणें मुलीच्या मर्जीवर सोंपविलें जाई. अशा स्वयंवरांत एकादा पण लावण्यांत येई व तो जिंकणाराला वधू माळ घालीत असे. द्रौपदीनें तर कर्ण पण जिंकण्यास उठतांच " मी सुताला वरणार नाहीं " असें सांगितल्याची गोष्ट महाभारतांत आहे. कांहीं स्वयंवरांत पण न लावतां एकाद्या " अन्वयज्ञ " दासीनें राजकन्येस प्रत्येकासमोर नेऊन त्याची माहिती द्यावयाची व नंतर तिनें आपल्या मनाप्रमाणें पसंती करावयाची असाही प्रघात दिसतो. असा प्रचार चंद्रगुप्तकाळींही होता असें ग्रीक इतिहासकारांनी लिहिलें आहे.

हिंदुधर्मशास्त्रांत विवाहाचे आठ प्रकार सांगितलेले आहेत. ते अनुक्रमें ब्राह्म, दैव, आर्ष, प्रजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस व पैशाच हे होत. यांतील ब्राह्म, दैव, व आर्ष, हीं एकाच प्रकारचीं निरनिराळीं रूपें होत. कांहीं ठिकाणीं पांचच प्रकार सांगितलेले आढळतात. ब्राह्म, क्षात्र, गांधर्व, आसुर व राक्षस. यांपैकीं पहिले तीन प्रशस्त व बाकीचे दोन अप्रशस्त मानले जात. ब्राह्म प्रकार हा विशेषतः ब्राह्मणसमाजांत रूढ होता. वधू-पित्यानें वराचा आदरसत्कार करून व त्यास धनदान करून कन्या अर्पण करणें यालाच ब्राह्मविवाह असें म्हणत. आजदेखील विशेषतः ब्राह्मणवर्गांत हाच प्रकार आढळतो. " पण " लावून स्वयंवर करणें किंवा नुसतेंच स्वयंवर करून योग्य ठरलेल्या वराला कन्या अर्पण करणें यालाच क्षात्रविवाह असें नांव आहे. हा प्रकार विशेषतः क्षत्रिय राजे लोकांत रूढ असे. " पण " लावून होणाऱ्या स्वयंवरांत वधूला मनपसंत वर वरण्याची मुभा होती असें म्हणण्यांत आत्मविरोधच आहे. " पण " जिंकणारा वरच त्या वधूला आवडेल असें समजण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण दुसऱ्या प्रकारांत मात्र तिला बरेंच स्वातंत्र्य होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. पण त्यांतही कुणाला आमंत्रण द्यावयाचें हें पित्याच्या मर्जीवरच अवलंबून असल्यानें पृथ्वीराज चौहान व संयोगिता यांच्याप्रमाणें प्रकार होऊन क्षात्र-विवाहाऐवजीं राक्षसविवाह होण्याची शक्यता खरीच. तिसरा प्रकार हा गंधर्व लोकांत रूढ असल्यानें त्याला गांधर्व विवाह असें नांव आहे. परस्परांनीं अनुरक्त होऊन मग वरणें हाच गांधर्व विवाह होय. यांत

बापानें कन्यादान करण्याचीसुद्धां गरज नाहीं. असा विवाहही बहुधा क्षत्रियांतच रूढ असावा. हे तीन प्रकार सामान्यत: मानले जात.

आसुर विवाह म्हणजे त्या काळांतील इराण देशांत रहाणारे जे आर्यवंशी लोक त्यांच्याकडे प्रचारांत असलेला प्रकार. या प्रकारांत कन्येच्या आप्तांना व स्वत: कन्येला बरेंच धन देऊन कन्येला विकत घ्यावयाचें व तिच्याशीं विवाह करावयाचा. हा प्रकार शिष्टसंमत नसला तरी प्राचीन भारतवर्षांतील कांहीं प्रांतांत रूढ होता असें दिसतें. " मद्र व केकय या दोन जातींत हा प्रकार रूढ होता. या वंशांतील स्त्रिया क्षत्रिय राजे मुद्दाम करीत. पांडू राजाकरितां मद्रराज शल्य याच्या बहिणीला भीष्मानें मागणी घातली, त्या वेळेस शल्यानें उत्तर दिलें, " आमचा कुलाचार तुम्हांस ठाऊकच आहे. तो आम्हांस वंद्य आहे. मी आपल्या तोंडानें बोलून दाखवीत नाहीं. " तेव्हां भीष्मानें त्याची अट मान्य करून सोन्याचे दागिने व गट व रत्नें, हत्ती, घोडे, वस्त्रें, अलंकार, मणी, मोत्यें, वगैरे द्रव्य त्यास देऊन संतुष्ट केलें व शल्यानें आपली बहीण त्याच्या स्वाधीन केली. अशाच प्रकारचें वर्णन रामायणांत दशरथ व कैकयी यांच्या लग्नाचें केलें आहे " *

राक्षसविवाह हा प्रकार पूर्वीं हिंदुस्थानांतील आदिवासी राक्षस या लोकांत प्रचारांत होता. राक्षस या नांवाला हल्लीं जो विचित्र अर्थ आहे तो त्या काळीं नव्हता. आदिवासी लोकांतील ही एक अत्यंत शूर व शिल्प आणि वास्तुशास्त्रप्रवीण अशी जात होती. या विवाहांत कन्येच्या आप्ताशीं लढून प्रतिपक्षाची मंडळी रडत असतां व कन्या विलाप करीत असतां तिला बलात्कारानें हरण करून नेत असत. या प्रकाराचे अवशेष अद्यापि बऱ्याच वन्य समाजांत आढळतात. हा प्रकार क्षत्रियांनीं आत्मसात् केला व अशीं लग्नें झाल्याचीं वर्णनें पुष्कळ आढळतात.

## पुनर्विवाह

विवाहपद्धतींतील अत्यंत गुंतागुंतीचे व मतभेदाचे प्रश्न दोन. पहिला पुनर्विवाह व दुसरा घटस्फोट. कांहीं समाजांत स्त्रीच्या पुनर्विवाहाला मान्यता

---

*भारताचार्य चिं. वि. वैद्य याच्या " श्रीमन्महाभारताचा उपसंहार " पान ३३७वरून.

असते, तर कांहींत अत्यंत कटाक्षानें त्याला विरोध करण्यांत येतो. हिंदुधर्मशास्त्रांत फार प्राचीन काळापासून अशा विवाहाला विरोध आहे. मात्र तेंच विधुरविवाहाला मात्र कोणत्याच समाजांत विरोध असलेला दिसत नाहीं.

पुनर्विवाहाचे दोन प्रकार कल्पितां येतील. पहिला विधवाविवाह व दुसरा घटस्फोटानंतरचा विवाह. ज्या समाजांत घटस्फोट घेतां येतो त्या समाजांत त्यानंतर विवाह करण्याला सहसा कोणताही विरोध असत नाहीं. यामुळें विधवाविवाह हाच बिकट प्रश्न असतो. वर सांगितल्याप्रमाणें कित्येक समाजांत या विवाहाला अत्यंत तीव्र विरोध असतो. कोणत्याही प्रसंगांत आर्यस्त्रीला एकदांच विवाह करतां येईल, असें हिंदुधर्मशास्त्रकार वारंवार बजावतात. वेदकाळीं काय परिस्थिति होती हें निश्चित सांगतां येत नाही; पण पातिव्रत्याची ही कल्पना आर्यलोकांत फार प्राचीन काळापासून असावी असें दिसतें. मात्र ऐतिहासिक काळीं पुनर्विवाहास बंदी होती हें निश्चित.

हिंदुधर्मशास्त्रांत परस्पर विरोधी वाटणारे पुष्कळ नियम आहेत, त्यांपैकींच हा एक असावा असें दिसतें. पण बहुतेक तज्ज्ञांचें असें मत आहे कीं, धर्मशास्त्रच प्रमाण मानावयाचें झाल्यास पुनर्विवाहाला आधार मिळत नाहीं

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबेच पतिते पतौ**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**

यासारखे कांहा तुटपुंजे आधार मिळतात. व कांहीं विशिष्ट प्रसंगी–पती नष्ट झाल्यास, मृत झाल्यास, संन्यासी झाल्यास, नपुंसक ठरल्यास, अगर पतित झाल्यास–स्त्रियांना पुनर्विवाहाचा अधिकार धर्मशास्त्रानेंही दिला आहे, असें म्हणावेंसें वाटतें; पण तोंच वरील आधारांत कांहीं तांत्रिक व व्याकरणविषयक मेख आहे असें तज्ज्ञ म्हणतात. एकंदरींत पहातां पुनर्विवाहाकरितां धर्मशास्त्राचा आधार शोधित बसण्यांत "नदींतील पाणी वाहून संपेपर्यंत वाट पहात बसणाऱ्या जांवईबुवांचा शहाणपणा" पदरीं येईल असें दिसतें. व समाजांतील सामान्य वर्गानें धर्मशास्त्राची कांस न धरतां व्यवहारशास्त्राचा किंवा "सोयसिंधू" चा आधार घेऊन "पाटाची चाल" रूढ केली. पण कांहीं तथाकथित उच्चवर्णीयांनीं धर्मसिंधूंत स्वतःला पावन करण्याकरितां आपल्या कुटुंबांतील शेंकडों निरपराध मुलींना व स्त्रियांना दुःखसिंधूंत लोटलें.

कुणाही विचारी व सहृदय माणसाला पुनर्विवाहाची आवश्यकता पटेल. विशेषत: बालविधवांची परिस्थिति तर फारच अनुकंपनीय असते. तिचा कांहींही अपराध नसतांना जन्मभर सुखाचा त्यागच करीत रहाण्यांत पुण्य असण्याची कांहीं शक्यता नाहीं. सत्य व न्याय यांत जर कांहीं दिव्यता असेल तर ही दिव्यता विधवांच्या बाजूची आहे. विशेषत: बंगालमधील विधवांची करुण परिस्थिति ऐकून न द्रवणारें हृदय जिवत माणसाचें असणें शक्य नाहीं, व तें जर जिवंत माणसाचें असेल तर त्यांत कांही मनोविकृति खासच असणार. मानसशास्त्रांत ज्या प्रकाराला " परक्लेशी " ( sadist ) असें म्हणतात तोच हा प्रकार असला पाहिजे. परक्लेशिता ही एक मनोविकृति आहे.

सुदैवानें गेल्या दीडदोन तपांत पुनर्विवाहाला अनुकूल असें वातावरण तयार होऊन समाजांतील विरोध कमी झाला आहे. पण शेकडों वर्षे या भ्रामक पातिव्रत्याच्या कल्पनेनें किती निरपराधी हकनाक दु:खांत तळमळून गेले आहेत कोण जाणे. धर्म ही बाबच सामाजिक दृष्टच्या गौण मानण्याचें युग सुरू झाल्यानें धर्मानें सुरू केलेल्या परंपराही कोसळल्या.

## घटस्फोट

घटस्फोट म्हणजे विवाहानें अंगिकारलेल्या बंधनांतून पतिपत्नींची मुक्तता व वैवाहिक जीवन अयशस्वी झाल्याची मान्यताच होय, हा एक आपद्धर्मच होय. कोणताही घटस्फोट म्हणजे प्रिय आणि स्निग्ध संबंधांचा अंत झाल्यानंतरच्या अनेक अप्रिय व दु:खद घटनांची परिणाति हें खास. अगदीं अलीकडील कांहीं क्षुल्लक आणि हास्यास्पद कारणांवरून घेतलेले घटस्फोट सोडून दिले तर सहसा कांहीं गंभीर परिस्थिति निर्माण झाल्याशिवाय कोणतेंही जोडपें विवाहबंधन तोडूं इच्छिणार नाहीं. सामान्यत: विवाहबधन अंगिकारतांना प्रौढविवाहांत तरी पुढील सर्व जबाबदारी जाणूनच वधूवरांना पाऊल टाकावें लागतें. विवाहाकडे एखाद्या खेळण्याप्रमाणें पाहून विवाह करणाराला आपल्यावरील भाराची जाणीव झालेली असणें शक्य नाहीं. व त्यामुळें त्याला लौकरच पश्चात्ताप करण्याची पाळी येण्याची शक्यता फारच असते.

पण हल्लींच्या धांवत्या जगांत विचारही धांवतेच व आचारही धांवतेच. गंभीर विचारांची व आचारांची संवयच नाहींशी झाली आहे. लग्न व घटस्फोट यांना छंदाचें ( Fashion ) स्वरूप आलें आहे. अमेरिका, रशिया, इत्यादि देशांतील घटस्फोटांची संख्या व त्यांचीं कारणें पाहिल्यास या गंभीर प्रश्नावर लादलेलें हास्यास्पद स्वरूप स्पष्ट दृष्टीस पडेल. त्या देशांतील विचारवंतांनादेखील हा प्रश्न कसा सोडवावा हा मोठा विचारच पडला आहे.

घटस्फोटाच्या वाढत्या संख्येचीं कारणें पुष्कळ प्रकारचीं आहेत. आर्थिक परिस्थितींत व धार्मिक विचारांत झालेला मोठा बदल व सर्वसामान्य संस्कृतीच्या प्रगतीमुळें स्त्रीला समाजांत विशिष्ट स्थान प्राप्त झालें आहे. आधुनिक स्त्रीवर घराचा व कुटुंबाचा भार फारसा पडतच नाहीं व एकंदरींत स्त्रियांना विचाराला बरीच सवड मिळूं लागली आहे. पूर्वी बाळंतिणींना चार चार महिने कोंडून घेऊन रहावें लागत असे; पण आधुनिक काळांत १०-१५ दिवसांत त्या मुक्त होतात. पुष्कळ स्त्रियांना हल्लीं पैसा मिळविण्याची शक्यता असल्यामुळें त्यांचें परावलंबित्व कमी झालें आहे. त्यामुळें त्यांना कोणत्याच परिस्थितींत इतरांच्या मदतीची गरज भासत नाहीं. धर्म हा वैय्यक्तिक प्रश्न असल्यामुळें त्याचें उल्लंघन झालें तरी सामाजिक बहिष्काराची भीति राहिलेली नाहीं. या सर्व व इतर अनेक कारणसमुच्चयामुळें पतिपत्नीचें पूर्वीचें "लता आणि वृक्ष" असे नातें संपुष्टांत येऊन समान अधिकार व समान कर्तव्य यांनीं युक्त असें नवेंच नातें निर्माण होऊं लागलें. अर्थातच दोन्ही पक्ष समबल झाल्यानें विवाहाला समान भागिदारी कराराचें स्वरूप आलें व मतभेद होतांच करार मोडून टाकण्याची कायद्यानें मुभा मिळाली. " ज्या समाजांत स्त्रियांनीं आर्थिक क्षेत्रांत प्रवेश केल्यामुळें पूर्वपरंपरांना अचानक अर्धचंद्र मिळाला, अशा आधुनिक समाजांत घटस्फोट अधिक प्रमाणांत आढळतो. जपान व रशियांतील परिस्थिति याचीच निदर्शक आहे. तसेंच जेथें या आर्थिक प्रवेशामुळें सामान्य व्यक्तिनिष्ठेचा प्रसार होऊन पूर्वपरंपरा शिथिल झाल्या, तेथेंही असाच प्रकार घडतो. अमेरिकेंतील घटस्फोटाचें प्रमाण अधिक असण्याचें प्रमुख कारण हेच होय. कुटुंबसंस्थेमुळें वंशाचें नांव व परंपरा हीं अबाधित रहात असत व त्या एकाच घरांत पिढ्यान्-

पिढ्यांना आसरा लाभत असे. त्यामुळें ही संस्था समाजपरंपरेला आधारभूत अशी होती. युरोपियन लेखक या विषयावर अमेरिकन लेखकांपेक्षां फारच अधिक भर देतात. संयुक्त संस्थानांतील व त्यांतही पश्चिम भागांतील जीवनाच्या अस्थिरतेमुळें ही परंपरा शिथिल झाली आहे व समाजाचा दाबही कमी झाला आहे. " *

*R. M. MacIver : " Society " पान २१८.

प्रकरण ७ वें

# खेडीं आणि शहरें

## उद्योगप्रधान व कृषिप्रधान देश

अर्वाचीन कालांत दोन प्रकारचे देश प्रामुख्यानें आढळतात. संस्कृति, व्यवसाय, आचार, विचार, संस्था, परंपरा, चालीरीती, या सर्व स्वरूपांत विरोधी असे दोन प्रकार मुख्यत्वें उद्योगप्रधानतेमुळें व शेतकीप्रधानतेमुळें पडतात ज्या देशांत यांत्रिक उद्योगाची वाढ होऊन कारखान्यांत प्रचंड प्रमाणावर उत्पादन होत असतें अशा देशांना उद्योगप्रधान देश असें म्हणतात. व ज्या देशांतिल लोकांचा प्रमुख व्यवसाय शेती हाच असून, तेंच चरितार्थाचें प्रमुख साधन असतें अशा देशांना कृषिप्रधान देश असें म्हणतात.

## कृषिप्रधान देश

बहुतेक सर्व देशांत फार प्राचीन काळापासून तों सुमारें १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत शेतकी हाच मुख्य व्यवसाय असे. हिंदुस्थान, चीन, रोम, ग्रीस, इजिप्त, इत्यादि देशांत नाना प्रकारचे इतर उद्योगधंदे चालत असत. हिंदुस्थानांतिल प्रख्यात व अत्युत्तम मालाला सर्व देशांतून मोठी मागणी असे. कित्येक देशांतील व्यापारी इकडे येऊन माल घेऊन जात व या देशांतील साहसी व्यापारी अतिदूरदूरच्या देशांत जाऊन व्यापार करीत. असा व्यापार १९ व्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत चालू होता. इतकें असूनही सर्व सामान्य लोकांचा

मुख्य व्यवसास शेती हाच असे. अशा देशांना कृषिप्रधान असेंच म्हटलें पाहिजे. यावरून १८ व्या शतकाच्या अंतापर्यंत सर्व देश कृषिप्रधानच होतें असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. या देशांत शहरें असत; पण तीं थोडी असत. देशांतिल अधिकांश लोक शेती करून खेड्यांत रहात. ८० ते ९५ टक्के लोक खेड्यांत रहात. त्यामुळें देशांतील मुख्य प्रश्न शहरांचा नसून खेड्यांचा असे. आज देखील हिंदुस्थानांतील ६५५८९२ खेड्यांत ( १९४१ सालीं) ३३९३०१९०२ माणसें रहातात. म्हणजे शेंकडा ८७ लोक खेड्यांत रहातात असें झालें. १८व्या शतकांत इंग्लंडची परिस्थिति अशीच होती.

कृषिप्रधान देशांत एक प्रकारची विशिष्ट संस्कृति नांदत असते. अशा देशांतिल खेडीं हीं विविक्त असून बरीचशीं स्वयंपूर्ण असतात व त्यांचें शहरांशीं दळणवळण जवळ जवळ नसतेंच. त्यामुळें अशा खेड्यांतील जनता सामान्यतः निरक्षर, परंपराभिमानी, विकारविमुख व कांहींशी अंधःश्रद्ध अशी असते. अशा खेड्यांत सुधारणा घडवून आणणें फार अवघड असतें.

### उद्योगप्रधान देश

उद्योगप्रधान देशांत यांत्रिक उद्योग हाच लोकांचा प्रमुख व्यवसाय व चरितार्थाचें मुख्य साधन होय. बहुतेक सर्व यांत्रिक उद्योग कारखान्याच्या स्वरूपांत चालतात व हेंच चरितार्थाचें मुख्य साधन असल्यामुळें या कारखान्यांत व इतर व्यवसायांत बहुसंख्य लोक गुंतलेले असतात. दळणवळणाच्या व इतर सोयीकरतां असे बरेच कारखाने एकत्र म्हणजे एकाच शहरीं उभारले जातात व पर्यायानें त्यांमधील सर्व लोक एकत्र येतात. कोणताही देश कृषिप्रधानतेपासून उद्योगप्रधानतेकडे जाऊं लागला की त्या देशांतील खेड्यांतील लोक भराभर शहराकडे धांव घेतात व खेडीं ओस पडूं लागून शहरांचा व्याप वाढूं लागतो. शहरांत विविध प्रकारचे उद्योगधंदे सुरू होत असल्यानें तिकडे अधिक पैसा मिळूं लागतो. या उद्योगवैपुल्यामुळें नाना प्रकारचे व नाना प्रांतांतील लोक एकत्र येतात व त्यांची आपापसांत देवाणघेवाण सुरू होते. त्यांचा दृष्टिकोन व्यापक होतो. कूपमंडूकवृत्ति नाहींशी होते, ते स्वतःच्या गुणदोषांचें परीक्षण करूं लागतात, व एकंदरींत

त्यांची वृत्ति अधिकाधिक सहिष्णु बनत जाते. असे चित्रविचित्र आचार-विचार, भिन्न भिन्न संस्था, विविध प्रकारच्या परंपरा व चालीरीती आणि नाना उद्योग यांच्या संयोगानें संस्कृतिसंगमाइतकाच जोरदार संस्कृतिसंघर्ष पण घडतो. जीवनक्रमांत विलक्षण क्रांति होते, विचारांत क्रांति होते व एकंदरींत आयुष्याला नवेंच वळण मिळतें. या अभूतपूर्व कलाटणीमुळें गतजीवनाशीं या जीवनक्रमाची फारकत होते व जीवन यशस्वी होण्याचा जितका संभव, तितकाच तें अयशस्वी होण्याचाही संभव राहतो. उत्साह, महत्त्वाकांक्षा व आकर्षण, यांमुळें प्रेरित होऊन शहराकडे धांव घेणारे लोक आपल्या प्रयत्नांनें यशस्वी होऊं शकतील; पण दारिद्र्याच्या भारामुळें नाइलाजानें शहराकडे खेंचले जाणारे लोक कितपत यशस्वी होतील याचा संशयच आहे.

या सांस्कृतिक व मानसिक वातावरणांतील फरकाइतकाच बाह्य वातावरणांतही फरक घडून येतो. खेड्यांतील संथ, एकाकी, कांहींसें एक रंगी जीवन, दूर दूर व प्रशस्त घरें, निर्मळ व भरपूर सूर्यप्रकाश, वायुवीजनयुक्त आणि आरोग्यदायक वातावरण संपून शहरांतील बजबजलेलें, घाईचें, जीवनाचा विचार करण्यासही सवड न देणारें जीवन, एकमेकांवर खचलेलीं, माणसांनीं भरून वाहणारी, सूर्यप्रकाश व वारा यांचा संबंध नसलेलीं घरें व चाळी, जिकडे तिकडे सांचलेली घाण व दुर्गंधी, रोगग्रस्त व कोंदट वातावरण, या सर्वांना तोंड द्यावें लागतें. नवख्या माणसाला या सर्व गोष्टी अत्यंत अपरिचित असल्यानें त्याचा जीव कावराबावरा होतो. केव्हां एकदांचा या धांदलींतून बाहेर पडेन असें त्याला वाटत असतें; पण लहानपणापासून याच वातावरणाची ज्यांना सवय असते त्यांना त्यांत कांहीं अवघड वाटत नाहीं. शहरांतील जीवन अधिकाधिक यांत्रिक बनत चाललें आहे. विशेषत: गिरण्या-कारखान्यांत काम करणारांना या यांत्रिकतेंतच जीवन व्यतीत करावें लागतें. खेड्यांतील जीवनापेक्षां हें जीवन फारच कंटाळवाणें असतें. " चार्ली चॅपलीनच्या " " मॉडर्न टाईम्स " या चित्रपटांत याचें चित्रण मोठें मार्मिक झालें आहे.

## खेडीं

प्रस्तरयुगाच्या प्रारंभीं व जुन्या प्रस्तरयुगकाळीं माणसांचीं कुटुंबें,

कुळें व गण एकत्र रहात असत ही गोष्ट खरी; पण त्या काळीं त्यांचा चरितार्थाचा प्रमुख व्यवसाय अन्न जमविणें, मृगया करणें व क्वचित् गुरें पाळणें हा असे. या तीनही प्रकारच्या व्यवसायांकरितां त्यांना सतत फिरतें रहावें लागे. त्यामुळें या काळीं माणसें एकत्र रहात असलीं तरी त्यांना कायम वसति करून राहतां येत नसे. शिकारीच्या व कुरणांच्या सोयीप्रमाणें वारंवार एका भागांतून दुसऱ्या भागांत फिरावें लागे. या काळीं माणसाचा जीवनक्रम असा असल्यानें खेडीं वसविण्याची शक्यताच नव्हती. एका ठिकाणीं कायम वसति करण्याची शक्यता असल्या-खेरीज खेडी वसणें शक्यच नसतें. अशी परिस्थिति, एकाच स्थानीं एकादा कायम व्यवसाय व तोही चरितार्थास पुरा पडेल असा असल्याखेरीज येऊं शकत नाही. इतक्या प्राचीन काळीं शेती हाच एक व्यवसाय असे. पण तोही जुन्या प्रस्तरयुगांत अज्ञातच होता. नव्या प्रस्तरयुगांत ज्या वेळीं या व्यवसायाची सुरुवात झाली व जसजसा हा व्यवसाय अधिकाधिक लाभदायक वाटूं लागला, तेव्हां माणसानें आपली भटकण्याची वृत्ति सोडून देऊन एकाच ठिकाणीं कायमची वसति करण्यास सुरुवात केली. शेतकीचा व्यवसाय, कायम एकाच ठिकाणीं वसति केल्याशिवाय अनुसरतां येत नाहीं. अशा प्रकारें कृषिवृत्तीच्या आरंभामुळेंच खेड्यांची वसाहत सुरू झाली. हिंदुस्थान, इजिप्त, स्वित्झर्लंड, इत्यादि देशांत या काळांतील खेड्यांचे अवशेष दृष्टीस पडतात. स्वित्झर्लंडमध्यें व हिंदुस्थानांतील मलबार प्रांतांत खेड्यांचा एक विशेष प्रकार या काळीं असे. पुष्कळ बांबू एकत्र बांधून त्यांचा एक प्रचंड फलक तयार करण्यांत येई; व हा फलक एकाद्या तळ्यां-तील पाण्यावर तरंगत सोडण्यांत येई; व त्यावर लहान लहान झोंपड्या बांधून त्यांत लोक रहात असत. बांबूच्याच पुलानें या खेड्यांचा जमिनीशीं संबंध येत असे. शत्रू व रानटी पशूंपासून रक्षण करण्याकरितां अशीं खेडीं वसविलीं जात असावींत.

शेतकीच्या सुरुवातीपासून माणसाच्या आयुष्यांत एक नवीन क्रांतिकारक युग सुरू झालें. माणसाची भटकी वृत्ति नाहींशी झाली, तो कायम वसति करून एकत्र राहूं लागला व त्याची पूर्वीची भांडखोर व युद्धप्रवण प्रवृत्ति सावकाश मावळूं लागली, आणि तो शांतताप्रिय बनूं लागला. शेतांत

वर्षभर खपावें लागत असल्यानें त्याला भांडणांत भाग घेण्याची सवड व इच्छा राहिली नाहीं. हा त्याच्या प्रवृत्तींतील बदल असामान्यच मानला पाहिजे. यामुळें, त्यानें आपली रानटी वृत्ति टाकून सुसंस्कृत वृत्तीकडे आपली दृष्टि वळविली. या शांत वृत्तीचे सामान्य परिणाम त्याच्या जीवन-क्रमावर दिसूं लागले. मतभेद होतांच, क्षणोक्षणीं शस्त्राकडे धांवणारी त्याची वृत्ति शांतपणें वादविवाद करून मतभेद मिटविण्याकडे कलूं लागली. खेड्यांत बरेच लोक एकत्र शांतपणें राहूं लागल्यानें जीवनांतील नाना प्रकारच्या अडचणी ते सहकार्यानें सोडवूं लागले. व एक प्रकारची अभूतपूर्व संघटना तयार होऊं लागली. आपापसांतील मतभेद शांतपणानें मिटवून परस्परसहाय्यानें राहण्यांत त्यांना आनंद होऊं लगला. या सहकार्यानें व एकीनें ते अधिक सुरक्षित झाले व बाह्य शत्रूंशीं सामना देतांना संघटित होऊं लागले. याचमुळें त्यांच्या विविध कार्यक्षेत्रांत श्रमविभाजन होऊन पूर्व-काळीं अज्ञात असे कितीतरी शोध त्यांनीं लावले व जीवन अधिक सुखी करण्याचा प्रयत्न केला.

आज आपण खेड्याकडे "अज्ञानाचें व अंधाराचें केंद्र" या तुच्छतेच्या भावनेनें पाहतों. तरी संस्कृतीचा आरंभ खेड्यांतच झाला हें सत्य आहे. शांततामय व ज्ञानमग्न आणि कार्यमग्न जीवनाचे धडे प्रथम खेड्यांतच मिळाले. प्रारंभीं खेडींच संस्कृतीची व ज्ञानाचीं केंद्रें असत. आर्यांची सर्व संस्कृति वेदकाळीं व उपनिषत्काळीं खेड्यांतच विकसित झाली.

नव्या प्रस्तरयुगाच्या समातीपर्यंत माणसानें बरीच आघाडी मारली. शेतकीखेरीज हजारों नवीन व्यवसाय, कला, शिल्प, वास्तु व उद्योगधंदे त्यानें हस्तगत केले. तो प्रचंड व सुंदर इमारती व मंदिरें बांधूं लागला. श्रमविभाजनामुळें त्याची प्रगति फारच झपाट्यानें झाली. या कालखंडांतील, मोहेंजोदारो, हरप्पा, मेंफिस, इत्यादि ठिकाणी आढळणाऱ्या इमारती व इतर अवशेषांवरून याची कल्पना येते. या सर्व व्यापामुळें खेड्यांचें मूळ स्वरूप बदलून त्यांचा आकार व व्याप वाढूं लागला. शेंकडों नव्या संस्था व परंपरा उदयास आल्या. या गांवांमधील दळणवळण वाढलें व त्यांना एक प्रकारचें संघटित स्वरूप येऊन त्यांचेंच बळकट संस्थानांत रूपान्तर झालें. नव्या काळांतील व्यवसाय व उद्योग यांच्या सोयीप्रमाणें नवीं खेडीं व

शहरें पण उदयास आलीं. प्राचीन खेडीं त्या काळच्या व्यवसायास म्हणजे शेतकीस अनुरूप अशा सोयी पाहून वसविण्यांत आलेलीं होतीं; पण नव्या काळांतील उद्योगधंद्यांना तीं योग्य होतींच असें नाहीं. जीं योग्य होतीं, त्यांचा व्याप वाढून त्यांचीं शहरें बनलीं; व कांहीं, सोयी पाहून नव्या ठिकाणींच वसविलीं गेलीं.

उद्योगप्रधान व कृषिप्रधान देशांतील संस्कृतींत जसें अंतर असतें, तसेंच, एकाच देशांतील शहरी जीवनक्रम व ग्रामीण जीवनक्रम यांत पण असतें. व्यवसाय, उद्योगधंदे, संस्था, चालीरीती, आचारविचार व कल्पना, यांत बराच फरक असतो. अर्थातच " नगर " आणि " ग्राम " या संज्ञा सापेक्ष असल्यानें वरील विधानांत कांहींशी विषमता निर्माण होते. किती लोकसंख्येपर्यंत खेडें म्हणावें हा प्रश्न विवाद्यच आहे. १५०० लोक-संख्येपासून कित्येक लाख लोकसंख्या समाविष्ट असलेल्या गांवांना शहर असें म्हणतां येणें शक्य आहे. अमेरिकेंतील नवीं गांवें प्रशस्त व सुंदर रस्ते राखून आदर्शवत् वसविलेलीं आहेत. आयोवा संस्थानांतील क्लेरियन् या गांवीं सुमारें ३००० वसति आहे. पण प्रत्येक घरीं मोटार असून, रस्ते व इमारती इतक्या प्रशस्त आहेत कीं, कोणत्याही प्रचंड शहरीं अशी व्यवस्था आढळणार नाहीं. आतां या गांवाला खेडें म्हणावें कीं शहर ? खेड्याची आपली नित्याची कल्पना या गांवाला लागू करणें शक्य नाहीं. म्हणून नुसत्या लोकवसतीवरून खेडें किंवा शहर असें म्हणतां येणार नाहीं. कांहीं शहरांत १० ते १५ हजार वसति असूनही त्या ठिकाणीं शहरी वातावरणाचा मागमूसही दिसणार नाहीं.

## खेड्याचीं कांहीं वैशिष्ट्यें

खेडीं हीं बहुधा विविक्त व पर्यायानें स्वयंपूर्ण असतात. तेथील राहिवाश्यांना आपल्या बहुतेक गरजा स्वतःच भागवाव्या लागतात. त्यांच्य गरजा अर्थातच ठराविक व मर्यादित असतात. कांही खेड्यांत घरें अगदीं जवळ जवळ असून त्यांचा एक अविभक्त समूहच झालेला असतो, तर कांहीं खेड्यांत प्रत्येक घर वेगवेगळें असून घरांघरांत अंतरही बरेंच असतें. या प्रकारांत खेडेंच नव्हे तर त्यांतील घरेंदेखील विविक्त झालेलीं दिसून येतात

व अशा घरांत राहणारीं कुटुंबेंही स्वयंपूर्ण असतात. ही स्वयंपूर्णता निव्वळ आर्थिकच असते असें नाहीं तर ती सामाजिकही असते. बऱ्याच ठिकाणीं या विविक्त कुटुंबांचे आपसांत झगडे असतात; कुटुंबांतील माणसांनाच एकूण सर्व कार्यें करावयाचीं असल्यानें आळसाला बहुधा वाव मिळत नाहीं व कुटुंबांत एक प्रकारची विलक्षण एकी दिसून येते. खेड्यांच्या या अलगते-मुळें त्यांचा बाह्य जगाशीं फारसा संबंध येत नाहीं व स्वतःबद्दलचा एक प्रकारचा दुरभिमान व इतरांविषयीं तुच्छता त्यांच्या अंगीं बाणते. शहरांतील चालीरीतींना हीं माणसें नाक मुरडतील व शहरी छंदाचा तर तीं तिरस्कारच करतील. त्यांच्या संस्था, परंपरा व चालीरीती ठरून गेलेल्या असतात. त्यामुळें मनाची संकुचित वृत्ति सोडून देऊन व्यापक वृत्तीचा अंगिकार करावयास त्यांना अवकाशच मिळत नाहीं.

शेतकी व तिचे पूरक उद्योग हेच खेडुतांचे प्रमुख उद्योग होत. रशियांतील कांहीं खेडीं व प्राचीन हिंदुस्थानांतील कांहीं खेडीं वगळल्यास इतर बहुतेक खेड्यांत शेतकी या मुख्य व्यवसायाभोंवतीं इतर विविध व्यवसायांचा चरितार्थ चाललेला आढळतो. रशियांतील खेड्यांचा मात्र एक विशिष्ट वर्गच आहे. सोनारांचीं, लोहारांचीं, सुतारांचीं, अशा प्रकारचीं वेगवेगळीं खेडीं असतात. असाच प्रकार प्राचीन हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं होता. हीं खेडीं एकाद्या उद्योगी शहराभोंवतीं पसरलेलीं असतात व शहरांच्या नाना प्रकारच्या गरजा भागविण्यांतच त्यांचा चरितार्थ चालतो. या खेड्यांचा मुख्य व्यवहार शहरांशींच असून तीं मुळींच स्वयंपूर्ण नसतात. आपल्या सर्व गरजा पूर्ण करण्याकरितां त्यांना शहरांकडे किंवा इतर खेड्यांकडे पहावें लागतें. हा विशिष्ट वर्ग सोडल्यास, इतर सर्व खेड्यांत शेतकी हाच प्रमुख व्यवसाय असतो. खेड्यांत असे मर्यादित व्यवसायच असल्यामुळें एक संपूर्ण व्यवसाय व त्यांतील बारीकसारीक कामें एक माणूस चालवितो व या प्रकारें श्रम-विभाजन होतें. सुताराचा धंदा एक कारागीर चालवितो तर लोहाराचा धंदा दुसरा मनुष्य करतो. पण एका व्यवसायाचे निरनिराळे विभाग पाडून प्रत्येक विभाग वेगळ्या माणसानें हाताळावयाचा व अशा प्रकारें एकाच कार्य-विभा-गावर लक्ष केंद्रित करून नैपुण्य मिळवावयाचें हा प्रकार खेड्यांत आढळत नाहीं. त्याला श्रमविशेषण अशी संज्ञा आहे. खेड्यांत श्रमविशेषणाला

अवसरही फारसा असत नाहीं. शेतकीच्या व्यवसायांत कामाचे निरानिराळे विभाग फारसे पाडतां येत नाहींत.

या साध्या वातावरणामुळें व मर्यादित गरजांमुळें खेडुतांचें जीवन अगदीं साधें व काटकसरी असतें. शहरांतील चैनीच्या वस्तू, वाहनें, चित्रपट, विश्रांतिगृहें, किंवा मद्यपानगृहें, यांचा खेड्यांत पुष्कळसा अभाव असल्यामुळें व खेडुतांना अंग मोडून श्रम करावे लागत असल्यामुळें त्यांना यांची गरजच वाटत नाहीं. अलगतेमुळें उत्पादन मर्यादित व ठराविक सांच्याचें होत असतें व रुचिवैचित्र्याला फारसा अवसर नसतो. शहराच्या आसपासचीं जीं खेडीं असतात, त्यांत मात्र रुचिवैचित्र्याला कांहींशी सवड व संधी मिळते; पण तरीदेखील खेडुतांच्या मर्यादित क्रयशक्तीमुळें त्यांना विशेष चैनींत राहतां येतच नाहीं.

## हिंदुस्थानांतील खेडीं

आपल्या देशांतील खेडीं तर निश्चितच वरील प्रकारचीं असतात. आपल्या देशाची सांपत्तिक स्थिति अत्यंत हलाखीची असल्यामुळें, विशेषत: खेड्यांत, फारच गरीबी असते. या सर्वव्यापक दारिद्र्यामुळें खेडुतांना साधेपणानें व काटकसरीनेंच नव्हे तर कांहीं वेळां अर्धपोटींदेखील रहावें लागतें. म्हणून खेड्यांतील परिस्थिति अत्यंत असमाधानकारक असते. फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांतील बहुसंख्य लोक खेड्यांत रहात आले आहेत; पण इतकी हलाखीची परिस्थिति ब्रिटिश अमदानीपासूनच सुरू झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. लोकसंख्येची भरमसाट वाढ व आर्थिक परिस्थितीची वाढती अवनति या परस्परविरोधी प्रवाहांमुळें खेडुतांची दशा अत्यंत शोचनीय झाली आहे. ब्रिटिश अमदानीच्या प्रारंभापूर्वीं हिंदुस्थानांत शेंकडों स्वतंत्र राज्यें होतीं. या राज्यांच्या आधारावर हजारों उद्योगधंदे चालत असत. त्याचप्रमाणें लाखो सैनिकही शेतकीवर अवलंबून नसत. यामुळें शेतकीवर फारसा भार नव्हता व खेडुतांची आर्थिक परिस्थिति सुसह्य अशी होती. ब्रिटिश अमदानीपासून कित्येक दरबार नामशेष झाले, सैनिकांना कायमची रजा मिळाली व सैन्याकरितां आणि दरबाराकरितां उत्पादन करणारे हजारों धंदे बुडाले; व हे सर्व बेकार लोक खेड्यांत घुसून

शेतकीवर तुटून पडूं लागले. मूलतःच कमी असलेल्या संपत्तींत इतके सर्व वांटेकरी आल्यानें सर्वांचीच अवस्था हीनदीन झाली व ती अद्याप तशीच आहे. या अभूतपूर्व दारिद्र्यामुळें खेड्यांना अत्यंत हीन दशा आली, आरोग्य बिघडलें, रोगराई व सांथी सुरू झाल्या व नवे नवे रोग उद्भवूं लागले. प्लेगासारखे रोग पूर्वी ऐकूनही माहीत नव्हते; त्यांनीं आपला धुमाकूळ सुरू केला व सामान्य जनतेची रोगप्रतिकारक्षमता घसरली. पूर्वींचीं खेडीं आरोग्यमंदिराप्रमाणें शोभिवंत असत, तर आतां त्यांचें रूपांतर रोगपीडित इस्पितळ झालें आहे. जनतेच्या दुर्बलतेमुळें नव्या रोगांनीं खेड्यांत प्रवेश करून ठाणें दिलें; पण पुराणपरंपराभिमानानें व दारिद्र्यानें नव्या ज्ञानाला अटकाव केला. याबरोबरच लोकसंख्येची वाढ बेसुमार होऊं लागली आणि रोगांना अधिकाधिक बळी मिळत गेले. खालील कांहीं आंकड्यांवरून या अवस्थेची थोडीशी कल्पना येईल. हिंदुस्थानांतील जनतेची साधारण आयुर्मर्यादा २७ वर्षें आहे, तर इजिप्तची ३३, जपानची ४३, रशियाची ४५, फ्रान्सची ५७, कॅनडाची ६०, संयुक्त संस्थाने व इंग्लंड ६२, स्वीडन् व नॉर्वे ६३ आणि न्यू झीलंड ६७ वर्षें अशी आहे.

हिंदुस्थानांतील प्रमुख प्रतिकार्य रोग, देवी, विषमज्वर, आमांश, महामारी, प्लेग, मलेरिया व क्षय हे होत. यांपैकीं एका मलेरियानेंच वार्षिक मृत्यु सुमारें १० लक्ष होतात व अजमासें १ कोटि लोक या रोगानें निःशक्त होऊन आर्थिक कमाईस मुकतात.

जन्मप्रमाण ( दर हजारीं ): हिंदुस्थान–३३; जपान–२७; ऑस्ट्रेलिया–१८; इंग्लंड–१५; जर्मनी–२०; संयुक्त संस्थानें–१७; कॅनडा–२०; व फ्रान्स–१४·६.

मृत्युप्रमाण ( दर हजारीं ): हिंदुस्थान–२२·२; जपान–१७·६; ऑस्ट्रेलिया–९·७; इंग्लंड–१३·९; जर्मनी–१२·७; संयुक्त संस्थानें–१०·८; कॅनडा–९·७; फ्रान्स–१५·३.

बालमृत्युप्रमाण ( दर हजारीं ): हिंदुस्थान–१६७; जपान–१४४; ऑस्ट्रेलिया–३८; इंग्लंड–५५; जर्मनी–६३; संयुक्त संस्थानें–४३; कॅनडा–५६ व फ्रान्स–९१.

दरमाणशीं वार्षिक उत्पन्न: हिंदुस्थान–रु. ६५; जपान–रु. १८०; जर्मनी–रु. ६००, इंग्लंड–रु. ९६०; संयुक्त संस्थानें–रु. १३२०.

## हिंदुस्थानांतील खेड्यांची व्यवस्था

सामान्यत: खेड्यांचे दोन वर्ग पडतात. पहिला वर्ग रयतवारी खेड्यांचा व दुसरा वर्ग जमीनदारी खेड्यांचा. जमीनदारी खेड्यांचे पुन: दोन उपवर्ग मानतां येतील: व्यक्तिगत जमीनदारी व समूहगत जमीनदारी.

रयतवारी खेड्यांत जमिनीची मालकी कोणाकडेही असली तरी कसणारा शेतकरी किंवा रयत सरकारी कर देण्याकरतां जबाबदार असतो; पण व्यक्तिगत जमीनदारी खेड्यांतील सर्व जमिनी एका जमीनदाराच्या मालकीच्या असतात व तो त्या निरनिराळ्या कुळांना कसावयास देतो. सरकारी कर देण्यास तोच जबाबदार असतो. समूहगत जमीनदारी खेड्यांत सर्व जमिनी कांहीं घराण्यांत वांटल्या गेलेल्या असतात व सर्वांनीं मिळून सरकारी सारा भरावयाचा असतो. बंगाल, संयुक्त प्रांत, उत्तर मद्रास, मध्य प्रांतांतील कांहीं भाग, मुंबई प्रांतांतील कोंकण भाग, आसाम, अजमीर व वऱ्हाड या विभागांत जमीनदारी खेडीं आहेत व इतर सर्व विभागांत रयतवारी खेडीं आहेत.

जमीनदारी खेड्यांत सर्व जमिनीवर जमीनदाराचीच मालकी असल्यामुळें तो कुळाला हवें तसे वागवूं शकत असे. कांहीं वर्षांपूर्वींच, त्यानें कुळांकडून किती खंड घ्यावा किंवा कोणते नियम लागू करावेत, याविषयीं फारसे कायदेशीर निर्बंध नसल्यानें अशा कुळांवर अतिशय जुलूम होत असे. कायदा सर्वस्वीं जमीनदारालाच अनुकूल असा होता. पण १९३७ सालापासून प्रातिनिधिक सरकार प्रांतांप्रांतांत स्थापन झाल्याच्या योगानें हें स्वरूप पालटावयास लागलें आहे; व विशेषत: “ ऑगस्ट १५ ” पासून या प्रश्नाला बरेंच महत्त्व मिळालें आहे. आणि एकदोन वर्षांत जमीनदारी नाहींशी होईल असा रंग दिसतो. एकंदर सर्वच खेडीं रयतवारी करून कुळाला संरक्षण द्यावयाचें व जमीनमालकांना नामधारी मालक बनवून ‘ कसेल त्याची जमीन ’ या नैसर्गिक तत्त्वावर जमिनीचा अधिकार कुळाकडे द्यावयाचा, असा प्रयत्न सध्यां चालू आहे. तो पूर्णपणें अमलांत यावयास फारसा अवधि लागणार नाहीं असें दिसतें. आपला अधिकार, सत्ता व जुलूम संपुष्टांत

येणार हें दिसतांच जमीनदारांचा विरोध सुरू झाला आहे हें साहाजिकच होय. पिढ्यानुपिढ्या उपभोगलेली सत्ता हातांतून जाऊं लागली तर स्वस्थ कोण बसणार ? पण कालाचा ओघ अनिवार्य असून अशा प्रकारच्या वाळूच्या बांधानें तो थांबूं शकणार नाहीं.

हीं बहुतेक सर्व खेडीं ( रयतवारी, जमीनदारीदेखील ) स्वयंपूर्ण आहेत. प्रत्येक खेड्यांत, त्यांतील खेडुतांना नित्यश: लागणारीं साधनें निर्माण करणारे कारागीर तेथेंच असतात; तसेंच त्यांना लागणारे मजूर, भांडवल, कारागिरी देखील त्याच ठिकाणीं असते. खेड्यांतील मुख्य व्यवसाय शेतकी हा असल्यामुळें या व्यवसायास लागणारीं साधनें-नांगर, विळे, कोयते, खुरपीं, कुळव, इत्यादि औतें-तयार करण्याकरितां सुतार व लोहार यांची रोजच गरज लागते. त्याचप्रमाणें कुंभार, न्हावी, धोबी व चांभार हेही खेड्यांत पाहिजे-तच. कांहीं खेड्यांत भटजी, जोशी, पिंगळे, फकीर, इत्यादि लोकही असतात. खेडें थोडें मोठें असेल तर तेथें तांबट, कोष्टी, गवंडी, शाळामास्तर, कैकाडी, वैद्य, तेली, तांबोळी, हलवाई, वाणी व सर्वांत महत्त्वाची असामी म्हणजे सावकार हेही असतात. सावकाराचें कार्य खेड्याच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचें असतें. तो खेड्यांतील श्रीमंत मनुष्य असल्यानें तेथील बऱ्याच जमिनी त्याच्या मालकीच्या किंवा त्यानें गहाण घेतलेल्या असतात. तो इतर शेत-कऱ्यांना व कारागिरांना व्याजावर कर्ज देतो व प्रसंगीं बरीच मदत करतो. हें कार्य करण्याची इतर कोणतीही सोयीस्कर व्यवस्था नसल्यानें सावकाराचें कार्यही अत्यंत उपयुक्त आहे, यांत शंका नाहीं. पुष्कळसे सावकार शेतकऱ्यांच्या असहाय्यतेचा फायदा घेऊन त्यांना लुबाडतात, व त्यांच्या जमिनी गहाण घेऊन, पुढें त्या बळकावतात, ही गोष्ट खरी; त्यांचें व्याजही जबरदस्त असतें हेंही खरें; पण इतर कोणत्या तरी चांगल्या व्यवस्थेच्या अभावीं त्यांचें कार्य उपयुक्तच म्हटलें पाहिजे. बहुतेक खेड्यांतील सावकार धान्याचा व्यापारही करीत असतो. कांहीं प्रांतांत सावकारांच्या कारवायांवर बंधन व नियंत्रण घालण्याकरितां कायदे करण्यांत येत आहेत. पण या कायद्यांचा परिणाम विपरीतच होण्याचा अधिक संभव आहे. एकतर सावकार कर्ज देण्याचें बंद करून इतरत्र आपला पैसा गुंतवूं लागतील, व त्यामुळें शेतकरी असहाय होतील. प्रसंगीं त्यांना पैसा दिसणारही नाहीं;

व दुसरें असें कीं, लोकांना पैसा कर्जाऊ देतांना सावकार फार सावधगिरी राखूं लागतील व कायद्याच्या कचाट्यांतून निसटतील. त्याकरितां हा प्रश्न सोडविण्याचा खरा मार्ग म्हणजे, शेतकऱ्यांना सरकारी देखरेखीखालीं सोप्या रीतीनें व कमी व्याजानें कर्ज मिळण्याची व्यवस्था करणें, हाच होय; व ही व्यवस्था म्हणजे सहकारी पतपेढ्यांची वाढ व सुधारणा करून शेतकऱ्यांना आपल्या पायांवर उभें करणें. शेतकऱ्यांनीं परस्परसहकार्यानें व एकीनें प्रयत्न केला तरच हा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटेल. अशा संस्थांना सरकारांतूनही विशेष मदत व सवलती दिल्या जातात. शेतकऱ्यांप्रमाणेंच इतर खेडुत कारागिरांनाही यांत भाग घेतां येईल अशी सोय करणें आवश्यक आहे.

आपल्या खेड्यांतील प्रश्न फारच व्यापक व कठीण असल्यानें ते सोडविण्याचा प्रयत्न अगदीं कसून व सर्व बाजूंनीं होणें अवश्य आहे. "सर्वारंभाः तंडुलाः प्रस्थमूलाः" या न्यायानें या सर्व कठीण प्रश्नांचें मूळ दारिद्र्यांत आढळेल. हिंदी शेतकऱ्याचें दारिद्र्य किती करुण आहे, हें महशूरच आहे. यामुळें तो पिढ्यान् पिढ्या कर्जांत पिचत राहिला आहे. या कर्जांतून जोंपर्यंत त्याची सुटका झालेली नाहीं, तोंपर्यंत आपल्या देशाच्या सुधारणेची आशाच नाहीं. या कर्जबाजारीपणाचीं मूळ कारणें पाहून, त्यांवर हल्ला चढविला पाहिजे. हीं कारणें साधारणतः पुढीलप्रमाणें आहेत. मुख्यतः आपला शेतकरी निरक्षर व अज्ञानी असल्यामुळें, त्याला आपल्या परिस्थितीची योग्य कल्पना फारशी येत नाहीं व कर्जांतून सुटण्यासाठीं त्याच्याकडून कसून प्रयत्न होत नाहीं. तो कांहींसा उधळ्या वृत्तीचा पण आहे. अगदीं गरिबींत राहूनदेखील व काटकसर करूनही लग्नासारख्या प्रसंगीं तो अवाच्या सवा पैसा खर्च करतो. आपल्या संयुक्तकुटुंबपद्धतीमुळें कुटुंबांत कांहीं आळशी माणसें तयार होतात व त्यांचा खर्च व्यर्थ सोसावा लागतो. आपल्या देशांतील शेतकी बहुशः पावसावर अवलंबून आहे, व हा पाऊस अत्यंत अनियमित असतो, व कधीं अवर्षणानें तर कधीं अतिवर्षणानें दुष्काळ पडतात, व शेतकऱ्याला कर्ज काढणें भाग पडतें; नद्यांचा पूर, आग, जनावरांच्या सांथी, मलेरियासारखे आजार, यांमुळें शेतकऱ्याचें उत्पादन घटतें व कर्ज काढावें लागतें. सरकारी शेतसारा प्रमाणाबाहेर

अधिक पडल्यानें फायदा कमी राहतो. लोकसंख्येची वाढ व उद्योगधंद्यांचा विनाश यांमुळें सर्व भार शेतीवरच पडतो व "बारा ब्राह्मणांत एक एक पै" या न्यायानें वांटणी होते. सावकार गांवींच असल्यानें कर्ज मिळणें सोपें असतें. कांहीं प्रसंगीं ही सोय बरी असली तरी व्यर्थ कर्ज काढण्याच्या प्रवृत्तीला यामुळें उत्तेजन मिळतें. या कर्जाचा दर फार असतो. बंगाल प्रांतांत कांहीं प्रसंगीं दरसाल दर शेंकडा रु. १३०० पर्यंत व्याज आकारल्याचीं उदाहरणें आहेत. याशिवाय कायदा सावकाराला अनुकूल असा होता व सावकार पैशाच्या जोरावर उत्तम वकिलाची मदत घेत असे. यामुळें कर्जाला एक प्रकारचें खत दिल्यासारखेंच होत असे. पण नव्या राजवटींत या कायद्याचें स्वरूप पालटलें असून शेतकऱ्याला वकिलाची मोफत मदत मिळण्याची व्यवस्था कांहीं प्रांतांत होत आहे. शेतकऱ्याचें अज्ञान व अंधश्रद्धा यांमुळें कोणतीही गोष्ट संपूर्णतया आकलन करण्याची त्याला शक्यताच असत नाहीं. आणखी एक फार महत्त्वाचें कारण म्हणजे शतकानुशतकें चाललेली मिळकतीची विभागणी व 'शकलीकरण' (Fragmentation) हें होय. या कारणानें शेतें इतकीं छोटीं छोटीं झालेलीं आहेत कीं, फायदेशीर पिकें करणें अशक्यप्राय होत असून, शकलीकरणामुळें तुकड्यातुकड्यांतील अंतरानें वेळ व्यर्थ जाऊन इतरही अनेक तोटे होतात. या कारणाविरुद्धही कांहीं प्रांतांत प्रतिबंधक उपाय कायद्यानें लागू करण्याचा प्रयत्न चालू आहे.

## गांवकामगार

१. मुख्य गांवकामगार पाटील हा असतो. गांवांतील सरकारी सारा वसूल करून सरकारी तिजोरींत भरणें, हें याचें मुख्य काम असतें; याशिवाय गांवांतिल लहानसहान गुन्हे, दावे, यांचा निकाल करून गांवांत शांतता राखण्याचें कामही त्याच्याकडेच असतें. २. कुलकर्णी: याचेकडे गांवांतील जमिनीच्या मालकीचा तपशील ठेवून सरकारी वसुलाचा हिशेब ठेवण्याचें काम असतें. ३. चौकीदार किंवा सनदी: गांवांत नजर ठेवून गुन्ह्याचा तपास करणें व ते कळविणें, गुन्हेगारांना पकडणें, व रक्षकांना सामान्य मदत करणें हीं कामें याच्याकडे असतात.

या गांवकामगारांचीं कामें पुष्कळ ठिकाणीं वंशपरंपरा असतात. कांहीं ठिकाणीं वतने इनाम दिलेलीं असतात, तर कांहीं ठिकाणीं ठराविक वार्षिक वेतन देण्याची पद्धति असते. त्याचप्रमाणें खेड्यांतील सुतार, लोहार, धोबी, न्हावी, इत्यादि कारागीर, व खेडें साफ ठेवून स्वच्छ राखणारे कामकरी, यांना खेडुतांची कांहीं साधीं कामें वर्षभर मोफत करून देण्याच्या श्रमाबद्दल सुगीच्या वेळीं धान्याचा कांहीं भाग मिळतो; या भागांना अलुता व बलुता असें म्हणतात व या कारागिरांना अलुतेदार व बलुतेदार अशीं नांव आहेत.

## ग्रामपंचायत

प्राचीन कालापासून आपल्या खेड्यांतील सार्वजनिक व्यवस्था ग्रामपंचायतीकडून होत असे. खेड्यांतील सार्वजनिक कामें, भांडणतंटे, विवाह, दावे व लहानसहान गुन्हे, यांची चौकशी करून निकाल देणें; सार्वजनिक उत्सव पार पाडणें व खेड्यांत एकंदरींत शांतता व शिस्त राखून लोकांचें जीवित सुरक्षित व सुखी करणें; हीं कामें या संस्थेमार्फत होत असत. त्याचप्रमाणें खेड्यांतील जुन्या संस्था, परंपरा व चालीरीती यांचा योग्य मान राखून खेडुतांच्या उन्नतीकरितां त्यांचा उपयोग करून घेणें, हेंही एक महत्त्वाचें काम पंचायत करीत असे. या व्यवस्थेमुळें गांवकऱ्यांच्या तक्रारींचा तात्काळ विचार होऊन त्यांच्याच भाईबंदांकडून निर्णय दिला जात असे व कोर्टकचेऱ्या व कायदा यांच्या भानगडींत दवडावा लागणारा वेळ व खर्च वांचत असे. इतकेंच नव्हे तर, न्याय देणाऱ्यांना वादी व प्रतिवादी यांची समग्र परिस्थिति अवगत असल्यानें त्यांच्या प्रश्नांचा विचार सहानुभूतीनें होऊन योग्य निर्णय दिला जाई. अर्थातच न्यायाधीश अगदी परिचयांतील किंवा कांहीं वेळां नात्यांतलेही असल्यानें, कांहीं उदाहरणांत पूर्वग्रहदूषित निकालाची शक्यता असे; पण सामाजिक परंपरांचा या पंचांवर इतका दाब असे कीं बहुधा असा निकाल होण्याची शक्यता नसे. न्यायनिष्ठुरता व सत्यप्रियता यांविषयीं प्राचीन हिंदवासियांची जगभर ख्याति होती. राम, युधिष्ठिर, विक्रमादित्य व अनेक ऋषींच्या गोष्टी व उदात्त चारित्र्य नेहमींच आदर्शवत् व अनुकरणीय मानलें जात असे. त्यामुळें

असा सुव्यक्त अन्याय होण्याची शक्यता कमी असे. अशा प्रकारें चटकन् न्याय मिळण्याची व सामान्य सार्वजनिक व्यवस्था राखण्याची उत्तम सोय पंचायती करीत असत.

मुसलमानी अमलापासून या व इतरही प्राचीन संस्था हळूहळू कोलमडूं लागल्या. वारंवार अन्यायी आघात झाल्यामुळें त्यांच्यांतील सहनशक्ति कमी होऊं लागली व त्यांची अवनति सुरू झाली. ही अवनति ब्रिटिश अमदानींत पूर्ण होऊन ही अतिप्राचीन, अत्युपयुक्त व सर्व राष्ट्रव्यवस्थेस आधारभूत अशी संस्था नष्टप्राय झाली. नवी न्यायदानपद्धति, नवा कायदा, व नवा अंमल यांमुळें या संस्थेचें महत्त्वच नाहींसें झालें. या सर्व अभूतपूर्व आघातानें खेड्यांतील वर्षानुवर्षें चाललेल्या सामान्य जीवनक्रमाचेंच विघटन सुरू झालें. विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून राजकीय जागृति सुरू झाली, व देशांतील विद्वानांना व पुढाऱ्यांना या संस्थेची उपयुक्तता पटूं लागली, व १९३७ सालीं प्रातिनिधिक सत्ता सुरू झाल्यानंतर सरकारचें लक्ष या प्रश्नाकडे विशेष वेधलें गेलें, व या संस्थेच्या पुनरुज्जीवनास सुरुवात झाली, व पुष्कळ खेड्यांत नव्या पंचायती स्थापन करण्यांत आल्या, व त्यांना अधिक अधिकार देण्यांत आले. या विषयावर सविस्तर माहिती १० व्या प्रकरणांत येईलच.

आपल्या खेड्यांची रचना अत्यंत आरोग्यघातक असल्यानें ही परिस्थिति सुधारण्याकरितां लोकल बोर्डासारख्या दूरस्थ व अनभिज्ञ संस्थेचा कांहीही उपयोग होण्यासारखा नाही. खेडुतांनीच सहकार व एकी करून हे प्रश्न सोडविले पाहिजेत. याकरितां पंचायतीसारख्या स्थानिक संस्थेचाच उपयोग होईल. गांवांतील रस्ते, रस्त्यावरील दिवे, दुरुस्ती, साफसफाई, गटारें बांधणें, आरोग्यघातक घरें पाडून व ठिकाणें साफ करून रोगांच्या सांथींना प्रतिबंध करणें, सार्वजनिक विहिरी व तळीं खोदणें व दुरुस्त राखणें, पाणीपुरवठा व त्याची स्वच्छता, शाळा, लहानसे दवाखाने, इत्यादि सोयी, मलेरियासारख्या रोगांवर तात्काळ उपाययोजना करणें, इत्यादि ग्राम-सुधारणा, सहकारी संस्थांना मदत, तात्काळ न्यायदान, वगैरे कामें फार उपयुक्त असून पंचायत संस्थांनाच तीं योग्य प्रकारें व कौशल्यानें हाताळतां येतील.

**शहरें:**

लोकसंख्येच्या वाढीमुळें व समाजांतील राजकीय व आर्थिक व्यापांच्या वाढीमुळें शहरांची कशी सुरुवात झाली हें आपण पाहिलेंच. त्यानंतर शहरांची निरनिराळ्या कारणांमुळें भरभराट झाली. कांहीं ठिकाणें सुरक्षिततेच्या दृष्टीनें चांगली असल्यानें त्या ठिकाणी अधिकाधिक लोक येऊन राहूं लागले; नैसर्गिक सुरक्षितता किंवा कृत्रिम किल्ले, भिंती, इत्यादि आकर्षणें त्या काळीं फार महत्त्वाचीं असत. अशा ठिकाणीं राजा किंवा पुढारी रहावयास आल्यामुळें त्याचे अनुयायी व त्यांचीं कुटुंबेंही येत व कांहीं काळानें त्या ठिकाणास राजकीय महत्त्व येऊन त्याचें शहर बनत असे. प्राचीन काळीं पाटलीपुत्र, राजगृह, इत्यादि गांवीं मजबूत किल्ले व तट बांधून राजा तेथें राहूं लागल्यानें तीं शहरें बनलीं, त्याचप्रमाणें इंद्रप्रस्थ हेंदेखील राजधानीचें शहर झाल्यामुळें वाढलें.

प्राचीन काळीं संरक्षण हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न असे व संरक्षणाकरितां राजाश्रय हा मुख्य उपाय असे. यामुळें प्राचीन काळचीं बहुतेक प्रमुख शहरें राजधानीमुळें वाढलेलीं होतीं. राजा हा शक्तिमान् व श्रीमान् असल्यामुळें नाना प्रकारच्या कलावंतांना व कारागिरांना आश्रय देणें हें त्याचें कर्तव्य व भूषण मानलें जाई. या सर्वसंग्राहक वृत्तीमुळें राजधानींत प्रत्येक प्रकारचे कलावंत व कारागीर येऊन रहात व त्यामुळें त्या ठिकाणीं हरप्रकारचे उद्योगधंदे व व्यवसाय चालत. कोणत्याही शहरांत अशा प्रकारचे बाहेरून आलेले कारागीरच अधिक असतात. त्यामुळें त्यांचा प्रमुख व्यवसाय शेती हा नसून उद्योग हा असतो. हा एक शहराचा विशेषच होय.

प्राचीन काळी कांहीं ठिकाणी संस्कृति आणि शहर हीं एकमेकांस पूरक होत वाढलेलीं दिसतात. शहरांच्या वाढीबरोबर संस्कृतीची व संस्कृतीबरोबर शहराची वाढ झालेली आढळून येते व त्याप्रमाणेंच शहराबरोबरच संस्कृतीचाही नाश झालेला दिसतो. मोहेंजोदारो व हराप्पा येथील संस्कृति, त्याचप्रमाणें निनेव्हे, टायर, माया, ट्रॉय, बॅबिलॉन, अथेन्स, स्पार्टा, रोम, कार्थेज्, थीब्स्, अलेक्झँड्रिया, बायझांटियम्, फ्लॉरेन्स, व्हेनीस, येथील संस्कृतींचा प्रकाश शहराबरोबरच फोंफावला व शहरें संस्कृती-

बरोबरच तेजोहीन झालीं. जणूं काय शहर म्हणजे शरीर व संस्कृति हा त्या शरीराचा प्राणच. प्राणच नाहींसा होतांच शरीर सडून जावें किंवा शरीराबरोबरच प्राण विलीन होऊन जावा. यांपैकीं कांहीं शहरांचा नाश संस्कृतीच्या नाशामुळें झाला तर कांहीं शहरांच्या विनाशामुळें संस्कृति नामशेष झाली. ग्रीशियन् व रोमन् संस्कृतीच्या विलयामुळें अथेन्स् , स्पार्टा, रोम, हीं शहरें हीनावस्थेस पोंचली, तर मोहेंजोदारो, हराप्पा, ट्रॉय् , कार्थेज, इत्यादि शहरें निसर्गकोपामुळें किंवा शत्रुकोपामुळें नष्ट झाल्यानें तेथील संस्कृतींचाही नाश झाला. अशा प्रकारें या संस्कृती व हीं शहरें यांचा उत्कर्ष व विलय यांत एक प्रकारची विलक्षण लयबद्धता दिसते. या सर्व संस्कृतीचें एक वैशिष्ट्य असें कीं त्यांचा सर्व उत्कर्ष, त्यांचें सर्व ज्ञान, सर्व बुद्धि व सर्व सामर्थ्य एकाच शहरांत केंद्रित केलेलें असे व त्या केंद्राबाहेर त्या संस्कृतीचा फारसा परिचय कुणालाच नसे आणि म्हणूनच त्या केंद्राचा नाश म्हणजेच संस्कृतीचा नाश असें ठरून गेलेलें होतें.

या उलट कांहीं संस्कृती प्रारंभापासूनच विकेंद्रित होऊन सर्व देशभर खेडोंपाडीं पसरलेल्या होत्या. त्यांचा गतिमान् आत्मा सर्व खेड्यांतून सरस्वतीच्या प्रवाहासारखा गुप्तपणें वहात होता. अशा देशांतील शहरांत कितीही विद्वत्ता, ज्ञान, बुद्धि, व सामर्थ्य हीं भरलेलीं असलीं तरी तें शेंकडों स्वरूपांपैकीं एक स्वरूप असल्यानें एकाद्या शहराच्या नाशानें संस्कृतीला कोणताही धोका पोंचूंच शकत नसे. संस्कृतीची प्रज्वलित ज्योत अखंड तेवत ठेवण्याकरितां शहरांची आवश्यकताच नव्हती. खेड्यांतून तें काम सतत चालू असे. यामुळें या संस्कृतींत शहरांमुळें कितीही प्रगति होत असली तरी संस्कृतिसातत्याच्या दृष्टीनें शहराचें महत्त्व गौण असून, त्याच्या विलयामुळें समाजपुरुषाला कोणताही धोका पोंचत नसे. हिंदुस्थान व चीन या देशांतील संस्कृति या प्रकारची म्हटली पाहिजे.

हिंदुस्थानांतील कांहीं शहरांची वाढ तीं तीर्थक्षेत्रें म्हणून प्रसिद्धीस आल्यामुळें झाली. काशी, रामेश्वर, प्रयाग, पुरी, गया, इत्यादि शहरें तीर्थक्षेत्र या महत्त्वामुळें प्रथमतः वाढलीं, व नंतर त्या ठिकाणीं उद्योगधंदे सुरू होऊन त्यांना कायमचें स्वरूप प्राप्त झालें. या शहरांकडे सर्व हिंदुस्थानांतून भाविक लोक येतात. ही प्रथा शेंकडों वर्षे चालू आहे. प्रथमतः या यात्रेकरूंच्या

सहाय्यावरच हे उद्योगधंदे चालत; पण कालांतरानें त्यांना बळकटी येऊन, हीं शहरें उद्योगधंद्याकरितांही प्रसिद्ध झालीं. कांहीं शहरें दळणवळणाच्या प्रमुख मार्गावर वसल्यामुळें वाढतात, तर कांहीं शहरें एखाद्या विशिष्ट धंद्याकरितां योग्य असलेल्या प्रदेशांत वसल्यामुळें संपन्न होतात. मुंबई, मद्रास, कलकत्ता, कराची, इत्यादि शहरें वाढण्यास बरींच कारणें आहेत. त्यांचें बंदर या दृष्टीनें अत्यंत महत्त्व असून, त्यांच्या आसपास प्रचंड माल तयार होतो, व तो देशोदेशीं पाठविण्याच्या व परदेशांतून माल आयात करण्याच्या उद्योगामुळें, तसेंच त्यांच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक महत्त्वामुळें त्यांची वाढ झपाट्यानें झाली. मुंबई प्रांतांत कापूस, व बंगाल प्रांतांत ताग, या फार महत्त्वाच्या मालाच्या उत्पादनामुळें मुंबई व कलकत्ता हीं शहरें विशेषच संपन्न झालीं.

## शहरांतील वैशिष्ट्यें

साकल्यानें विचार करतां, नागर जीवनांत अतिरिक्त विविधता आढळते; पण तेथील व्यक्तिगत जीवन मात्र बरेंच एकांतिक असते. या उलट खेड्यांत सामान्य जीवन एकांतिक असून, व्यक्तिगत जीवनांत विविधता असते. शहरांतील कांहीं श्रीमंत व हौशी लोक सोडले तर इतर सर्वांचा रोजचा जीवनक्रम अगदीं छापील झालेला असतो. त्यांतूनही गरीब कामगार लोकांचा ( व शहरांत हेच लोक बहुसंख्य असतात ) जीवनक्रम अगदीं एकजात कंटाळवाणा असून असह्य वाटतो. विशेषतः आपल्या देशासारख्या गरीब देशांत तर सामान्य नागरिकांना सर्व वेळ आपल्या व्यवसायांतच कंठावा लागतो. या व्यवसायांत तरी निदान कांहीं वैचित्र्य किंवा मनोरंजकता असावी, तर तेंही नसतें. शहरांतील बहुतेक सर्व उद्योगधंद्यांत बरेंच “ श्रमविशेषण ” करण्यांत आल्याच्या योगानें प्रत्येक कामगाराकडे एकच ठराविक काम असतें व सकाळपासून संध्याकाळपर्यंत तेंच तें करीत बसावें लागल्यानें विलक्षण कंटाळा येणें अपरिहार्य होय. कांहीं कांहीं कामांत तर सतत चार चार तास एका यंत्राकडे पहात बसावें लागतें; उदाहरणार्थ कापडाचें यांत्रिक विणकाम चालू असतांना प्रत्येक धागा न तुटतां जावा लागतो, व कोणता धागा तुटला हें समजण्याकरितां प्रत्येक धाग्यावर एक

पिन् बसविलेली असते, व धागा तुटतांच ती खालीं पडते व यंत्र बंद होतें; हें काम फक्त पाहात बसावें लागतें. अशींच पुष्कळ कामें असतात. या दृष्टीनें शेतकऱ्याच्या किंवा खेडुतांच्या कामाकडे पाहिल्यास त्यांत पुष्कळच विविधता असून तें बरेंच सुसह्य असतें, असें म्हणावें लागेल.

व्यवसायांच्या विविधतेमुळें शहरांत नाना प्रकारचे लोक जमतात; "व्यक्ति तितके व्यवसाय" असें म्हणावयास हरकत नाहीं. या विविधतेचें एक प्रमुख कारण म्हणजे नागरिकांचें हवामानासंबंधी औदासीन्य. शहरांतील धंदे फारसे हवामानावर अवलंबून नसल्यानें हवामानांतील फरकाप्रमाणे उद्योगांत फरक होण्याचें कारण नाहीं. म्हणून तिन्ही त्रिकाळ प्रत्येकाचा व्यवसाय अखंड चालू असतो. पावसाळा, हिंवाळा किंवा उन्हाळा या ऋतूंचें शहरवासीयांना व्यवसायांत तरी फारसें सोयरसुतक नसतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेंच खेड्यांत मात्र सर्वांचे व्यवसाय " हंगामावर " अवलंबून असतात. सुगीचा हंगाम येतांच सर्वच शेतकरी एकाच प्रकारच्या कामांत गुंतून राहतात; खुरपणीच्या हंगामांत साऱ्या शिवारांत माणसें खुरपणी करतांना आढळतील; तसेंच पेरणीच्या हंगामांत सर्वांची पेरणी एकाच वेळीं चाललेली असते; ऋतुभेदानुरोधानें व्यवसाय बदलतात; पावसाळ्यांत सर्वांनाच कमी काम असतें. अशा प्रकारें ग्रामीण सामाजिक जीवनांत एक प्रकारची विशिष्ट लयबद्धता दिसून येते, तर नागरी जीवनांत हजारों वाद्यांच्या सरमिसळीचा गोंगाट दिसून येतो.

शहर आणि खेडें यांतील जीवनांत आणखी कितीतरी विरोधी गोष्टी आढळतात. खेड्यांत एका कुटुंबांतील बातमी तात्काळ सर्व ठिकाणी पसरते व सर्वांचा एकमेकाशीं चांगला परिचयही असतो. या उलट शहरांत शेजारीं शेजारीं वर्षानुवर्ष राहूनही परिचयाचें नांवही नसतें. प्रत्येक कुटुंब आपल्या कार्यांत इतकें मग्न असतें कीं जणूं इतर कुटुंबांच्या अस्तित्वाची जाणिवही नसते. शहरी जीवन अत्यंत व्यक्तिनिष्ठ व आत्मकेंद्री झालेलें असतें. प्रत्येक चाळींत वेगवेगळे व्यवसाय करणारे, अनोळखी नाना प्रकारचे लोक राहतात. त्यांच्यांत एकहीसमान गुणधर्म नसल्यामुळें गजबजलेल्या चाळींत राहूनही कुणाची ओळख-देखही नसते. पण खेड्यांत एकादी राष्ट्रीय किंवा प्रांतिक महत्त्वाची बातमी वर्षवर्षभर पोंचतही नाहीं; तेंच शहरांत एका तासाभरांत सर्व प्रचंड शहर

खडबडून उठतें. वर्तमानपत्राचें वाचन, रेडिओवरील बातम्या क्षणांत सर्व ठिकाणीं दुमदुमतात. एकादा संप, एकादी सभा किंवा आंदोलन, यांची बातमी विद्युद्वेगानें सर्वत्र पसरते व तिची सर्वांनाही जाणीव झालेली असते. एक व्यक्ति जी बातमी ज्या वेळीं वाचीत असेल, तीच बातमी त्याच वेळीं शेकडों इतर लोकही वाचताहेत ही त्याला जाणीव असते. त्यामुळें प्रत्येकाला समूहशक्तीची जाणीव एकसमयावच्छेदेंकरून होते व प्रचंड घडामोडी होऊं शकतात. शहरांत दंगल किती लवकर पसरते याची आठवण ताजीच आहे.

हिंदुस्थानांतील बहुतेक शहरें अद्यापि वाढत्या स्थितीत आहेत. औद्योगिक विकासाच्या प्रारंभापासून कांहीं शहरांना फारच महत्त्व आलेलें आहे. या वाढत्या शहरांत खेड्यांतून व्यवसायधंद्याकरितां आलेले बरेच लोक असतात व यांचे प्रश्नच अधिक बिकट असतात. खेड्यांतील वातावरणांतून एकदम शहरी वातावरणांत आल्यानंतर अगदीं अनोळखी माणसांत व अपरिचित चालीरीती व पद्धती यांच्या कक्षेत आल्याने पूर्वीच्या चालीरीती व पद्धती शिथिल होतात; खेड्यांतील जिव्हाळ्याचे संबंध तुटतात, नवे संबंध व मित्र सहसा जुळत नाहीत, व जीवन अधिकाधिक व्यक्तिनिष्ठ व एकाकी बनत जातें. हवामानांतील फरक, सत्त्वहीन अन्न, अतिशय गर्दीची राहणी व आरोग्यघातक घरें, यांमुळें माणसाच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो. खेडेगांवांत दारू, जुगार, वगैरे व्यसनें कमी प्रमाणांत असतात; पण शहरांत आल्यावर तींही जडूं लागतात. खेड्यांत श्रम करावे लागत असले तरीं त्यांत मधून मधून विश्रांति घेण्याला सवड असते; पण कारखान्यांत सतत कडक देखरेखीखालीं भारी कामें करावीं लागल्यानें प्रथमतः जड वाटतें.

सामाजिक मताचा दाब शहरांत बराच कमी असतो. यामुळें शील, अब्रू व कीर्ति यांविषयीं खेड्यांत जी खबरदारी घ्यावी लागते ती शहरांत घ्यावी लागत नसल्यानें माणूस हवातसा वागूं शकतो. दुष्ट, व्यसनी, चोर, गुन्हेगार माणसें शहरांतील ‘ अपरिचितता व उदासीनता ’ यांमुळें उजळ माथ्यानें हिंडूं शकतात, व आपलीं व्यसनें आणि गुन्हे छपवूं शकतात; पण खेड्यांत तीं सर्व तात्काळ चव्हाट्यावर येऊन चौकशी सुरू होते व गुन्हेगारांना जीवन असह्य होतें. शिवाय शहरांत अशा प्रवृत्तींना सवड व अवसर मिळूं शकतात.

अशा प्रकारें हीन वृत्ति, व्यसनें व शीलाची अवनति, यांना बरेंचसें पोषक वातावरण शहरांत असतें; पण त्याबरोबरच ज्ञान, शिक्षण, संस्कृति, अधिकार, संपत्ति व व्यवसाय मिळविण्याची संधी व साधनें शहरांतच वैपुल्यानें मिळं शकतात. सर्व खंडांतील सर्व महत्त्वाच्या दैनंदिन घडामोडी सविस्तरपणें सांगणारीं वर्तमानपत्रें रोज अगदीं कमी खर्चांत तुम्ही शहरांत वाचूं शकतां; त्याचप्रमाणें देशी व परदेशी घडणाऱ्या गोष्टी, गायन, भाषण, इत्यादि कार्यक्रमांनीं रोज मनोरंजन करून ज्ञानवृद्धि करणारी ' आकाशवाणी, ' शास्त्रीय, कलाविषयक, तांत्रिक, औद्योगिक, व्यापारी, शेतकीविषयक व इतर सर्व प्रकारचें शिक्षण देऊन विद्यार्थ्यांना ज्ञान व संधी मिळवून देणारीं विद्यालयें व महाविद्यालयें, सर्व प्रकारचा लाभ घडवून देणारी वाचनालयें, नानाप्रकारच्या कार्यांकरितां अहोरात्र झटणाऱ्या विविध संस्था, अमाप संपत्ति मिळवून देणारे उद्योगधंदे, बेकारांना व गरजूंना काम मिळवून देणारे कारखाने, माणसाची सेवा करणाऱ्या सोयी, मनोरंजन करणाऱ्या नाट्य, गायन, व चित्रपटसंस्था, निरानिराळे खेळ, ज्ञानसंवर्धक प्राणिसंग्रहालयें व वस्तुसंग्रहालयें व इतर शेंकडों गोष्टी शहरांतच मिळतील. खेड्यांतील नित्यक्रम जसे संथपणानें चाललेले असतात, तसे शहरांत कधींही आढळणार नाहीत. विशेषतः मुंबईसारख्या प्रचंड शहरांत तर रात्रंदिवस घाई, धांवपळ, गर्दी, ' ती ट्रॅम् रे ' ' ती बस् रे ' ' अरे ती लोकल निघाली पकड ' अशी जिवाची धांवाधांव चाललेली असते. शहरांतील परिस्थिति मोठी विषम असते. तेथें नवकोट नारायणापासून तो अगदीं कफल्लक नाऱ्या हमालापर्यंत व ज्ञानसंपन्न विद्वानापासून अज्ञानाच्या गर्तेत लोळणाऱ्या दारुड्यापर्यंत सर्व लोक वास करतात. विषम, परस्परविरोधी, चांगल्या-वाईट, सज्जन-दुर्जन, श्रीमंत-गरीब, अशा सर्व प्रकारच्या माणसांनीं गजबजलेलें शहर म्हणजे एक अजबखानाच होय.

शहरवासियांचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांचें विलक्षण औदासीन्य. कोण येवो, कोण जावो, हा लहान, हा मोठा, याविषयीं त्यांना कधीं औत्सुक्य वाटणार नाहीं. मी जेव्हां जेव्हां मुंबईस जातों तेव्हां तेव्हां हा प्रकार पाहून माझें मन विषण्ण होतें. कोणी मनुष्य कितीही महत्त्वाचा असो, त्याच्याबद्दल मुंबईकराला कधीं कौतुक वाटायचें नाहीं. तेथला तो प्रचंड

उद्योगव्यापृत व गंभीर जनसमुदाय, त्यांतील नाना प्रकारचे लोक पाहून मला असें वाटतें कीं, " किती क्षुद्र मी ! या लोकसागरांत मला अस्तित्व तरी आहे का ? " ओळखीचीं माणसें कधीं काळीं भेटलीं तरी तींसुद्धां विशेष औत्सुक्य किंवा उत्साह दाखविणार नाहींत. मोटारींतून गव्हर्नर जनरल जावो कीं एकादा लबाड गुन्हेगार जावो; त्याचें लोकांना आपलें कांहींच सोयरसुतक नाहीं. यामुळें मी जेव्हां मुंबईला जातों तेव्हां तिथल्या गर्दी, घाई व घाम या त्रयींमुळें माझा जीव जितका उबारून जातो, त्याहूनही अधिक या मुंबईकरांच्या ' सुतकी ' वृत्तीमुळें उबारतो व मला शक्य तों लवकर मुंबई सोडण्याची घाई लागते. तेंच आमच्या खेडेवजा शहरांत रस्त्यानें जातांना ' मी कुणीतरी आहें ' असें वाटून अभिमान वाटूं लागतो. कुणाला जर दुरभिमान वाटत असेल व तो घालविण्याची इच्छा असेल तर त्यानें मुंबईला भेट द्यावी.

अशा प्रकारच्या वैचित्र्यपूर्ण समाजामुळें नागरी प्रश्न अतिक्लिष्ट व अतिसंख्य असतात. संमिश्र व विषम घटकांचें बहुरंगी जीवन लयदार व सुखी करणें, हें कार्य मोठें कठीण आहे. या सर्व प्रश्नांचें थोडक्यांत समालोचन करावयाचें, तर त्याचे दोन भाग पडतात : १. नगररचना व व्यवस्था आणि २. सांस्कृतिक उन्नति. नगरव्यवस्था या भागाचा विचार १० व्या प्रकरणांत केलेला आहे. दुसऱ्या भागांत नागरिकांचे शिक्षण, आरोग्य, नैतिक उन्नति, चरितार्थ-सुधारणा, आर्थिक सुधारणा व सामान्य समृद्धि यांचा समावेश होतो.

नागरिकांच्या आरोग्याचा नगररचनेशीं अत्यंत घनिष्ठ संबंध आहे. सूर्यप्रकाश व मोकळी हवा यांच्याशिवाय आरोग्य राखणें शक्यच नाहीं. शरीरांत वारंवार सांचणारी घाण किंवा अनिष्ट द्रव्यें साफ करून त्याला पुष्टी देण्याकरितां या दोन गोष्टी अनिवार्य आहेत. याचकरितां प्रकाश व हवा सतत खेळत राहतील अशीच घरांची व शहरांची रचना पाहिजे. तज्ज्ञांच्या मतें प्रत्येक माणसाला आरोग्याच्या दृष्टीनें ३००० घनफूट हवा, व पर्यायानें कमींत कमी १०० चौरस फूट जागा हीं हवींतच. मुंबई शहरांत प्रत्येकीं सर्वसाधारण जागा २७·५८ चौ. फू. मिळते, अहमदाबाद शहरांत

४३·०४ चौ. फू. व सोलापुरांत २४·०३ चौ. फू. असें प्रमाण पडतें. अशा प्रकारें प्रत्येकीं साधारण जागा आवश्यक जागेहून इतकी कमी पडते तर, प्रचंड हवेल्या वैगेरे वगळल्यास एकंदर माणशीं जागा किती टांचकी आहे याची कल्पना करतां येईल. या दृष्टीनें आवश्यक तितक्या जागेची योजना करूनच नगररचना होणें आवश्यक आहे. सामान्य आरोग्याकरितां जशा या गोष्टी अपरिहार्य आहेत, तशा वैय्यक्तिक आरोग्यरक्षणाकरितां आणखी कांहीं गोष्टी आवश्यक आहेत. योग्य आणि भरपूर आहार व स्वच्छ पाणी यांवरच जीवन अवलंबून असतें. योग्य व भरपूर आहार म्हणजे काय? जीवनाला व आरोग्याला आवश्यक अशीं जीवनसत्त्वें व प्रोटीन, कार्बोहायड्रेट्स्, फॅटस्, कॅल्शियम् व लोह, इत्यादि द्रव्यें ज्या अन्नांत योग्य प्रमाणांत आहेत, तो योग्य आहार; व रोजच्या श्रमामुळें झालेली शारीरिक झिज भरून काढून शरीरास पुष्टि देण्यास पुरतील इतपत आहारास भरपूर आहार असें म्हणतां येईल. अशा आहारानेंच योग्य आरोग्यसंवर्धन होईल.

नागरिकांच्या नैतिक उन्नतीच्या आड येणाऱ्या पुष्कळ गोष्टी शहरांत असतात, हें आपण पाहिलेंच आहे. पुष्कळ मोहक व आकर्षक गोष्टी शहरांत असतात; पण त्यांचा उपयोग अत्यंत सारासार विचारानें करावा लागतो. ताडीगुत्ते, मद्यपानगृहें, वेश्यागृहें, जुगाराचे अड्डे, घोड्यांच्या शर्यती, या मोहक पण घातक गोष्टी शहरांत सर्वत्र असतात. त्याचप्रमाणें त्यांच्याकडे आकृष्ट करणारें वातावरणही शहरांत असतें; सामाजिक दाबही अगदीं शिथिल असतो. नीतिमत्तेच्या कल्पना कितीही भिन्न असल्या तरी या गोष्टींमुळें आरोग्याची व पैशाची हानि होण्याची अतिशय शक्यता असते, ही गोष्ट कोणी नाकबूल करणार नाहीं, व या गोष्टीपासून सावध राहण्याची आवश्यकता कोणीही कबूल करील. याकरितां नागरिकांच्या मनावर नीतिमत्ता बळकट करण्याची आवश्यकता, व वरील मोहापासून होणाऱ्या सामाजिक, कौटुंबिक, व वैय्यक्तिक अवनतीचे दुष्ट परिणाम योग्य प्रकारें बिंबविले पाहिजेत, व याला पूरक म्हणून अशा गोष्टींचें शक्य तों नियंत्रण केलें पाहिजे. या दृष्टीनें मद्यपानबंदी, वेश्यागृहांचें व जुगाराचें नियंत्रण, शर्यतींची हकालपट्टी यांची फार आवश्यकता आहे. साक्षरता, शिक्षण, व सामान्यज्ञान यांचें महत्त्व 'मूले कुठारः' असें असल्यामुळें त्याकरितां सर्व प्रयत्न झाले पाहिजेत. नीतिमत्ता व मन

खंबीर करण्याकरितां योग्य शिक्षण व वाचन यासारखा उत्तम उपाय नाहीं. कार्यक्षम शिक्षणसंस्था, सक्तीचें मोफत शिक्षण, सर्वत्र वाचनालयें, व्याख्यानें, प्रवास, वृत्तपत्रें, नभोवाणी, इत्यादि साधनांच्या द्वारें मनावर योग्य ते परिणाम घडवून आणतां येतात. सामान्य ज्ञानाकरितां प्राणिसंग्रहालयें व वस्तुसंग्रहालयें यांचाही उत्तम उपयोग होतो.

चरितार्थसुधारणेकरितां पैशाइतकेंच मनाचेंही पाठबळ लागतें. त्याकरितां एक विशिष्ट व बळकट मनोवृत्ति तयार होणें अवश्य असतें. या महत्त्वाकांक्षी वृत्तीमुळेंच माणूस आपलें चरितार्थमान वाढवूं शकतो. या वृत्तीचा हिंदी मजूरवर्गांत बराचसा अभाव दिसून येतो. त्यामुळें आला दिवस कसा तरी भागवावयाचा, ही त्याची नैसर्गिक वृत्तीच झालेली आहे. याउलट इंग्लिश व अमेरिकन कामगार योग्य प्रकारें कुटुंब पोसण्याची ऐपत येईपर्यंत लग्न करीत नाहींत, व त्यामुळें त्यांचें चरितार्थमान खालीं येऊं शकत नाहीं. ही मनोवृत्ति तयार करण्याकरितांदेखील सामान्य ज्ञान व शिक्षण यांचीच आवश्यकता असते. यामुळें माणसाला आपल्या प्राप्त परिस्थितीची व भावी शक्यतेची परिपूर्ण कल्पना येते, व " कसें तरी जगावयाचें " ही वृत्ति नाहींशी होऊन व्यवस्थित व आटोपशीर संसार कसा करावा, याचा विचार तो करूं लागतो.

प्रकरण ८ वें

# संस्थान

## व्याख्या

संस्थानाची व्याख्या विविध प्रकारें करण्यांत येते. पण बहुतेक सर्व व्याख्यांचा मथितार्थ तोच असतो. या सर्वांचा सारांश असा कीं संस्थानाचे प्रमुख घटक चार होत: १. निश्चित क्षेत्रमर्यादा; २ जनता; ३. स्वातंत्र्य व ४. संघटित शासनसंस्था. खालीं कांहीं व्याख्या दिल्या आहेत. त्यांत तपशीलाचा मतभेद असला तरी सारांश एकच आहे, असें दिसून येईल.

> " ,ज्या क्षेत्रविशिष्ट समाजाचे शासनसंस्था व प्रजा असे दोन विभाग असून जो आपल्या क्षेत्रमर्यादेंतील सर्व संस्थांवर अधिकार गाजवतो त्यासच संस्थान म्हणतात. " लास्की.
>
> " प्रभावी शासन-संस्थेच्या शासनांनीं क्षेत्रमर्यादित ज्ञातीमध्यें समाजव्यवस्थेची सर्वसामान्य बाह्य परिस्थिति टिकविणारी संस्था म्हणजेच संस्थान होय. " मॅक्आय्व्हर.
>
> " निश्चित क्षेत्रविभाग व्यापणारी, शासनसंस्थेनें संघटित केलेली, ऐक्य आणि स्वातंत्र्य यांनीं युक्त अशी जमात म्हणजेच संस्थान होय. "

या तीनही व्याख्या तपासून पाहिल्या तर प्रथम उल्लेखिलेले चारही विशेष त्यांत आढळून येतील; व हें साहजिकच आहे. कोणत्याही संस्थानांत जर माणसें नसतील तर त्याला संस्थान म्हणतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें एकादी जमात जर भटकी असेल व वारंवार एका जागेहून दुसऱ्या जागेंत जात असेल तर तिला राजकीय महत्त्व येणें शक्य नाहीं. ती आज या संस्थानांत तर उद्यां त्या संस्थानांत अशी भटकत राहील तर त्यामुळें तिला सार्वभौमत्व येणें शक्य नाहीं, व म्हणूनच तिला संस्थान असें म्हणतां येणार नाहीं. सार्वभौमत्व किंवा स्वातंत्र्य हें तर संस्थानाचे प्राणच. एकाद्या बाह्यसंघटनेमुळें जर मान तुकवावी लागत असेल तर कोणत्याही देशाला संस्थान असें म्हणतां येणार नाही. याच कारणामुळें १५ ऑगस्ट १९४७ पूर्वी हिंदुस्थानला संस्थान म्हणतां येत नसे. नाहीं तर हजारों वर्षापासून हिंदुस्थानांत जनताही आहे व तिनें व्यापिलेला मर्यादित क्षेत्रविभाग पण आहे. पण पारतंत्र्यामुळें हा प्रचंड देश संस्थान म्हणवून घेऊं शकत नसे. चौथा विशेष म्हणजे संघटित शासनसंस्था. कोणत्याही देशांत जर संघटित शासनसंस्था नसेल तर तेथें अराजक माजेल व त्या देशाचें स्वातंत्र्य नाहींसें होईल. याचकरितां संघटित शासनसंस्थेखेरीज कोणतेंही संस्थान टिकणें शक्य नाहीं.

मात्र कोणत्याही देशाचें " संस्थानत्व " त्याच्या लोकसंख्येवर किंवा क्षेत्रफळावर अवलंबून नसतें. लोकसंख्येच्या बळावर, पराक्रमावर किंवा यांत्रिक शक्तीवर आपलें स्वातंत्र्य टिकविण्याचें सामर्थ्य असलेले अमेरिका-रशियासारखे देश ज्याप्रमाणें " संस्थान " या पदवीला पात्र होतात, त्याच-प्रमाणें इतर संस्थानांनीं राजनैतिक कारणाकरितां किंवा केवळ अनुग्रहाखातर ज्यांचें स्वातंत्र्य मान्य केलेलें असतें असे चिमुकले देशही " संस्थान " असे संबोधिले जातात. अशा देशांचींही कांहीं उदाहरणें आहेत. इटली-मधील ॲपिनाईन पर्वतांत वसलेलें सॅनमॅरिनो. या " संस्थाना"ची लोकसंख्या १३९४८ असून क्षेत्रफळ ३८ चौ. मैल आहे. हें स्वतंत्र प्रजासत्ताक संस्थान आहे. फ्रान्सच्या दक्षिण विभागांतील मोनॅको या संस्थानाची लोकसंख्या २२१५३ असून क्षेत्रफळ ७९९ चौ. मैल आहे.

## संस्थानाचा हेतु

संस्थानाच्या हातीं जी इतकी प्रभावी सत्ता, समाज आपणहून केंद्रित करितो याचें कारण काय ? संस्थानाचा हेतु किंवा साध्य काय ? हा प्रश्न अत्यंत विवाद्य असा आहे. महाभारतापासून तों लास्कीपर्यंत प्रत्येकानें निरनिराळीं मतें प्रतिपादन केलेलीं आहेत.

सद्गुणांना उत्तेजन देऊन प्रजेच्या नैतिक जीवनास मार्गदर्शन करणें, चुका झाल्यास सुधारणें व त्यांचें नियंत्रण करणें व त्याचप्रमाणें भूमि साफ करून वसाहतीस योग्य व सुखावह करणें, हें संस्थानाचें कर्तव्य होय असें महाभारतांत सांगितलेलें आहे. प्रख्यात ग्रीक विद्वान् ॲरिस्टॉटल याचेंही मत असेंच असून तो म्हणतो कीं ( समाजाप्रमाणेंच ) संस्थान हेंही नैसर्गिकच होय. संस्थानाचा प्रारंभ जीवनाकरतां असून, जीवन आदर्श बनविण्याकरितांच त्याचें अस्तित्व असतें. अशा प्रकारें संस्थानाचा हेतु नैतिक आहे. मानवी जीवनाचें जें साध्य आहे त्याचकरितां संस्थान असतें, लोकसंख्येच्या वृद्धीकरितां, संपत्तीकरितां, साम्राज्याकरितां किंवा सामर्थ्य वाढविण्याकरितां नव्हे. मानवी आयुष्याचें ध्येय साध्य करावयाचें तर संस्थानाशिवाय तरणोपाय नाहीं. याचकरितां संस्थान हेंच एक साध्य होय.

मागें समाजाविषयीं विचार करतांना आपण दोन प्रकारचे विचारप्रवाह पाहिले व क्षेत्रमर्यादित संघटित समाज म्हणजेच संस्थान. यामुळें ते विचारप्रवाह संस्थानासही लागू पडतात. पहिल्या प्रवाहाप्रमाणें पाहतां समाज हा एक महाप्राणी असून व्यक्तीनें त्याला नेहमीं आत्मसमर्पण केलें पाहिजे. या महापुरुषाची व्यवस्था सुरळित चालण्याकरितां संस्थान निर्माण झालेलें असल्यामुळें त्याचेंही महत्त्व तितकेंच. त्यामुळें संस्थान हेंच एक साध्य मानलें पाहिजे. या उलट दुसऱ्या प्रवाहाच्या मतें संस्थान ही एक इतर संस्थांसारखीच संस्था असून तिचें काय व्यवस्थित चाललें आहे तोंपर्यंतच तिला मान. याचकरितां कार्य नीट चालेनासें झालें कीं इतर संस्थांप्रमाणें तिचेंही उच्चाटण करावयाचा प्रत्येकाला अधिकार आहे. यामुळें सामाजिक समृद्धीचें संस्थान हें एक साधन असून साध्य नव्हे. त्याचें कार्य व्यापक आहे व महत्त्वाचें पण आहे. पण त्यावरून त्यास साध्य असें मानण्याचें कारण नाहीं.

" अधिकस्याधिकं फलम् " हा श्लोक जर निराळया अर्थानें वापरला तर त्याचा अर्थ अधिकांत अधिक माणसांचें अधिकांत अधिक हित असा होईल. या उपपत्तीप्रमाणें संस्थानाचा हेतु या अर्थानें " अधिकस्याधिकं फलम् " होय. माणसावर प्रभाव गाजविणाऱ्या दोनच वर्चस्वी भावना असतात, हर्ष व क्लेश. क्लेशावरील हर्षाचा अवशेष म्हणजेच सुख व हें सुख जास्तींत जास्त मिळविणें हाच संस्थानाचा हेतु. हें सर्व ध्येय ठीक आहे. पण सुख व दुःख या व्यक्तिगत आत्मसापेक्ष भावना असून गणितानें त्यांचा हिशेब करतां येण्यासारखा नाहीं. यामुळें अधिकांत अधिक माणसांच्या हिताच्या दृष्टीनें प्रयत्न केला तरी अधिकांत अधिक लोक सुखी झाले, असा हिशेब करतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येकाच्या सुखाच्या कल्पना वेगवेगळ्या असतात. या सर्व कल्पना अतिचंचलही असतात. त्यामुळें त्या सर्वांचें साकल्यानें ज्ञान होणें शक्य नाहीं.

ही टीका कितीही सत्य असली तरी या उपपत्तींतही कांहीं सत्यांश आहे व त्याचमुळें आजही थोड्याफार फरकानें ही उपपत्तिच मान्य केली जाते. "जनसंमर्दाला अधिकांत अधिक सामाजिक हिताचा लाभ घडविणारी संघटना म्हणजे संस्थान. प्रत्येक व्यक्तीला आपल्या गुणांचा अधिकांत अधिक उपयोग करून घेतां यावा म्हणून संस्थानाचें पाठबळ हवें असतें. तें देण्याकरितां संस्थान पाहिजे. हें पाठबळ जनतेला " अधिकार " दिल्यानेंच मिळतें. समाजांतील कांहीं विशिष्ट व्यवस्थेमुळेंच माणसाला आपल्या योग्यतेचा कमाल उपयोग करितां येतो व ही व्यवस्था म्हणजेच अधिकार होत. हे अधिकार देशकालपरिस्थितीप्रमाणें बदलत जातात. " लास्की. सामाजिक व वैय्यक्तिक हिताचा समन्वय करणें हें संस्थानाचें मुख्य कार्य होय.

" सामाजिक कराराची " उपपत्ति जरी चुकीची मानली तरी संस्थान ही एकादी दैवी व्यवस्था आहे किंवा तें एक साध्यच आहे असें मानण्याचेंही कारण नाहीं. समाजधारणेकरितां व समाजोन्नतीकरितां संस्थान अपरिहार्य आहे, ही गोष्ट जरी खरी असली तरी एक विशिष्ट व व्यापक कार्यक्षेत्र असलेली ती एक संस्थाच आहे. तें एक अतिमहत्त्वाचें साधन आहे व त्याचें महत्त्व कमी लेखून समाजानें त्याचा अवमान केल्यास अराजक

माजून सर्व समाजव्यवस्थाच धोक्यांत येते व संस्थानाचें " संस्थानत्व " नाहींसें होतें. यामुळें संस्थान व समाज हीं अत्यंत परस्परावलंबी आहेत. त्यामुळें साहाजिकच संस्थानाचें विलक्षण महत्त्व असतें व त्याच्या हातीं सार्वभौम अधिकार देणें अपरिहार्यच असतें. इतकें असूनही तें एक साधन असून साध्य नव्हे ही गोष्ट स्पष्ट आहे. कोणतेंही साधन गंजून निरुपयोगी झालें किंवा कोणत्याही कारणानें भीतिदायक ठरलें तर समाजहिताच्या दृष्टीनें त्याला प्रतिबंध करणें हें इष्टच होय. नेहमींचेंच उदाहरण घ्यावयाचें तर, अग्नि अत्यंत उपयुक्त असला तरी त्यामुळें घर जळूं लागलें तर त्याला कसून प्रतिकार केलाच पाहिजे. त्याचप्रमाणें समाजयोग्य धारणा व समाजोन्नतीकरितां उपयुक्त असें हें साधन जर समाजभक्षक व समाजद्रोही ठरलें तर त्याला कसून विरोध करून मार्गावर आणणें किंवा प्रसंगीं हाणून पाडून नवी संघटना निर्माण करणें हें समाजाचें व व्यक्तीचें कर्तव्य होय. पण या कर्तव्याला सारासार व पूर्ण विचाराच्या कडक मर्यादा घातल्या पाहिजेत. संस्थानाचें एकादें कार्य चुकीचें ठरलें किंवा एकादें धोरण लोकमताविरुद्ध गेले तर संस्थान समाजद्रोही ठरूं शकत नाहीं. उलट बहुश: अंतीं त्याचें धोरण प्राप्त परिस्थितींत योग्यच असण्याचा अधिक संभव आहे. सामान्यत: जनतेला राजनीतीची विशेष माहिती असत नाहीं. त्यामुळें वरपांगी एकादें धोरण चुकीचें आहे असें सामान्य जनांना वाटलें तरी संस्थानांतील राजकारणधुरंधरांना भावी परिस्थितीचा पूर्ण विचार करून धोरण आंखावें लागल्यानें त्याचा प्राप्त काल व त्याचें भावी महत्त्व सामान्य जनांना चटकन् उकलूं शकत नाहीं. राजकारणधुरंधरांची दृष्टि भूत, वर्तमान व भावि काळाचा चटकन् शोध घेऊं शकते व त्यांची दृष्टि त्यांत पटाईत झालेली असते; उलट सामान्य लोकांचा राजकारणाशीं निवडणुकींत मत देण्याइतकाच संबंध असल्यामुळें त्यांना त्यांतील गुंतागुंत व चित्रविचित्र प्रवाह व धोके यांची कल्पना येणें शक्य नाहीं. म्हणून एकाद्या गोष्टीवरून संस्थान समाजद्रोही झालें असा निर्णय घेऊन संस्थानाविरुद्ध बंड उभारणें म्हणजे एक अत्यंत भयानक व हीन कर्तव्यच्युति होय. विशेषत: निव्वळ वैय्याक्तिक द्वेषानें समाजाला फूस लावून व समाजाची दिशाभूल करून विषबीजें पेरणें व अराजक माजविणें

ही वृत्तीच समाजद्रोही व राष्ट्रद्रोही होय. सर्व समाजाचा विचार करतांना कांहीं व्यक्तींवर अन्याय व कांहींवर कृपाही होणारच. त्याकरितां संस्थानाला किंवा शासनसंस्थेला दोष देण्यांत अर्थ नाहीं. प्रत्येक व्यक्तीला सतत संतुष्ट राखणें हें प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही शक्य झालेलें नाहीं. संस्थान ही तर अपूर्ण मानवांची एक अपूर्ण संस्था. कोणतेंही धोरण आंखलें तरी त्यांत कांहीं जणांचा फायदा व कांहीं जणांचा तोटा हा होणारच मद्यपानबंदी केली तर कुटुंबें सुखी होतील; पण मद्यपी व दारूचे व्यापारी कुरकुरणारच. कर बसविला तर सामान्य समाजाचें हित होईल; पण कर देणारे शिव्याशाप देणारच. प्रसंगीं युद्ध करावें लागलें तर संस्थानाचें रक्षण होईल; पण हजारोंना प्राणार्पण करावें लागणारच. सर्वांना संतुष्ट करणें सुतराम् अशक्य होय. याचकरितां व्यक्तीनें व समाजानें संस्थानाविरुद्ध बंड करण्याचा अधिकार पूर्ण विचार करून व संस्थानाच्या समाजद्रोही वृत्तीबद्दल संपूर्ण खात्रीनंतरच केला पाहिजे. हा अधिकार अत्यंत कठीण व आणिबाणीच्या प्रसंगींच असतो. शिवाय संस्थानाची सत्ता सुसंघटित, बलशाली, व प्रभावी असते, तिचाही विचार करणें जरूर आहे. सुसंघटित व प्रभावी सामर्थ्या-विरुद्ध प्रचंड असंघटित समाजाचा टिकाव लागणें शक्य नाहीं.

## सार्वभौमत्व

आपलें विविध व सर्वव्यापी कार्य करण्याकरितां सामाजांतील सर्व व्यक्ती व संस्था यांवर संपूर्ण शासनाचा अधिकार आवश्यकच होय. संस्थानानें जी गोष्ट अमान्य केली आहे ती गोष्ट कुणालाच करतां येणार नाही. या ‘अमान्य’ गोष्टी अर्थातच समाजाच्या हिताकरितांच अमान्य किंवा प्रतिबद्ध असतात. समाजाच्या देशकालपरिस्थितीस अनुलक्षून सार्वजनिक हिताकरितां कांहीं गोष्टी अवश्य करणें भाग असतें व इतर कांहीं करणें घातक असतं. अवश्य गोष्टी करण्याकरितां व घातक गोष्टी टाळण्याकरितां संस्थानानें कांहीं नियम केलेले असतात. या नियमांनाच “आदेश” किंवा कायदा असें म्हणतात. अशा आदेशानुसारच संस्थानाचा किंवा शासनसंस्थेचा कारभार चाललेला असतो. त्याविरुद्ध वागणारा किंवा त्यांचें उल्लंघन करणारा शिक्षेस पात्र होतो. संस्थानाच्यामागें समाजाची सर्व शक्ति

एकवटलेली असते. त्यामुळें कोणत्याही बंडखोर वृत्तीला शिक्षेनें आळा घालण्याचें व आदेशाला मान देण्यास भाग पाडण्याचें सामर्थ्य संस्थानांत असतें. याप्रमाणें राष्ट्रांतर्गत समाजांतील व्यक्ती व संस्था यांवर संस्थानाचा प्रभावी अधिकार अप्रतिहत व अनिरुद्ध चालतो. त्यावर कोणत्याही व्यक्तीचा किंवा संस्थेचा अधिकार चालत नाहीं. त्याचप्रमाणें राष्ट्राबाहेरील कोणी व्यक्ति, संस्था किंवा शक्तिही त्यावर अधिकार गाजवूं शकत नाहीं. आज हिंदुस्थानाला 'अमूक कर' किंवा 'अमूक करूं नको' असें सांगणारी कोणतीही बाह्यशक्ति नाहीं. पण याबरोबर हेंही खरें कीं संस्थानाचा राष्ट्रांतर्गत अधिकार जसा दुहेरी असतो तसा तो बाह्यदेशावर नसतो. राष्ट्रांत संस्थान सर्वांवर अधिकार गाजवितें; पण त्यावर कोणीही अधिकार गाजवूं शकत नाहीं. पण संस्थानाबाहेर मात्र संस्थान कोणावरही अधिकार गाजवूं शकत नाहीं व स्वतःवरही कुणाचा अधिकार चालूं देत नाहीं. प्रत्येक संस्थान हें स्वतंत्र असल्यामुळें सर्वांचा दर्जा सारखाच असतो. संस्थानाची ही जी ( आपल्या क्षेत्रमर्यादेंत दुहेरी व क्षेत्राबाहेर एकेरी ) "कर्तुमकर्तुम्" शक्ति असते तिलाच सार्वभौमत्व असें म्हणतात.

संस्थानाच्या या "कर्तुमकर्तुम्" शक्तीला मर्यादा कोणत्या, याविषयींदेखील तज्ज्ञांत मतभेद आहे. कांहीं राज्यशास्त्रज्ञांच्या मतें ही शक्ति अनिर्बंध व अमर्याद आहे. ज्या शक्तीला बंधनें व मर्यादा आहेत ती शक्ति सार्वभौम होऊंच शकत नाहीं. या मर्यादा व हीं बंधनें अर्थातच अधिक बलवान आहेत असा अर्थ झाला व सार्वभौमत्व त्यांच्याकडे गेलें. म्हणूनच अशा मर्यादित व नियंत्रित शक्तीला सार्वभौम असें म्हणावयाचें म्हणजे "वदतोव्याघात" च होय. जर संस्थानाची शक्ति सार्वभौम मानावयाची तर तिला कोणतीही बंधनें वा मर्यादा असणें शक्य नाहीं, व अशी अनिर्बंध व अमर्याद शक्ति हातीं असेल तरच संस्थानाची आज्ञा उल्लंघिली जाणार नाही. असें नसेल तर मात्र ही आज्ञा पदोपदीं अवमानिली जाईल व 'संस्थान' याला कांहीं अर्थच रहाणार नाहीं. संस्थानाचें अस्तित्वच मुळीं या सार्वभौम शक्तीवर आधारलेलें आहे. देशांतील सर्व संस्थांवर व व्यक्तींवर अमर्याद व अनिर्बंध सत्ता गाजवूं शकतें तेंच संस्थान. त्याचप्रमाणें ही सत्ता विभागतांही येणार नाहीं. ही शक्ति जर विभागिली गेली तर दोन किंवा अधिक समबलसत्ता

एकाच संस्थानांत निर्माण झाल्या असें होईल. पण हें सार्वभौमत्वाशीं विसंगत होईल. त्याचमुळें संस्थानांतील दुसरी कोणतीही सत्ता दुय्यम व गौण होय. एकंदरींत सार्वभौमत्व हें अनिर्बंध, अमर्याद व आवियुज्य असलेंच पाहिजे. " ज्या समाजांत एकाद्या सुनिश्चित व वरिष्ठ मानवी शक्तीला नित्य मान मिळत असतो पण इतर कोणत्याही समान वरिष्ठाला मान द्यावा लागत नाहीं, अशी शक्ति सार्वभौम असते व असा समाज ( त्या शक्तिसहित ) राजकीय आणि स्वतंत्र असतो " ( ऑस्टिन ).

पण संस्थान हें एक समाजहिताकरितां अत्युपयुक्त साधन आहे असें आपण मानलें, तर वरील विचारमालिका विसंगत वाटूं लागते. साध्यास अनुलक्षूनच साधनाचें महत्त्व मापलें पाहिजे. समाजांत बऱ्याच वेळां याच्या उलट प्रकार आढळून येतो. साध्याहून साधनाला अधिक महत्त्व दिल्याची उदाहरणें व्यवहारांत पदोपदीं आढळतात. सर्वांच्या परिचयाचें उदाहरण म्हणजे संपत्ति. पैसा हें एक सुख मिळविण्याचें प्रमुख साधन असलें तरी, जन्मभर कष्ट करून, सुखाचा स्वादही न घेतां गडगंज संपत्ति बेवारशी टाकून मरणारे कृपण लोक कित्येक आढळतात. त्याचप्रमाणें समाजसुखाचा होम झाला तरी बेहत्तर; पण संस्थानाचा अवमान होतां कामा नये, असें प्रतिपादन करणें ही एक दिशाभूलच म्हटली पाहिजे. एका व्यक्तीच्या केवळ कांहीं विचित्र कल्पनांमुळें किंवा धर्मवेडामुळें किंवा इतर कांहीं वेडामुळें सर्व राष्ट्राची दिशाभूल करून समाजाला दुःखाच्या खाईत लोटणारांचीं उदाहरणें इतिहासांत बरींच मिळतात. संस्थानाच्या सामर्थ्याचा अगदी उलटा उपयोग करून घेऊन समाजावर अन्याय करणारे पुष्कळच राजे व पुढारी इतिहासांत होऊन गेले व आजही आहेत. यामुळें या विचार-सरणींत नुसते दोषच नव्हे तर धोकेही आहेत. समाजाचें किंवा संस्थानाचें चिरन्तनत्व व व्यक्तीची क्षणभंगुरता सामान्य जनतेच्या मनावर वारंवार ठसवून संस्थान हेंच एक साध्य, असें जनतेला भासवणें व या तिच्या अंध-श्रद्धेचा फायदा घेऊन आपलें सामर्थ्य वाढविणें ही एक जनतेची पिळणूकच होय. हा प्रकार बऱ्याच जुलमी राजांनीं व पुढाऱ्यांनीं इतिहासाला दाखवून दिला आहे. इटालींतील मुसोलिनीचा " फासिवाद " व जर्मनींतील हिटलरचा " नाझिवाद " हे याच प्रकारांत येतात. अशा प्रकारचे सर्व

" वाद " तर्कदुष्ट विवादावर आधारलेले असतात. " इटली राष्ट्राची संघटना ही एकेका व्यक्तीहून किंवा व्यक्तिसमूहाहून अधिक ध्येयशील, अधिक चिरंजीव, अधिक साधनांनीं युक्त व बलशाली अशी आहे," तसेंच, "समाज हा अविनाशी आहे. त्याचें आयुष्य त्याच्या नश्वर घटकांच्या म्हणजे व्यक्तींच्या आयुष्याहून प्रदीर्घ असतें. हे घटक जन्मास येतात, वाढतात, नष्ट होतात व त्यांच्या जागीं इतर घटक येतात. पण समाजाचें अभिन्न स्वरूप, त्याच्या कल्पना व भावना यांच्या परंपरा तशाच राहतात. प्रत्येक पिढी या परंपरा आपल्या पूर्वजाकडून घेऊन वंशजास देते."

या उलट " संस्थान हें एक समाजहिताचें अत्युपयुक्त साधन आहे " असें लोकसत्तावाद मानतो. व या विधानांत ' समाजहित ' व ' साधन ' या शब्दांवर जोर असतो. जनतेचें हित व शासनसंस्था हीं जनतेनें ठरविलीं पाहिजेत व त्या आदेशानुरोधाने संस्थानानें ( म्हणजे संस्थानाची प्रतिनिधि जी शासनसंस्था तिनें ) जनतेची इच्छा अमलांत आणिली पाहिजे. शासनसंस्था निवडणें, तिचे अधिकार व कार्यक्षेत्र ठरविणें, ही कार्यें जनतेचींच होत. अर्थातच संस्थानाचे अधिकार मर्यादित झाले व सार्वभौमत्व मर्यादित व नियंत्रित झालें, व जनतेची शक्ति अधिक प्रभावी ठरली. मग या मर्यादित शक्तीला सार्वभौम शक्ति असें नांव देतां येणें शक्य नाहीं. जनतेची शक्ति जर याप्रमाणें संस्थानावरही ताबा ठेवूं शकते, तर मग तीच सार्वभौम असें मानलें पाहिजे. याचकरितां लोकसत्तावादांत सार्वभौमत्वाचे दोन विभाग मानले जातात. पहिला शासक सार्वभौम व दुसरा राजकीय सार्वभौम. ज्या व्यक्तीला किंवा व्यक्तिसमूहाला शासनविधानाचा अधिकार असतो, तो शासक सार्वभौम व ज्या लोकमतानुरोधानें या सार्वभौमाला राज्य करावें लागतें तो राजकीय सार्वभौम.

या विचारान्वयें सार्वभौमाचें अविभाज्यत्व नाहीसें झालें. कांहीं राज्यशास्त्रज्ञांच्या मतें तर सार्वभौम दोनच नसून अनेक आहेत. संस्थान ही एक इतर संस्थांसारखी संस्थाच होय. संस्थानांचेंही ( इतर संस्थांप्रमाणें ) विवाक्षित कार्यक्षेत्र असतें. या दृष्टीनें पाहिल्यास इतर संस्थादेखील आपल्या विशिष्ट कार्यकक्षेंत सार्वभौमच मानल्या पाहिजेत. समाजहिताकरितां या संस्थांचें

अस्तित्व संस्थानाच्या अस्तित्वाइतकेंच अपरिहार्य होय. समाजाचें कार्य संस्थानाप्रमाणेंच इतर संस्थांतूनही होत असतें. अशा प्रकारें समाजाचें कार्य या सर्व संस्थांतून विभागलें गेलें आहे. म्हणूनच एक संस्था सार्वभौम व इतर संस्था गौण असें ठरवितां येणार नाहीं. समाजाचें सार्वभौमत्व या सर्व संस्थांतून वांटलें गेलें आहे. याचकरितां समाजांत एकच सार्वभौम नसून अनेक सार्वभौम आहेत. प्रत्येक संस्था आपापल्या क्षेत्रांत सार्वभौमच असते. या राज्यशास्त्रज्ञांना अनेकतावादी असें म्हणतात.

संस्थानाचें सार्वभौमत्व हें पुढीलप्रमाणें नियंत्रित असतें: १. प्रत्येक समाजांत अशीं कांहीं तत्त्वें किंवा प्रघात असतात कीं ज्यांच्याविरुद्ध संस्थान जाऊंच शकत नाहीं; २. मागील परिच्छेदांत उल्लेखिलेले शासक व राजकीय सार्वभौम व इतर संस्थांचे अधिकार; ३. समाजांतील संस्थांचा व चालीरीतींचा प्रभाव इतका जोरकस असतो कीं रणजितसिंगासारख्या अनिरुद्ध राजालादेखील त्यांच्याविरुद्ध पाऊल टाकण्याचें धैर्य होत नाही. यामुळें तत्त्वत: संस्थानाचें सार्वभौमत्व कितीही अमर्याद म्हटलें तरी तसें व्यवहारांत दिसून येत नाहीं.

## शासनसंस्था

एवंगुणविशिष्ट संस्थानाचीं सर्व कार्यें एका विवक्षित संघटनेच्या द्वारें होत असतात. या संघटनेच्या हातीं संस्थानाची सर्व राजकीय सत्ता एकवटलेली असते व तिलाच शासनसंस्था ( Government ) असें म्हणतात. संस्थानाच्या या राजकीय सत्तेचे सामान्यत: तीन विभाग पाडतां येतात: १. आदेशी; २. विधायक; ३ निर्णायक.

## संस्थानांचें वर्गीकरण

संस्थानाची सर्व सत्ता एका माणसाच्या हातीं केंद्रित झाली असेल तर त्या संस्थानाला एकतंत्री असे म्हणतात. सत्ता एकाद्या विशिष्ट वर्गाच्या हातीं असेल तर वर्गतंत्री व सत्ता बहुजनसमाजाच्या हातीं असेल तर लोकतंत्री म्हणतात. राजतंत्री सत्ता अनियंत्रित असूं शकेल किंवा नियंत्रितही असूं शकेल. त्याचप्रमाणें कांहीं देशांतील सत्ता राजाऐवजीं एकाद्या

पुढाऱ्याच्या हातीं केंद्रित झाल्यास त्या प्रकारास हुकूमशाही राज्यकारभार असें म्हणतात. संस्थानाची सत्ता ही शासनसंस्थेंतून चालविली जाते. त्यामुळें हे वर्ग म्हणजे प्राय: शासनसंस्थेचेच प्रकार असें म्हणावयास हरकत नाहीं.

लोकतंत्री शासनसंस्थांनीं वेगवेगळ्या देशांत वेगवेगळीं स्वरूपें धारण केलेलीं आहेत. त्यांपैकीं दोन प्रकार विशेष महत्त्वाचे आहेत. पहिल्या प्रकारास प्रधानप्रमुख व दुसऱ्या प्रकारास अध्यक्षप्रमुख असें नांव आहे. त्याचप्रमाणें शासनसंस्थांचे आणखी दोन प्रकारें विभाग पाडतां येतात: पहिला एककेंद्री व दुसरा संयुक्त. यावरून सामान्यत: खाली दिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल.




### एकतंत्री सत्ता

संस्थानांतील तीनही प्रकारची सत्ता जर एकाच व्यक्तीच्या हातीं सोपविलेली असेल तर तिला एकतंत्री सत्ता असें म्हणतात. ही सत्ता दोन प्रकारें केंद्रित होऊं शकते. एक वंशपरंपरा राजाच्या हातीं व दुसरी स्वपरा-

क्रमानें किंवा बुद्धीनें सर्व सत्ता बळकावणाऱ्या पुढाऱ्याच्या हातीं. पहिल्या प्रकाराला राजतंत्री व दुसऱ्याला हुकूमशाही असें म्हणतात.

## राजतंत्र

ह्या शासनसस्थेचा फार जुना प्रकार होय. प्राचीन काळीं राजाच्या हातीं अनियंत्रित व अमर्याद सत्ता असे. सेनापति तोच, न्यायाधीश तोच, शासन करणारा तोच व शासनाची अंमलबजावणी करणाराही तोच. अशा प्रकारें शासनादेशी, विधायक व निर्णायक सत्ता त्याच्याच हातीं असे. हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून ही पद्धति चालत आली आहे. राजा हा दैवी अंश मानला जात असे व त्याचा शब्द अवमानण्याची कोणाचीही प्राज्ञा नसे. त्याची सत्ता खरोखरीच सार्वभौम असे. इतकें असूनही प्राचीन परंपरा व चालीरिती यांना अनुसरूनच त्याला राज्यकारभार करावा लागे. राज्यकारभाराकरितां प्रचारांची एक नियमावलीच असे व त्याप्रमाणें कारभार हांकला जाई. कांहीं राजे या सर्व नियमांना झुगारून हवा तसा अन्याय करीत. पण या नियमान्वयें राज्य करणारांचीच संख्या अधिक आढळते. राजाच्या कर्तव्यतत्परतेविषयीं फार लहानपणापासून शिक्षण मिळत असे. प्राचीन वेदकाळीं पुष्कळ राजे निवडले जात व जनतेच्या कांहीं संघटना त्याला मदत करीत असत. यांपैकीं ‘ सभा ’ व ‘ समिति ’ या दोन प्रमुख संघटना होत. इतर खंडांतही राजसत्ता फार प्राचीन काळापासून आढळते. युरोपांत १७ व्या शतकापर्यंत अशी अमर्याद सत्ता असे. पण या सत्तेविरुद्ध प्रायः तेराव्या शतकापासूनच प्रारंभ झाला असें म्हणावयास हरकत नाही. इ. स. १२१५ सालीं जॉन राजाविरुद्ध इंग्लंडांतील सरदारांनीं मोहीम उभारून त्याच्या सत्तेस नियंत्रण घातलें. अशा प्रकारें प्रथमतः हें नियंत्रण सरदार-सरंजामदारांकडून सुरू झालें. कालन्तरानें हा लढा युरोपखंडभर पसरला व सत्ता वरच्या वर्गाकडून खालच्या वर्गाकडे येऊं लागली. १९ व्या शतकाच्या अंतापर्यंत हा लढा बहुतेक प्रमुख देशांत प्रजेनें जिंकला व राजसत्ता अगदीं नियंत्रित झाली. कांहीं देशांतून राजांचें उच्चाटनच करण्यांत आलें, तर कांहींत ते निव्वळ नामधारी बनले. हिंदुस्थानांत ही सत्ता कांहीं वर्षांपूर्वीं-पर्यंत अनियंत्रित चालत असे. पण सामान्य स्वातंत्र्यसंपादनाच्या चळवळी-

बरोबर हिंदुस्थानांतील तथाकथित राजे लोकांच्या प्रजेनेंही चळवळ करून बरेच अधिकार मिळविले. कांही संस्थानें अद्याप हट्टानें तग धरून आहेत. पण ' १५ ऑगस्ट ' नंतर पुष्कळच संस्थानिकांना कालाचा ओघ व तडाखा समजून आला व प्रजेच्या हातीं भराभर सत्ता येऊं लागली. त्रावणकोर, म्हैसूर, काश्मीर, इंदूर, इत्यादि संस्थानांच्या दिशाभूल झालेल्या राजेलोकांना थप्पड मिळतांच शुद्धि आली.

राजतंत्रांत कांहीं गुण आहेतच. राजाचें सामर्थ्य प्रचंड असल्यानें तो प्रजेचें कल्पनातीत कल्याण करू शकतो. राज्यांतील सर्व शक्ति एकवटलेली असल्यानें कार्यें भराभर होतात. त्यामुळें देशाची भरभराट होण्यास वेळ लागत नाहीं. राजा जर उदारमतवादी, प्रगतिप्रिय व प्रजाहितदक्ष असेल तर हा प्रकार सर्वांत उत्तम म्हणावा लागेल. इतिहासांतील अशोक, गुप्तराजे, इत्यादि सम्राटांचें कार्य अचाट होतें असेंच आढळून येतें. त्यांनीं थोडक्याच वर्षांत आसेतुहिमाचल प्रगति करून दाखविली. पण याबरोबर दोषही तितकेच किंवा अधिकच असतात असें म्हणावयास हरकत नाहीं. एखादा राजा चांगला निघाला तरी त्याचा मुलगा चांगला निघेलच असें नाहीं. त्यामुळें प्रजेचें भवितव्य नेहमीं संशयांतच रहाणार व वाईट राजाच्या हातीं अशी अनियंत्रित सत्ता असेल तर प्रजेचे हाल पहावयासच नकोत. अशीं उदाहरणें इतिहासांत कांहीं कमी नाहींत.

## हुकूमशाही

हा प्रकार प्रामुख्यानें पुढें आला तो पहिल्या महायुद्धानंतरच्या धामधुमींत. त्यापूर्वींदेखील हुकूमशाही नव्हती असें नाहीं. नेपोलियननें स्वतःला सम्राट् असें घोषित करण्यापूर्वी तो एक हुकूमशहाच होता. पण पहिल्या महायुद्धानंतर इटाली व जर्मनी या राष्ट्रांनीं जशी पद्धतशीर हुकूमशाही सुरू केली त्याला इतिहासांत तोड नाही. हे हुकूमशहा अगदीं लोकशाही पद्धतीप्रमाणें व लोकशाही घटनेनुसार निवडून आलेले होते. पण आपल्या संघटनेच्या बळावर व लोकांच्या भावना चिथवून निरनिराळीं तत्त्वें प्रचारांत आणिलीं व लोकांची दिशाभूल करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतलीं. प्रचंड गुप्त पोलीस संघटना व सैन्य तयार करून प्रथमतः

लोकमताची मुस्कटदाबी करून लोकतंत्राला आळा घातला. कोणत्याही चांगल्या तत्त्वाचा वाईट व स्वार्थासाठीं उपयोग करून घेतां येतो. राष्ट्राभिमान, वंशाभिमान, शक्तिपूजा, या भावना मर्यादित असेपर्यंत वंदनीयच असतात. स्वराष्ट्राचा दुरभिमान व परराष्ट्राचा द्वेष, स्ववंशाचा अभिमान व परवंशाचा द्वेष व शक्तीचा दुरुपयोग या गोष्टी शेजारीं शेजारींच असतात.

कोणत्याही संस्थानाचा अंतिम आधार म्हणजे सामर्थ्यच होय, हे कुणासही नाकबूल करतां येणार नाहीं. लोकतंत्राच्या कितीही गप्पा मारल्या तरी राष्ट्र समर्थ असतें तोंपर्यंतच ही भाषा. राष्ट्र असमर्थ होतांक्षणींच अंतः-शत्रू व बाह्यशत्रू दोघेही गिधाडासारखी झेंप टाकूं पाहतात. म्हणूनच प्रत्येक राष्ट्रानें आपलें सामर्थ्य कसणें हें त्याचें आद्य कर्तव्यच होय. बलवान राष्ट्रच जगांतील धकाधकीच्या मामल्यांत तग धरूं शकेल. नाहीं तर " जीवो जीवस्य जीवनम् " या न्यायानें दुर्बल राष्ट्राचा नाश ठरलेलाच.

हें त्रिकालाबाधित तत्त्व अक्षरशः मान्य करून असें म्हणावें लागेल की, कोणत्याही राष्ट्रानें आपलें बळ वाढवावयाचे तें निव्वळ आपल्या संरक्षणा-करितांच होय. इतर राष्ट्रांचे स्वातंत्र्य अपहरण करणें म्हणजे या तत्त्वाचा दुरुपयोगच म्हटला पाहिजे. कोणत्याही राष्ट्राला दुसऱ्यावर कुरघोडी करण्याचा तत्त्वतः अधिकार मुळींच नाही. " आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तु-मनागसि " हें प्रत्येक राष्ट्रानें जाणून असें वर्तन ठेवल्यास शक्तिपूजेचें सार्थक झालें असेंच म्हणावें लागेल. पण या हुकूमशहांनीं या तत्त्वाचें उल्लंघन करून राष्ट्रांतील सामान्य अज्ञ जनतेला चिथविलें व स्वराष्ट्रा-भिमानाबरोबरच परराष्ट्रद्वेष, वंशाभिमानाबरोबरच परवंशद्वेष, शक्ति-पूजेऐवजीं शक्तित्वेष उत्पन्न केला व स्वराष्ट्रसंरक्षणाऐवजीं परराष्ट्रविजिगीषा उत्पन्न केली. या तत्त्वच्युतीचा व हीन महत्त्वाकांक्षेचा परिणाम आज या राष्ट्रांना व इतर राष्ट्रांनाही भोगावा लागत आहे.

राष्ट्रांतील एका व्यक्तीनें किंवा समूहानें इतर सर्व व्यक्तींना किंवा पक्षांना दडपून टाकून सर्व सत्ता आपल्या हातीं घेणें, जनतेस आपल्या विशिष्ट विचार-सरणीचें शिक्षण देणें, विचार-स्वातंत्र्य किंवा कसलेंही स्वातंत्र्य अमान्य करणें,

राष्ट्रांतील सर्व सामाजिक, आर्थिक, नैतिक व राजकीय हालचालींवर कसून पाळत ठेवणें, सर्व ठिकाणीं गुप्त हेर ठेवून बातम्या व विरोधकांस उपटून टाकणें, राष्ट्रांतील बरीचशी शक्ति आपली संघटना, सैन्य व शस्त्रास्त्रें जय्यत ठेवण्याकरितां खर्च करणें, हीं सर्व हुकूमशाहीचीं लक्षणें होत. या दृष्टीनें पाहतां राशियांतदेखील हुकूमशाहीच आहे असें तज्ज्ञांचें मत आहे. हुकूमशाहींत सर्वच दोष असतात व लोकशाहींत सर्वच गुण असतात असें मानण्याचें कारण नाहीं. हुकूमशाहींत कांहीं गुण अशा प्रकर्षानें आढळतात कीं तसे इतर कोणत्याही प्रकारांत आढळत नाहींत. दलित व अवनत राष्ट्राची संघटना करून राष्ट्राला उन्नत करण्याचें काम या प्रकारानें चटकन होऊं शकतें. राष्ट्राची सर्व शक्ति एकवटून इष्ट कार्यांत उपयोजिण्यासाठीं लोकतंत्रांत अत्यंत प्रयास पडतात; पण हुकूमशाही हें काम तात्काळ करून दाखविते. त्याचप्रमाणें युद्धकाळीं सर्व राष्ट्राचे श्रम त्यावर केंद्रित करण्याच्या कामीं लोकतंत्रांत अवघड असतें. विविध पक्षोपपक्षांतील व मतांमतांतील भेद मिटवून इष्ट कार्यास योग्य दिशा देणें फार त्रासदायक असतें; पण हुकूमशाहींत मूलतःच पक्षोपपक्षांचा नायनाट करण्यांत आलेला असल्यामुळें, सर्व सामर्थ्य एककेंद्री, एकतंत्री व एकीभूत असल्यामुळें त्याकरितां निराळा प्रयास करण्याचें कारण पडत नाहीं, राष्ट्राच्या शक्तीला हवें तें वळण देतां येतें. याचमुळें पहिल्या महायुद्धानंतर जर्मनी देश जरी पूर्ण नेस्तनाबूद झाला होता तरी १९३३ नंतर पूर्ववत् झाला. त्याच वेळीं अंतर्गत क्रान्तीमुळें राशियाची परिस्थिति अत्यंत हलाखीची झाली होती; पण स्टालिननें १९२७ ते १९३७ पर्यंतच्या दहा वर्षांच्या काळांत तें एक पहिल्या प्रतीचें राष्ट्र बनविलें.

## एककेंद्रित व संयुक्त शासन

कांहीं संस्थानांची सत्ता एकाच शासनकेंद्रांत समाविष्ट झालेली असते, तर इतरांत ही सत्ता केंद्रवर्ती व प्रांतीय शासनसंस्थांत विभागलेली असते. पहिल्या प्रकारास एककेंद्री व दुसऱ्यास संयुक्त संस्थान असें म्हणतात.

## एककेंद्री शासन

अशा शासनांत सर्व सत्ता एकाच संघटनेच्या हातीं असल्यामुळें राष्ट्रांतील

इतर सर्व संघटना व संस्था या दुय्यम असतात. प्रांतांतील अधिकाऱ्यांचा अधिकार केंद्रशासनापासूनच मिळतो व ते त्याच संघटनेस जबाबदार असतात. सर्व स्थानिक शासनांना केंद्रांतूनच अधिकार मिळतो. हे अधिकार केंद्रसत्ता केव्हांही काढून घेऊं शकते. अशा संस्थानांचें शासन अधिक सुसंघटित व जोरदार असतें. केंद्रशासनांतूनच सर्व आदेश व आज्ञा पाठविल्या जातात व या सर्वक्षेत्रव्यापी असतात.

## संयुक्त संस्थान

या प्रकारांत कित्येक संस्थानांचा असा पूर्णतया संयोग करण्यांत येतो कीं, त्यांमधील प्रत्येक संस्थानाचें बाह्य सार्वभौमत्व नाहींसें होतें; पण अंतर्गत शासनाचें स्वातंत्र्य अभंग रहातें, व केंद्रवर्ती सत्ता सर्व बाह्य कारभारांत सार्वभौम असून कांहीं अंतर्गत विषयांतही वरिष्ठ रहाते. केंद्रवर्ती शासन-संस्थेचे सर्व आदेश प्रत्येक संस्थान पार पाडतें.

डायसीनें अशा संयोगाची व्याख्या पुढीलप्रमाणें केली आहे: “ संयोग ही, राष्ट्रीय ऐक्य आणि सामर्थ्य यांचा संस्थानाधिकारांच्या अबाधितपणाशीं समन्वय करण्याकरितां केलेली राजकीय रचनाच होय. ” म्हणजे प्रत्येक संस्थानाचे अंतर्गत अधिकार तर अबाधित राहिले पाहिजेत; पण सर्व राष्ट्रीय ऐक्य व सामर्थ्य यांचाही लाभ हवा असेल, तर अशा संस्थानांचा संयोग करतां येतो.

कांहीं देशांत भौगोलिक व ऐतिहासिक ऐक्य असूनही निरनिराळीं संस्थानें व प्रान्त असतात व प्रत्येक प्रान्ताचें वैशिष्टय इतरांहून निराळें असतें. संस्कृति, भाषा, संस्था, चालीरीती किंवा परंपरा यांच्या भेदामुळें प्रत्येक प्रांत एका दृष्टीनें इतरांहून भिन्न असल्यामुळें सर्वांचा एकजीव होण्याची शक्यता नसते. पण अशाही विषमरंगी देशांत एक विशिष्ट प्रकारची व्यापक, समान संस्कृति व समान आचारविचार असूं शकतात. आपल्या देशाचें उदाहरणदेखील याच प्रकारचें आहे. प्रत्येक प्रांताचें वैय्यक्तिक वैशिष्टय असूनही सर्व प्रांतांची मिळून एक समान संस्कृति, समान आचारविचार, समान परंपरा व संस्था, व समान चालीरीती आढळून येतात. महाराष्ट्र प्रांत कर्नाटक प्रांताहून आचारविचारानें, भाषेनें, चालीरीतींनीं

कितीही वेगळा वाटला तरी व्यापक दृष्टीनें पाहतांच दोहोंतील समान धर्म, समान जातिभेद, समान परंपरा व चालीरीती हीं दिसून येतील. प्रत्येक चालीरीतीच्या तपशीलांत भेद असेल; पण त्या एकाच तत्त्वावर आधारलेल्या आढळतील. हा प्रकार म्हणजे अद्वैतांतील द्वैत असेंच म्हटलें पाहिजे. अशा सर्व प्रांतांना एकत्र आणून त्यांचें जर एकच मध्यवर्ती संस्थान बनविलें तर प्रत्येकाचे वैय्यक्तिक प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटणें शक्य नाहीं. प्रत्येक प्रांतावर एकाच प्रकारचे कायदे व एकाच प्रकारचें शासनही उपयुक्त न ठरतां विनाशकच ठरतील. याकरितां प्रत्येक प्रांताचा अंतर्गत व्यवहार तेथील परिस्थितीला अनुकूल असा पाहिजे. योग्य प्रकारच्या आदेशांनी प्रत्येक प्रांतांतील विशिष्ट संस्था, परंपरा व चालीरीती, यांचें पोषण व संवर्धन होणें अवश्य आहे. म्हणून प्रत्येक प्रांताचा अंतर्गत कारभार त्या त्या प्रांतांतील तज्ज्ञाच्या हातींच सोंपविला पाहिजे. पण याचबरोबर सर्व प्रांतांची सांस्कृतिक, भौगोलिक व ऐतिहासिक निकटता लक्ष्यांत घेऊन त्यांच्या एकीमुळें सर्वांचे समान प्रश्न अधिक समाधानकारक रीतीनें व सौकर्यानें सुटूं शकतील व त्यांच्या संयुक्त सामर्थ्यामुळें त्यांची संघटनाही अधिक बळकट होईल. अशा प्रकारें समान प्रश्न सोडविण्याकरितां स्वातंत्र्य या दोन तत्त्वांवर हीं सर्व निरनिराळीं संस्थानें आपला एक संघ बनवितात व या संघालाच ‘ संयोग ’ असें नांव आहे. इतर कोणत्याही प्रकारांत अशा तऱ्हेची सोय असूं शकत नाही. ज्या देशांत असे सम व विषम प्रश्न असतील त्यांना संयुक्त घटनेनेंच आपले प्रश्न व्यवस्थित रीतीनें सोडवितां येतील.

या विवक्षित पार्श्वभूमीमुळें संयुक्त संस्थानांची रचना निराळी व विशिष्ट प्रकारची असते. हीं वैशिष्ट्यें बहुधा सर्वत्र दिसून येतात. ‘ संयोगघटना ’ तयार होण्यापूर्वीं सर्व संस्थानें स्वतंत्र व सार्वभौम अर्थातच एका दर्जाचीं असतात. सर्व संस्थानें भौगोलिक दृष्ट्या निकटवर्ती असलीं पाहिजेत. सर्वांची सांस्कृतिक पातळी व प्रगति सामान्यत: समान दर्जाची पाहिजेत. निरनिराळ्या खंडांत पसरलेली व कांहीं राजतंत्री तर कांहीं लोकतंत्री, कांहीं प्रगत तर कांहीं रानटी, कांहीं स्वतंत्र तर कांहीं परतंत्र, अशा विषम घटकांचा ‘ संयोग ’ होऊं शकणार नाहीं; व केला तरी तो फारसा

फायदेशीर होणार नाहीं. 'संयोग' ही सामान्यत: प्रथम स्वतंत्र व वेगळीं असलेलीं संस्थानें जोडण्याची क्रिया होय. अमेरिका, जर्मनी, राशिया, इत्यादि देशांत याच प्रकारें संयुक्त संस्थान घडविण्यांत आलें.

प्रत्येक संयुक्त संस्थानांत सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे घटना. घटक-संस्थानांचे व केंद्रसत्तेचे अधिकार व कार्यक्षेत्र निश्चित करण्याकरितां सर्व घटक-संस्थानांनीं एकत्र येऊन प्रथमत: अशी घटना तयार केली पाहिजे. ही घटनाच सार्वभौम मानली जाते, व तींतील तत्त्वांविरुद्ध घटकांना किंवा मध्यवर्ती सत्तेला जातां येत नाहीं, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट होय. घटकांनीं किंवा केंद्रानें जर घटनेचा अवमान केला तर संयोग टिकणें शक्य नाहीं. याकरितां घटनेंतच तशी व्यवस्था करण्यांत येते व हे न्यायालय घटनेचे संरक्षक व ताबेदार असतें. घटकां-घटकांतील विवाद किंवा केंद्र व घटक यांमधील विवादावर निर्णय देण्याचा अधिकार या न्यायालयाला असतो. या सार्वभौम घटनेंत वारंवार बदल करतां येऊं नयेत, याकरितां विशिष्ट व्यवस्था केलेली असते. घटना, तिचे संरक्षक, न्यायालय व तिच्यांत बदल करण्याची विशिष्ट व्यवस्था या तीन प्रमुख तत्त्वांवर संयुक्त संस्थान अस्तित्वांत येतें. घटनेंतील व्यवस्थेनुसार संस्थानांचे अधिकार व कार्यक्षेत्र यांची विभागणी करण्यांत येते व या विभागणीस अनुसरून घटकांचे व केंद्राचे अधिकार व कार्यक्षेत्र निश्चित करण्यांत येतात. सर्व राष्ट्राचे सामान्य प्रश्न हाताळण्याचे अधिकार व कार्यक्षेत्र मध्यवर्ती केंद्राकडे देण्यांत येतात. व प्रांतिक प्रश्नांवरील अधिकार व कार्यक्षेत्र प्रांतिक शासनव्यवस्थेकडे सोंपविण्यांत येतात. आपल्या अधिकारांत व कार्यक्षेत्रांत कोणतेही 'आदेश' करण्याचें कोणतेंही स्वातंत्र्य प्रांतांना व केंद्राला असतें. कांहीं घटना केंद्राचे अधिकार व कार्यक्षेत्र तपशीलवार देऊन इतर सर्व अधिकार प्रांतावर सोंपवितात, कांहींत प्रांताचे अधिकार सविस्तर देऊन इतर अधिकार केंद्रावर सोंपविण्यांत येतात, तर इतर कांहीं घटनांत दोघांचेही अधिकांत अधिक अधिकार विभागून शेषाधिकार प्रांतावर किंवा केंद्रावर सोंपवितात. कांहीं प्रश्नांवर दोघांनाही 'आदेश' पसार करण्याचा अधिकार असतो.

सामान्यत: केंद्राकडे पुढील विषयांवर अधिकार असतो: नाविक, सैनिक व हवाईदलें, परदेशसंबंध, तह, धार्मिक प्रश्न, चलन, नाणीं,

सरकारी कर्ज, टपाल व टेलिफोन, नभोवाणी, बिनतारी संदेश, सरकारी रेल्वे, विमानें आणि विमानवाहतूक, नाविकवाहतूक, दीपगृह, मध्यवर्ती सरकारी नोकऱ्या, मध्यवर्ती निवृत्तिवेतन, परदेशी जाणारे व या देशीं येणारे याकरितां नियम, शस्त्रें, अग्निशस्त्रें, दारुगोळा, स्फोटक द्रव्यें, कॉपीराईट, शोध, पेढ्या, उद्योगवर्धन, श्रमनियंत्रण, विमा, बॅन्का, खानेसुमारी, प्राचीन इमारती, मध्यवर्ती कर.

### संयोगाचे गुण

१. राष्ट्रीय ऐक्य व प्रांतिक स्वातंत्र्य या दोहोंतील फायद्यांचा या संयोगांत उत्तम समन्वय होतो, लोकांना राजकीय कर्तव्याचे शिक्षण मिळतें व त्यांची प्रांतिक कारभारांतील आवड वाढते; २. अधिकारविभाजनामुळें हुकूमशाही निर्माण होण्याची शक्यता नसते; ३. प्रत्येक प्रांतांतील विशिष्ट संस्था व परंपरा टिकविण्याचा हा एकच मार्ग होय. ४. संयोगामुळें प्रांतिक आदेश विधानांत व कारभारांत प्रयोग करतां येतात; पण एककेंद्री शासनांत ही शक्यता नसते.

### दोष

१. सामर्थ्यविभाजनामुळे संयुक्त शासन हें नेहमींच निर्बल असतें. एककेंद्री शासनाप्रमाणें यांत संस्थानाचें सार्वभौमत्व व सामर्थ्य यांचा जोरकस प्रवाह असत नाहीं व घटकांतील अन्योन्य मत्सरामुळें केंद्रशासन निर्बल होतें. अंतर्गत व बाह्य कारभारांत हा शासनप्रकार अशक्त ठरतो; २. संयोग-व्यवस्था ही विकारविमुख असते; ३. विधिमंडळाचें सार्वभौमत्व मध्यवर्ती न्यायालयामुळें नाहींसें होतें व विधायक खात्याचे अधिकार घटनेंत फारच मर्यादित करण्यांत येतात.

### शासनसंस्थेची कार्यपद्धति

सामान्यतः शासनसंस्थेचें कार्यक्षेत्र तीन विभागांत विभागण्यांत येतें. कोणतेंही सरकारी कार्य असलें तरी तें करण्याकरितां संस्थानाचा आदेश हवा लागतो, व हा आदेश किंवा आज्ञा देण्याचा सार्वभौम अधिकार शासनसंस्थेकडे असतो, हें आपण पाहिलें आहेच. शासनसंस्था अशा

आदेशाकरवींच आपलें सर्व काम पार पाडतें. आदेश देण्याचें कार्य अर्थातच फार महत्त्वाचें आहे. व सामान्यतः हल्लीं सर्व संस्थानांत सामान्य आदेश देण्याकरितां एक स्वतंत्र व्यवस्था असते. या व्यवस्थेस ‘ आदेश-विभाग ’ असें म्हणतां येईल. शासनसंस्थेच्या कार्याविषयीं साधक बाधक चर्चा करून आदेश पसार करणें हें या विभागाचें काम. नुसते आदेश पसार करून कार्य होणें शक्य नाहीं. हें कार्य आदेशानुसार पार पाडण्याकरितां कांहीं व्यवस्था पाहिजेच. या व्यवस्थेस ‘ विधान-विभाग ’ असें नांव आहे. या कार्याकरितां शेंकडों अधिकारी व नोकरवर्ग नेमावे लागतात. व या अधिकाऱ्यांना त्यांचें निश्चित कार्यक्षेत्र विभागून देण्यांत आलेलें असतें. या व्यवस्थेनुरूप त्यांना आपलें कार्य करावें लागतें. त्यांना त्या कक्षेच्या बाहेर जातां येत नाहीं. या अधिकाऱ्यांनीं प्रजेच्या हक्कांचें संरक्षण करावयाचें असतें. किंवा असें म्हणतां येईल कीं, प्रजेचे अधिकार रक्षण करण्यासाठीं हे सेवक नेमलेले असतात. या सेवकांनीं आपल्या कर्तव्यांत कसूर केली तर त्याचा विचार करून योग्य निर्णय मिळाला पाहिजे; त्याचप्रमाणें समाजांतील प्रत्येक व्यक्तीचे व संस्थेचे अधिकार इतर व्यक्तींकडून किंवा संस्थेकडून बळकावले जाण्याचा संभव असतो, अशा विवादांचाही विचार होऊन अधिकारांचें योग्य संरक्षण झालें पाहिजे. याकरितां तिसरा विभाग असतो. त्याला ‘ निर्णय-विभाग ’ अथवा ‘ न्याय-विभाग ’ असें म्हणतात.

अशा प्रकारे समाजांतील सहस्रावधी प्रश्नांचा विचार करून जनतेच्या समृद्धिकरितां त्यांच्या अडचणी सोडवितांना शासनसंस्था प्रथमतः निश्चित आदेश पसार करिते, हे सर्व आदेश कृतींत उतरविण्याकरितां विस्तृत सेवकवर्ग नेमून त्यांच्याकडून हें कार्य करविते व समाजांतील विवादांचा साधक बाधक विचार करून त्यावर निर्णय देते. हीच शासनसंस्थेची कार्य-पद्धति होय.

## आदेश-विभाग

नियंत्रित राजतंत्र आणि लोकतंत्र या प्रकारांच्या कारभारांत प्रजा किंवा जनता आपल्या वतीनें राज्यकारभार हांकण्याकरितां आपले प्रतिनिधी निवडून देते. सर्वसामान्य जनतेला राज्यकारभाराची माहिती नसते, शक्यताही नसते

व सवडही नसते. याकरितां आपल्यांतील आपल्या परिचयाचे व विश्वासू, राज्यकारभार हाकूं शकतील असे जाणते लोक जनता निवडते व हे प्रतिनिधी जनतेच्या वतीनें शासनव्यवस्था पहातात. शासनाची सुरुवात आदेशांतून होत असल्यामुळें, हा आदेश-विभागच इतर सर्व क्षेत्रांना आकार देतो व कार्यक्षेत्रावर आदेशांतूनच अधिकार चालवूं शकतो. हा अत्यंत महत्त्वाचा भाग हे निवडलेले प्रतिनिधीच चालवितात. हे सर्व प्रतिनिधी एकत्र येऊन समाजांतील सर्व प्रश्नांची, गरजांची साधक बाधक चर्चा करितात व त्यांवर आदेश पसार करितात. हे आदेश आज्ञारूप असून त्याविरुद्ध कोणीहि जाऊं शकत नाही. विरुद्ध जाणाऱ्याला तात्काळ शिक्षा करण्यांत येते. या प्रतिनिधींच्या मंडळाला ‘ आदेशसभा ’ किंवा ‘विधिमंडळ’ असें नांव आहे.

कांहीं संस्थानांत या सभेचे दोन विभाग असतात. एका विभागांत सर्व-सामान्य जनतेचे प्रतिनिधी असतात व दुसऱ्या विभागांत समाजांतील विशिष्ट वर्गाचे प्रतिनिधी असतात. पहिल्या विभागास जनसभा व दुसऱ्यास वरिष्ठ सभा असें नांव द्यावयास हरकत नाही. बहुतेक संस्थानांत जनसभेचे अधिकार निर्णायक स्वरूपाचे असतात व वरिष्ठ सभेचे अधिकार थोडे फार उपदेशवजाच असतात असें म्हणतां येईल.सांप्रत या सभेचे निर्णायक अधिकार काढून घेण्यांत आले असून तिला एकाद्या चर्चामंडळाचें स्वरूप आलेलें आढळतें. पण आदेश पसार करणें लांबणीवर टाकून प्रस्तुत प्रश्नावर सारासार विचार व गुणदोष-चर्चा होण्यास संपूर्ण सवड मिळवून देण्याचे अत्यंत उपयुक्त कार्य या सभेमुळें होतें व त्याकरितांच पुष्कळ संस्थानांतून ही सभा टिकविली जाते. शिवाय जनसभेंत सुशिक्षित, विद्वान् किंवा श्रीमन्त अशा विशिष्ट वर्गांच्या प्रतिनिधींना स्थान मिळणें कठीण असतें. त्यामुळें अशा वर्गांना प्रतिनिधित्व द्यावयाचें असल्यास ही सभा अत्यंत सोयीस्कर पडते. हे प्रतिनिधी सामान्यत: चालू असलेल्या परिस्थितींत बदल करूं नये या मताचे असतात, तर जनसभेंतील प्रतिनिधी सामान्यत: चालू परिस्थितींत बदल घडविण्याची अपेक्षा करितात. या दोन विरोधी प्रवाहांमुळें एक प्रकारचा संयम व समतोलपणा राहतो.

**विधान-विभाग**

जनसभा व वरिष्ठ सभा यांनीं पसार केलेल्या आदेशानुसार सर्व सार्व-

जनिक म्हणजेच सरकारी कामें पार पाडण्याचें कार्य या विभागाकडे असतें. या विभागाचे दोन प्रमुख प्रकार आहेत. पहिल्यास प्रधानमंडळ-प्रमुख व दुसऱ्यास अध्यक्ष-प्रमुख असें नांव आहे. पहिल्या प्रकारांत विधिमंडळांतील बहुसंख्य पक्षाचा पुढारी आपल्या पक्षांतून निवडून आलेल्या प्रतिनिधींमधून योग्य व तज्ज्ञ माणसें मदतीस घेऊन प्रधानमंडळ बनवितो. या सर्वांना मंत्री असें म्हणतात. या मंत्र्यांकडे शासनांतील वेगवेगळीं खातीं सोपविण्यांत येतात व त्या सर्वांचा कारभार सर्वानुमतें चालतो. शासनाचें कार्य विविध प्रकारचें असल्यामुळे प्रत्येक महत्त्वाच्या खात्यावर एक स्वतंत्र मंत्री नेमण्यांत येतो. उदाहरणार्थ संरक्षण खातें, आर्थिक खातें, गृहव्यवस्था ( अंतर्गत व्यवस्था ), दळणवळण, वगैरे खातीं असतात. देशाचा कारभार व्यापक असल्यामुळें आणखीही कित्येक खातीं पहावीं लागतात. या मंत्रिमंडळावर प्रधानमंत्र्याची सामान्य देखरेख असते व हें सर्व मंडळ विधिमंडळास जबाबदार असतें. जोंपर्यंत विधिमंडळांतील बहुसंख्य प्रतिनिधींचा पाठिंबा असतो तोंपर्यंतच मंत्रिमंडळ अधिकारावर असतें; पण विधिमंडळास जर त्याचें कार्य व धोरण नापसंत वाटलें तर अविश्वासाचा ठराव पास करून त्यास अधिकारावरून काढून टाकण्यांत येतें, व बहुसंख्यांचा पाठिंबा असलेलें दुसरें मंत्रिमंडळ बनविण्यांत येतें. मंत्रिमंडळाची कमाल मुदत सामान्यतः पांच वर्षांपर्यंत असते व पांचव्या वर्षी नवीन निवडणूक होऊन प्रजेच्या ज्या पक्षास अधिक पाठिंबा असेल तो पक्ष अधिकारावर येऊन मंत्रिमंडळ बनवितो. दुसऱ्या प्रकारांत अध्यक्षाची निवडणूक बहुसंख्य पक्षातर्फे होत नसून सर्व जनतेनेंच करावयाची असते व निवडून आलेला प्रतिनिधि आपलें सचिव-मंडळ निवडतो. हें सचिव-मंडळ विधिमंडळास जबाबदार नसून अध्यक्षास जबाबदार असतें व अध्यक्षाच्या मताप्रमाणें कारभार चालू असतो. अध्यक्ष हा विधिमंडळाला जबाबदार नसून सर्व जनतेलाच जबाबदार असतो. त्यामुळें विधिमंडळ त्याला काढून टाकूं शकत नाहीं. मात्र त्याला विधिमंडळानें पसार केलेल्या आदेशान्वयेंच कारभार करावा लागतो.

**न्याय-विभाग**

या विभागाकडे आदेशाचें योग्य प्रतिपालन होतें कीं नाहीं हें पाहण्याचें

काम असतें. जनतेचे अधिकार रक्षण करण्याकरितां व तिच्या हिताकरितां विधिमंडळांतून आदेश पसार केले जातात व ते विधान-विभागानें अंमलांत आणावयाचे असतात. पण ते योग्य प्रकारे पाळले जातात किंवा नाहीं हें न्याय-विभाग पहातो. याकरितां राष्ट्रांत विविध अधिकारांचीं न्यायालयें व न्यायाधीश स्थापण्यांत येतात व कोणताही विवाद् निर्णयाकरितां त्यांचेकडे नेतां येतो व तो निर्णय अखेरचा असून त्याप्रमाणें जनतेला व शासनसंस्थेला वागावें लागतें. असा निःपक्षपाती निर्णय देण्याकरितां न्याय-विभागावर कोणत्याही प्रकारचें दडपण असतां कामा नये. नाहीं तर योग्य व न्याय्य निर्णय मिळणें अशक्य. याकरितां बहुतेक संस्थानांत हा विभाग शक्य तों आदेश-विभागाच्या कक्षेच्या बाहेर राखण्यांत येतो.

## संस्थानाचें कार्यक्षेत्र

प्राचीन काळीं जनतेचें संरक्षण हेंच संस्थानाचे प्रमुख कार्य असे व या कार्यानुरोधानें येणारी इतर कार्येंही अर्थातच असत. पण जनतेच्या खासगी किंवा सामाजिक कार्यांत संस्थान ढवळाढवळ करीत नसे. पण आधुनिक काळांत संस्थानाच्या कार्याची कल्पना फारच बदललेली आहे. जनतेचें सर्व प्रकारचें संरक्षण व हित संस्थानानें पाहिलेंच पाहिजे असा विचारप्रवाह सांप्रत चालू आहे. या विचारप्रवाहान्वयें संस्थानाचें कार्यक्षेत्र अत्यंत व्यापक होऊन त्याच्या कक्षेंत समाजाची सर्वच कार्यें येऊं लागली आहेत. सामाजिक, आर्थिक, राजकीय, वैय्यक्तिक, नैतिक, धार्मिक, अशा सर्वच कार्यांवर संस्थान आदेश पसार करतें व देखरेख आणि नियंत्रण ठेवतें. या सर्व प्रकारच्या कार्यांचा लयबद्ध समन्वय करून जनतेला अधिकांत अधिक सुख मिळवून देणें हें संस्थानाचें कर्तव्य होय.

याकरितां प्रत्येक व्यक्तीच्या अधिकारांचें योग्य संरक्षण झालें पाहिजे याकरितां लोकतंत्र राष्ट्रांत व्यक्तीला शक्य तों अधिक अधिकार दिले जातात व त्यांचें रक्षण करण्याचें काम संस्थानावर असतें. त्याचप्रमाणें प्रत्येकाच्या मालमत्तेचें अपहारापासून रक्षण करणें भाग असतें. नागरिकांना संस्थानानें कांहीं नागर व राजकीय अधिकार दिलेले असतात. त्यावर कोणत्या व्यक्तीनें,

संस्थेनें किंवा शासनसंस्थेनें धाड आणली तर त्यांचें रक्षण करावें लागतें. समाजरक्षणाप्रमाणेंच समाजोन्नतीचें कार्यही संस्थानांना करावें लागतें. या दृष्टीनें संस्थानाचें पहिलें कर्तव्य म्हणजे समाजाला शिक्षण देणें. याकरितां बहुतेक प्रगत संस्थानांत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें असतें व कांहीं समृद्ध संस्थानांत दुय्यम शिक्षणदेखील मोफत मिळण्याची सोय असते. त्याचप्रमाणें उच्च शिक्षण मिळण्याची व्यवस्थाही संस्थान करितें. याशिवाय नाना प्रकारच्या प्रयोगशाळा, प्रात्यक्षिक शिक्षण, संशोधनशाळा, इत्यादि संस्था उघडून किंवा उत्तेजन देऊन ज्ञानप्रसाराचें काम संस्थान करीत असतें. याखेरीज देशांतील उद्योगधंद्यांची वाढ व व्यवस्था, शेतकीचें वर्धन, इत्यादि कामें फारच महत्त्वाची असतात. समाजांत कांहीं व्यक्ती समर्थ तर कांहीं दुर्बल, कांहीं श्रीमंत तर कांहीं गरीब, अशा असतातच; पण ही परिस्थिति फारच विषम झाली तर समाज दुःखी होऊं लागतो. यासाठीं प्रत्येक व्यक्तीच्या किमान गरजा म्हणजे पोटभर अन्न, अंगभर वस्त्र, शिक्षणाची संधी व उद्योगव्यवसाय करण्याची संधी. या गोष्टी संस्थानानें पुरविल्याच पाहिजेत. म्हणून देशांतील संपत्ति कांहीं व्यक्तींकडेच सांठविली न जातां शक्य तो न्याय्य विभाजन करणें हेंही संस्थानाचेंच कर्तव्य होय. याकरितां श्रीमंतांवर भरपूर कर बसविणें व गरिबांना मदत देणें, हीं कार्यें संस्थानाला करावीं लागतात.

प्रकरण ९ वें

# लोकतंत्र

## व्याख्या

" जनतेची, जनतेच्या हिताकरितां, व जनतेनें चालविलेली शासन-व्यवस्था, " अब्रॅहम् लिंकन्नें लोकतंत्राची व्याख्या याप्रमाणें केली आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला आपलें व्यक्तिमत्व व गुणधर्म पूर्णपणें विकसित करण्याचा व प्रकट करण्याचा जन्मसिद्ध अधिकार आहे. समाजांतील एका विशिष्ट वर्गानें किंवा व्यक्तीनें समाजावर अधिकार गाजवून स्वत:चाच फायदा करून घेणें, हें केव्हांही अन्याय्य होय. याकरितां प्रत्येक समाजाला आपला कारभार व व्यवस्था आपल्या मताप्रमाणें व हिताप्रमाणें चाल-विण्याचा अधिकार आहे. संस्थानाचें व शासनव्यवस्थेचें अंतिम साध्य सामाजिक हित हेंच होय. या दृष्टीनें पाहतां कोणाही व्यक्तीनें अगर वर्गानें समाजाला न जुमानतां शासनव्यवस्था करणें हा अन्यायच म्हटला पाहिजे. समाजाचें हित समाजाच्या मताप्रमाणें ठरविलें पाहिजे. मात्र समाजाला नेहमींच आपल्या हिताचें परिपूर्ण आकलन होईलच, असें नाहीं. सामान्य जनता ही थोडीफार अज्ञानी व फारसा पोंच नसलेली अशीच असते. म्हणून तिला विद्वान् व अनुभवी व्यक्तींचें मार्गदर्शन हरघडी हवेंच हवें, यांत संशय नाहीं. सामान्य जनतेनेंच सर्व कारभार हांकावयाचा म्हटलें तर

व्यवहारांत ही गोष्ट शक्य होणार नाहीं. राज्यव्यवहारांतील सर्व खांचाखोंचा ओळखून कारभार हांकणें, हें सामान्य जनतेला शक्य नाही; व तरीही जनतेनें स्वतःच कारभार करावयाचा ठरविल्यास इतर सर्व उद्योगव्यवसाय दूर सारावे लागतील व समाजाच्या दैनंदिन चरितार्थाचें सर्वच गाडें अडून राहील. याकरितां लोकतंत्र हें जरी ' जनतेनें चालविलेलें शासन ' असें म्हणण्यांत येतें, तरी तसा शब्दशः अर्थ घेऊन कारभार करतां येणार नाहीं, हें उघडच आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत या तत्त्वाला थोडी मुरड घालणें अपरिहार्य असतें. जनतेनें आपल्या हिताकरितां समाजांतील विद्वान् व अनुभवी तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाच्या सहाय्याने चालविलेली व्यवस्था म्हणजेच लोकतंत्र. अशा अनुभवी तज्ज्ञांना आपल्या नित्य गरजा व प्रश्न सांगून त्यांच्याकडून जनता शासनव्यवस्था चालविते. विश्वासू, जाणते, तज्ज्ञ व समाजहितदक्ष अशा समाजधुरीणांना जनता आपले प्रतिनिधी निवडते व त्यांच्या हातीं राज्यव्यवस्थेचे सर्व अधिकार सोंपविते. जोंपर्यंत हे प्रतिनिधी सामाजिक हिताकरितांच हा अधिकार वापरतात व धोरण आंखतात, तोंपर्यंत जनतेचा त्यांच्यावर विश्वास असतो व त्यांची व्यवस्था जनता मान्य करते; पण या विश्वासाचा गैरफायदा घेऊन जर त्यांनीं जनतेचा विश्वासघात केला, तर जनता त्यांना दूर करते व इतरांच्या हातीं कारभार सोंपविते. अशा प्रकारच्या शासनव्यवस्थेलाच लोकतंत्र असें म्हणतात.

**स्वातंत्र्य** ( Liberty )

लोकतंत्रांत व्यक्तिस्वातंत्र्याला फार महत्त्व आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला आपली योग्यता पूर्णपणें वाढविण्याचें व प्रकट करण्याचें स्वातंत्र्य जन्मजातच असतें, या तत्त्वावरच लोकतंत्राची उभारणी केलेली आहे. व्यक्तीचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें, तर लोकतंत्राचें पहिलें तत्त्वच धाब्यावर बसविल्यासारखें होईल. याकरितां कोणत्याही लोकतंत्री संस्थानांत प्रत्येक व्यक्तीचे समान अधिकार प्रथमतः मान्य केले पाहिजेत. संस्थानांत कायद्यानें प्रत्येक व्यक्तीला, ती स्त्री असो वा पुरुष असो, श्रीमंत असो व गरीब असो, समान मानलें पाहिजे व समान वागणूक दिली पाहिजे. कायद्यापुढें प्रत्येक व्यक्ति सारखीच; असें असेल तरच शासनव्यवस्था न्याय्य मार्गानें चालली

आहे, असें म्हणतां येईल. लोकतंत्री संस्थानांत प्रत्येक व्यक्तीला समान स्वातंत्र्य व अधिकार असतात.

मात्र हे स्वातंत्र्य अनियंत्रित व अमर्याद असूं शकणार नाहीं. समाजधारणेकरितां प्रत्येक व्यक्तीला कांहीं विशिष्ट अधिकार देऊन, त्या क्षेत्रापुरतेंच स्वातंत्र्य मर्यादित करणें हेंच योग्य होय व बहुतेक लोकतंत्री संस्थानांत हाच मार्ग स्वीकारला जातो. प्रत्येक व्यक्तीला संपूर्ण व अनियंत्रित स्वातंत्र्य दिल्यास, प्रत्येक व्यक्तीचा इतर व्यक्तींशी विवाद उत्पन्न होऊन समाजांत गोंधळ माजून राहील व प्रत्येकाचें स्वातंत्र्यच नष्ट होईल. म्हणून प्रत्येकाचें स्वातंत्र्य व अधिकार हीं मर्यादित केलींच पाहिजेत. प्रत्येक व्यक्तीला जगण्याचा, व जगण्याकरितां धडपड आणि उद्योग करण्याचा अधिकार निसर्गतःच असतो अर्थातच हा अधिकार प्रत्येकाला असल्यामुळें एकानें दुसऱ्याच्या अधिकारावर आक्रमण करतां कामा नये. प्रत्येकाचा अधिकार दुसऱ्यांच्या तत्सम अधिकारामुळें मर्यादित झालेला असतो. ही मर्यादा प्रत्येकानें कसोशीनें पाळली, तरच समाजव्यवस्था नीट होईल. म्हणून प्रत्येकाचे अधिकार मर्यादित करणें व प्रत्येकाच्या न्याय्य अधिकारांचें रक्षण करणें हें संस्थानाचें एक महत्त्वाचें कार्य होय. प्रत्येकाच्या स्वातंत्र्याबरोबरच त्याच्या मर्यादा, व अधिकाराबरोबरच तज्जन्य कर्तव्य निर्माण होतें. अमर्याद व अनियंत्रित स्वातंत्र्य, आणि कर्तव्याव्यतिरिक्त अधिकार, हीं समाजांत अशक्य व अनिष्ट होत. मला जसें जीवन उपभोगण्याचें स्वातंत्र्य हवें, तसेंच माझ्या शेजाऱ्यालाही हवें, व माझें स्वातंत्र्य त्यानें हिरावून घेऊं नये अशी ज्याप्रमाणें माझी इच्छा असते, तशीच त्याची पण असते. याकरितां त्याच्या स्वातंत्र्यावर किंवा अधिकारांवर आक्रमण करण्याचा मला अधिकार नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याच्या अधिकाराला मान देणे, हें माझें कर्तव्य होय. अधिकार व कर्तव्य हीं परस्परावलंबी असतात एकाचा अधिकार म्हणजे इतरांचें कर्तव्य, अशी तीं अन्योन्यसापेक्ष असतात. यामुळें अधिकार उपभोगून कर्तव्य टाळण्याचा प्रयत्न करणें म्हणजे अन्यायच होय, व प्रत्येकानें तसेंच करण्याचें ठरविल्यास कुणालाच अधिकार उपभोगावयास मिळणार नाहींत. एकानें अधिकार उपभोगावयाचे, तर इतरांनीं ते त्याला भोगूं दिले पाहिजेत. म्हणूनच प्रत्येकानें आपल्या

अधिकारांबरोबरच कर्तव्य पाळण्यासही कसूर करतां कामा नये. प्रत्येक अधिकारामागोमाग कर्तव्य हें आलेंच. अधिकार व कर्तव्य या एकाच गोष्टीच्या दोन बाजू होत. एक हवें असल्यास दुसरेंही स्वीकारलेंच पाहिजे. असा विचार करून या दोन्ही बाजू नीट समजावून घेतल्या, तरच जीवन पूर्णपणें व सुखानें जगतां येईल. प्रत्येक नागरिकानें हें सत्य जाणणें व अंगीं बाणणें, हें त्याचें पहिलें कर्तव्य होय. पृथ्वीवरील विराट समाजांत आपलें निश्चित स्थान कोणतें, याचें ज्ञान नसेल तर प्रवाहपतितासारखी दिशाभूल होईल. हें टाळण्यासाठीं प्रत्येक नागरिकानें आपले अधिकार आणि कर्तव्य यांची परिपूर्ण माहिती करून घेतलीच पाहिजे. अधिकार व हक्क या गोष्टी आनन्ददायक, आणि कर्तव्य व बन्धन या गोष्टी त्रासदायक, हा एक सर्वसामान्य भ्रम आहे. प्रत्येकाला आनन्द तेवढा हवा; पण त्या-करितां श्रम करावयास नकोत. प्रत्येकानें असेंच वागल्यास कुणालाच सुख मिळणें शक्य नाहीं. “नादत्तमुपतिष्ठते” हें सर्व ठिकाणीं खरें आहे. ‘एका हातानें द्यावें, व दुसऱ्यानें घ्यावें’ असा सृष्टिनियमच आहे. श्रमाशिवाय फळ नाहीं; कर्तव्याशिवाय अधिकार नाहीं. जितके अधिकार अधिक, तितकी जबाबदारी अधिक व कर्तव्यें पण अधिक. अमेरिकेच्या अध्यक्षाला, इंग्लंडच्या किंवा आजच्या हिंदुस्थानच्या मंत्रिमंडळाला “कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुम्” असे अधिकार असतात हें खरें; पण सर्व राष्ट्राची प्रचंड जबाबदारीही त्यांच्या माथीं असते व त्यासाठीं अहर्निश झटावें लागतें. राष्ट्राच्या लक्षावधि बिकट प्रश्नांवर साधकबाधक विचार करून हुकूम सोडणें, हें कांहीं सुखासीन काम नाहीं. या कर्तव्याच्या ओझ्याखालीं त्यांना आपल्या अधिकाराचा विचार करण्यालाही सवड मिळत नाहीं. मग त्यापासून सौख्य व्हावयाचें तर दूरच राहिलें.

प्रत्येक माणसानें आपल्या अधिकारांबरोबरच कर्तव्याचेंही पालन केलें, तरच सर्वांना अधिकार उपभोगतां येतील. आपल्या कोणत्याही अधिकाराचा किंवा हक्काचा विचार करून पहा; त्यासोबत कर्तव्य दिसलेंच पाहिजे. जगण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे, म्हणजे इतरांना जगूं देण्याचें कर्तव्य लागू झालेंच. “मी जगेन, पण इतरांना जगूं देणार नाहीं,” असें म्हटलेंत, तर इतरही तेंच म्हणतील व तुमच्या जीवितावर उठतील. मग तुम्हीं कसे जगणार ?

म्हणूनच आपल्या हक्कांबरोबरच इतरांच्या हक्कांनाही जपणें अनिवार्य होय. ' मला जसें सौख्य हवें असतें, तसेंच इतरांनाही हवें असतें,' हा विचार फार महत्त्वाचा आहे. सर्वजणच सृष्टीचीं समान लेंकरें होत; एक आवडता व दुसरा नावडता असें मानण्याचें कारण नाहीं. म्हणून इतर कुणाच्याही सौख्यावर किंवा अधिकारावर आक्रमण करणें, म्हणजे सृष्टिनियमाचा भंग व विलक्षण कर्तव्यच्युति होय.

समाजांतील प्रत्येक व्यक्तीला कांहीं मूलभूत अधिकार असतात व त्या सर्वांचें संरक्षण करणें, हें समाजाचें व संस्थानाचें पवित्र कर्तव्य समजलें जातें. हे अधिकार ज्या संस्थानांत किंवा समाजांत नाकारले जातात, तेथें व्यक्तीचा व समाजाचा पूर्ण विकास होणें शक्य नाहीं. बहुतेक आधुनिक संस्थानांत हे अधिकार कमीअधिक प्रमाणांत, तत्त्वतः मान्य केले जातात. विशेषतः लोकतंत्री संस्थानांत या अधिकारांवर फारच भर देण्यांत येतो व त्यांच्या संरक्षणाच्या दिशेनेंच सर्व ' आदेश ' पसार करण्यांत येतात. या अधिकारांचे दोन विभाग कल्पितां येतील: १. नागर; व २. राजकीय.

## नागर अधिकार

१. **जगण्याचा अधिकार**-समाजाच्या मूळ कल्पनेंतच या अधिकाराचा अंतर्भाव होतो. ज्या समूहांत व्यक्तीला जगण्याचा अधिकार नाही, त्याला समाजाचें स्वरूप कधींही येणार नाहीं. प्रत्येक माणसाला हा अधिकार आहेच. म्हणून संस्थानानें प्रथमतः जनतेचें जीवित सुरक्षित ठेविलें पाहिजे. 'संस्थान' या संस्थेची सुरुवातच या कर्तव्यापासून झाली. कुणाही व्यक्तीच्या जीवि- ताला निष्कारण धोका येतां कामा नये, यासाठीं संस्थानानें सावधगिरी राखली पाहिजे व अवश्य ती व्यवस्था केली पाहिजे. जगण्याचा अधिकार हा पहिला व मूलभूत असा अधिकार होय.

२. **आत्मसंरक्षण**-संस्थानानें व्यक्तीच्या जीविताविषयीं सावधगिरी राखून व व्यवस्था करूनही, व्यक्तीच्या जीविताला अपाय कारणारे प्रसंग प्रत्यहीं येतात व अशा प्रसंगीं संस्थानाची तात्काळ मदत मिळणें शक्य नसतें. अशा आकस्मिक प्रसंगीं प्रत्येकाला आत्मसंरक्षणाचा अधिकार नसेल तर पहिल्या अधिकाराची योग्य पूर्ति होणार नाहीं. जगण्याच्या अधिकाराला पूरक म्हणून कोणत्याही

प्रकारें स्वरक्षण करण्याचा अधिकार अपरिहार्य होय. याचकरितां स्वसंरक्षक हत्यारें व साधनें बाळगण्याचा व प्रसंगीं वापरण्याचा अधिकारही पर्यायानें आलाच. अर्थातच या साधनांचा उपयोग निव्वळ स्वसंरक्षणाकरितां आणिबाणीच्या प्रसंगींच करणें, हें प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य होय. जवळ शस्त्र आहे म्हणून त्याचा दुरुपयोग केल्यास कर्तव्यच्युतीकरितां संस्थानाकडून शिक्षा होणारच.

**३. श्रम करण्याचा अधिकार**–समाजांतील कांहीं भाग्यवान् व भारभूत व्यक्ती सोडल्या तर, इतर कुणासही स्वस्थ बसून चरितार्थ चालवितां येत नाही. याकरितां जगावयाचें असेल तर श्रम करणें आवश्यक होय व असा अधिकारही पाहिजेच. प्रत्येकाला आपल्या ऐपतीप्रमाणें व गुणधर्माप्रमाणें जमेल तें काम करून चरितार्थ चालविण्याचा अधिकार हवाच. कुणावरही विशिष्ट व्यवसायाची जबरदस्ती होतां कामा नये. मला जर लोहाराचा धंदा जमत नसेल, तर तो करण्याची माझ्यावर सक्ती होतां कामा नये. जो धंदा करण्याची मला आवड, शक्यता व संधी असेल, तो करण्याचें स्वातंत्र्य मला असलें पाहिजे. यालाच श्रम करण्याचा अधिकार असें म्हणतात. सामान्यतः सर्व राष्ट्रांत असें स्वातंत्र्य असतें; पण हुकूमशाही राष्ट्रांत शासनव्यवस्थेच्या धोरणास अनुसरून श्रम करावे लागतात. तसेंच कांहीं देशांत प्राचीन काळीं गुलामगिरीची पद्धत होती व तेथें सक्तीनें कामें करवून घेण्यांत येत असत. अगदीं एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत अमेरिकेंतदेखील प्रचंड गुलामगिरी होती व दक्षिणेकडील कृषिप्रधान संस्थानें गुलामांच्या सक्तीच्या श्रमावर श्रीमंत झालेलीं होतीं. श्रमावर कोणत्याही प्रकारचें बंधन असतां कामा नये.

**४. खासगी मालमत्ता**–आपण अविश्रांत श्रम करून व रात्रंदिवस घाम गाळून मिळविलेली संपत्ति किंवा वित्त उपभोगण्याचा अधिकार आपणासच असला पाहिजे व तिची व्यवस्था आपल्या मर्जीप्रमाणें झाली पाहिजे, असें वाटणें साहजिकच होय. नाहीं तर राबणारा एक व खाणारा तिसराच, अशी अवस्था झाल्यास कुणालाही राबण्याची हौस वाटणार नाहीं. श्रम करणाराला खासगी मालमत्तेचा अधिकार असणें, हें एक मोठें उत्तेजक असतें.

आपल्या श्रमाचें फळ आपण किंवा आपले वंशज उपभोगूं शकतों व इतरांचा त्यावर कांहीं अधिकार चालणार नाहीं, ही कल्पना मोठी समाधानकारक वाटते व त्यामुळें एक प्रकारची शाश्वति वाटते व जीवनांत स्थैर्य येतें. रात्रंदिवस राबून मिळविलेली संपत्ति कुणीतरीच उपभोगूं लागला तर श्रम करण्याचें प्रत्येकजण टाळील. खासगी मालमत्ता ठेवण्याचा अधिकार नाहींसा केल्यास समाजांत उत्साहानें श्रम व काम करणारीं माणसें आपखुषीनें मिळणार नाहींत. त्यांच्यावर सक्ती करावी लागेल. सांप्रत बहुतेक देशांत हा अधिकार मान्य झालेला आहे व संस्थान या अधिकाराचें रक्षणही करतें. रशियांत हा अधिकार नष्ट करण्यांत आलेला होता; पण तो प्रयोग फारसा यशस्वी न झाल्यानें थोड्या फार प्रमाणांत तो परत मान्य करण्यांत येत आहे.

५. **प्रतिष्ठा व कीर्ति**–समाजांत प्रत्येकाला मानमान्यता व कीर्ति मिळवून प्रतिष्ठेनें व सन्मानानें जगण्याचा अधिकार आहे. "काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते" या सुभाषिताप्रमाणें नुसतें जेवणखाण करणें व जगणें हें मानवी जीवनाचें ध्येय नसून समाजांत प्रयासानें मान्यता मिळविणें व ती राखणें आणि जीवनाचें सार्थक करणें, हेंच प्रत्येक माणसाचें साध्य होय. संभावित माणसाच्या दृष्टीनें नांवलौकिकास फार महत्त्व आहे. चारुदत्ताला मरणाचें भय नव्हतें; पण नांवाला कलंक लागल्याचें त्याला मृत्यूहूनही अधिक भयानक व दुःखप्रद वाटलें. म्हणूनच तो म्हणतो, "न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः". भगवद्गीतेंतही असेंच सांगितले आहे, "संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते." प्रत्येकाला आपली प्रतिष्ठा व नांवलौकिक राखण्याचा अधिकार आहे व त्यावर आक्रमण करणारास शिक्षा ही अवश्य झाली पाहिजे.

६. **धर्माचें व संप्रदायाचें स्वातंत्र्य**–प्राचीन काळीं समाजांत धर्माला अतिशय महत्त्व असे व प्रचलित धर्माविरुद्ध, संप्रदायाविरुद्ध अगर चाली-रीतींविरुद्ध मत प्रतिपादन करणारास अत्यंत कडक शासन करण्यांत येई. त्यामुळें इतर कोणताही धर्म अगर संप्रदाय स्वीकारण्याचा अधिकार नसे. पण विसाव्या शतकांत धर्म ही निव्वळ वैय्यक्तिक बाब मानली जात असून प्रत्येक व्यक्तीस कोणताही धर्म स्वीकारण्याचें किंवा कोणतेंही मत प्रतिपादन

करण्याचें स्वातंत्र्य बहुतेक प्रगत समाजांत आहे. संस्थान सहसा त्यांत ढवळाढवळ करीत नाहीं.

७. **शिक्षण**–आपलें अज्ञान नाहींसें करून सामाजिक व वैय्यक्तिक उन्नतीला हातभार लावणें हें प्रत्येकाचें एक नैतिक कर्तव्य होय व यावर उत्तम उपाय म्हणजे शिक्षण हाच, असें म्हणतां येईल. प्रत्येकाला नव्या जगाचें सामान्य ज्ञान व जरूरीपुरतें शिक्षण मिळविण्याचा अधिकारच असतो व तें मोफत मिळवून देणें हें संस्थानाचें कर्तव्य होय. हाही मूलगामी अधिकार आहे. लोकतंत्राचें खरें यश सुशिक्षित व समंजस जनतेवर अवलंबून असतें. सामान्य जनता जर अज्ञानांत खितपत असेल तर लोकतंत्र यशस्वी होण्याची आशाच नको. आपले सत्पात्र प्रतिनिधी कोण, त्यांचें कर्तव्य काय, व तें ते कितपत योग्य प्रकारें व दक्षतेनें पार पाडतात, हें सर्व समजण्याला शिक्षणाची अत्यंत जरूरी आहे. जनतेला प्रबुद्ध करणारें शिक्षण हाच खरा लोकतंत्राचा पाया.

८. **मतस्वातंत्र्य**–हा एक शिक्षणाचाच भाग होय. आपल्या विचारांवर कोणतेंही दडपण असतां कामा नये. आपल्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल तें व्यक्त करण्याचा अधिकार व स्वातंत्र्य असेल, तरच आपणास खरें ज्ञान मिळेल. नाहींतर एकाद्याच्या हुकुमाप्रमाणें मत बदलावें लागत असेल तर, खरें ज्ञान मिळणें शक्य नाही. ‘ कोणतेंही ज्ञान हें पवित्रच ’ असें मानलें तर, आपल्या मतीप्रमाणें विचार करून योग्य तें मत प्रकट करण्याचें स्वातंत्र्य असणें हेंच योग्य. अशा प्रकारच्या व्यक्तिस्वातंत्र्यापासूनच लोकतंत्राची सुरुवात झाली. स्वतंत्र, अकलुषित व तर्कनिष्ठ अशा बुद्धीस पटेल तें हालअपेष्टांची पर्वा न करतां व्यक्त करणारे मानवश्रेष्ठ समाजांत उद्यास आल्यानेंच समाजाची इतकी प्रगति झाली आहे. लाखों प्रकारचे शोध यामुळेंच लागले. याकरितां विचारस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य हीं दोन ज्ञानाचीं अंगें होत. खरी ज्ञानलालसा असेल तर कोणत्याही प्रकारचा पक्षपात न करतां किंवा पूर्वदूषित ग्रह न धरतां स्वतंत्र विचार करण्यास शिकलें पाहिजे. या विचारपद्धतीलाच शास्त्रीय विचारपद्धति असें म्हणतां येईल. असें सांगतात कीं, भास्कराचार्यांस पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते हें ज्ञात होतें;

पण धार्मिक छळाच्या व बहिष्काराच्या भीतीनें त्यानें सत्य लपवून ठेवलें. या उलट सॉक्रेटिसानें आपल्याला पटलेली गोष्ट मरणाच्या शिक्षेनंतरही बदलण्याचें नाकारलें. ज्ञान वाढवावयाचें असेल, तर विचारस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य यांचा अधिकार आवश्यकच होय.

९. **भाषणस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य**-वरील दोन्हींचा परिपाक म्हणजेच भाषणस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य. कोणतेंही ज्ञान कोंडून ठेवलें, तर तें निरुपयोगी होतें. " आपणांसी जें जें ठावें तें तें दुसऱ्याशीं सांगावें, शाहणें करूनी सोडावें, सकलजनां " या समर्थांच्या उपदेशाप्रमाणें ज्ञानाचा प्रसार सर्वत्र झाला पाहिजे. अज्ञानाचीं कोळिष्टकें झटकून साफ करावयाचीं असतील तर सभास्वातंत्र्य पाहिजे. आपल्यावरील अन्यायांचा व आपल्या बिकट प्रश्नांचा उहापोह समाजांत झाला पाहिजे. अन्याय वेशीवर टांगावयास सभेसारखा उत्तम उपाय नाहीं. लोकतंत्री राष्ट्रांत सामान्यतः प्रत्येकास भाषणाचें व सभेचें स्वातंत्र्य असतें

१०. **संस्थांचें सदस्यत्व**- चौथ्या प्रकरणांत, सामाजिक जीवनांत संस्थांना किती महत्त्व असतें, व त्यांच्याकडून किती प्रचंड कार्य केलें जातें, हें आपण पाहिलेंच आहे. एकाच व्यक्तीला असहाय्यपणें फारसें कार्य करणें शक्य नाहीं. तिला इतरांची मदत पाहिजे. अशा प्रकारें मदत घेऊन श्रमविभाजन केल्यास प्रचंड कार्य सुलभपणें होतें व अशी मदत संस्थांकडूनच मिळते. संस्थांच्या मदतीविना आपली उन्नति साधतां येणार नाही. म्हणून कोणत्याही संस्थेचें सदस्यत्व स्वीकारण्याचा पूर्ण अधिकार प्रत्येक व्यक्तीला पाहिजे.

## राजकीय अधिकार

लोकतंत्राच्या व्याख्येप्रमाणें संस्थानाच्या कारभारांत भाग घेण्याचा अधिकार संस्थानांतील प्रत्येक व्यक्तीला पोंचतो. या अधिकारांनाच राजकीय अधिकार म्हणतात.

नागर अधिकार व राजकीय अधिकार हे विभाग अन्योन्यव्यापक असल्यामुळें निश्चित असे भिन्न मानतां येत नाहींत. पुष्कळसे अधिकार दोन्हा विभागांत बसूं शकतील. उदाहरणार्थ, खासगी मालमत्ता, संस्थांचें सदस्यत्व, इत्यादि अधिकार कोणत्याही विभागांत समाविष्ट करतां येतील.

**१. नागरिकत्वाचा अधिकार**–संस्थानांत जन्माला आलेल्या व कायम वास करणाऱ्या प्रत्येकाला संस्थानाच्या नागरिकत्वाचा अधिकार असतो. या अधिकारान्वयें प्रत्येक नागरिकाला संस्थानांत स्थायिक होण्याचा व संस्थानांत हव्या त्या ठिकाणीं जाण्याचा अधिकार अवश्य आहे. बहुतेक संस्थानांत हा अधिकार प्रत्येकाला असतो. याबरोबरच संस्थानाबाहेर जाण्याचाही अधिकार असला पाहिजे. संस्थानाबाहेर जर अधिक चांगली संधी मिळत असेल, तर तिकडे जाण्यावर निर्बंध असतां कामा नये.

**२. मताधिकार**–विवक्षित वयानंतर प्रत्येक नागरिकाला आपले शासन-संस्थेंतील प्रतिनिधी कोण असावेत, हें ठरविण्याचा अधिकार लोकतंत्रांत असतो. लोकतंत्राचीं तत्त्वें आपण पाहिलींच आहेत. त्याप्रमाणें जनता आपले प्रतिनिधी निवडते व या जनतेला हा अधिकार असतो. या तत्त्वाप्रमाणें, लिंगवित्तादि भेद न मानतां, प्रत्येक माणसाला मताधिकार दिला, तरच लोकतंत्र याला कांहीं अर्थ आहे, असें म्हणतां येईल. संपत्तीच्या मानावर जर मताधिकार दिला, तर त्या तंत्रास वर्गतंत्र असें म्हणतां येईल. या प्रकरणांतच आपण पाहिलें आहे कीं, प्रबुद्ध मतदार संघ म्हणजेच लोकतंत्राचा आधार. प्रत्येक माणसाला मताधिकार असेल, तरच जनतेनें चालविलेली शासनसंस्था असें म्हणतां येईल. लोकतंत्राची सर्व भिस्त मतदारांवरच असते.

**३. निवडणुकीस उभें राहण्याचा अधिकार**–समतेवर लोकतंत्राची जर उभारणी आहे, तर साहजिकच जनतेपकीं कुणाही सोम्या गोम्यास आपल्या कर्तृत्वशक्तीच्या जोरावर संस्थानांतील कोणत्याही जागेकरितां उभें राहण्याचा अधिकार पाहिजेच कर्तृत्वशक्ति, प्रयत्न, लोकसेवा व लोकांचा विश्वास यांच्या पाठबळावर, स्त्री, पुरुष; गरीब, श्रीमंत; हा भेद गौण मानून, कुणाही नागरिकास, कोणत्याही जागेकरितां उभें राहून, निवडून येण्याचें स्वातंत्र्य असणें आवश्यक होय.

**४. संस्थानाचें संरक्षण करण्याचा अधिकार**–संस्थानानें मान्य केलेल्या या सर्व नागर व राजकीय अधिकारांबरोबरच, बरीचशीं कर्तव्यें पण असतात. यांपैकीं सर्वांत मुख्य कर्तव्य म्हणजे संस्थानाचें संरक्षण.

१०

हें कर्तव्य पार पाडण्याकरितां प्रत्येक नागरिकाला प्रसंगीं सैनिक होऊन, किंवा अन्य प्रकारें संस्थानाचें संरक्षण करण्याचा अधिकार असला पाहिजे. कुणाही नागरिकाला युद्धकार्यांत मदत करण्याचा अधिकारच असतो.

५. **सरकारी नोकरीचा अधिकार**–प्रत्येक नागरिकाला कोणतीहीं सरकारी नोकरी आपल्या ऐपतीवर मिळविण्याचा समान हक्क आहे. गुणांच्या, अनुभवाच्या, व शिक्षणाच्या दृष्टीनें वरचढ असलेल्या कुणाही नागरिकाला, इतर कोणत्याही कारणाकरतां अमान्य असें न मानतां त्याची निवड होण्याचा त्याला अधिकार आहे. तो केवळ गरीब आहे, किंवा अमूक जातीचा अगर धर्माचा, किंवा वंशाचा आहे म्हणून, लायक असतांनादेखील, त्याला संधी देण्यांत आली नाही तर लोकतत्राचा पायाच उखडल्यासारखें होईल.

६. **शासनव्यवस्थेवर व सरकारी नोकरांवर योग्य व सत्य टीका करण्याचा अधिकार**–लोकतंत्री संस्थानांत शासनव्यवस्था व सरकारी नोकर, हे जनतेचे सेवक असल्यामुळें, प्रत्येक नागरिकाला त्यांच्याविरुद्ध वास्तव टीका करण्याचा अधिकार आहे. या दोहोंवर जनतेनें आपला विश्वास टाकून आपल्या उन्नतीप्रीत्यर्थ त्यांच्या हातीं सर्व अधिकार सोंपविलेले असतात. याकरितां त्यांनीं आपले कर्तव्य ओळखून चोख कामें केलीं नाहींत, तर कुणाही अधिकाऱ्याला किंवा शासनव्यवस्थेला याचा जाब विचारून योग्य मार्गावर आणण्याचा अधिकार प्रत्येक नागरिकाला असतो. इतकेंच काय, पण प्रसंगीं अधिकाऱ्यांना व शासनव्यवस्थेलाही अधिकारावरून दूर करण्याची सत्ता जनतेच्या हातीं असते. लोकतंत्रांत सर्व सार्वभौम सत्ता जनतेच्या हातीं असते. व्यावहारिक सोयीकरितां, शासनसंघटना व अधिकारी यांच्या हातीं सत्ता सोंपविलेली असते इतकेंच. म्हणून कोणत्याही चुकीकरितां किंवा अन्यायाविरुद्ध टीका करण्याचा व जाब विचारण्याचा अधिकार प्रत्येकाला असतो. शासन-संस्थेचे अधिकारी हे जनतेचे प्रतिनिधी या नात्यानें जनतेचीं कामें तिच्या मर्जी-प्रमाणें करीत असतात. याविरुद्ध वागल्यास जनतेसमोर त्यांना जाब द्यावा लागेल. हा अधिकार लोकतंत्र निष्कलंक राखण्यास फार उपयोगी पडतो. कोणतेंही अन्याय्य कृत्य घडतांच, तें जनतेसमोर उघडकीस आणण्याच्या

स्वातंत्र्यामुळें शासनाधिकाऱ्यांना व पुढाऱ्यांना फार चोख रीतीनें काम करणें भाग पडतें.

आतांपर्यंत आपण सविस्तरपणें नागरिकांच्या अधिकारांचा विचार केला. स्वातंत्र्याविषयीं विचार करतांना आपण पाहिलेंच आहे कीं अधिकार व कर्तव्य या एकाच गोष्टीच्या दोन बाजू आहेत. एक घेऊन दुसरी सोडतां येत नाहीं. एकीबरोबर दुसरी येणें हें अनिवार्य होय. अर्थातच या अधिकारांबरोबरच आपणांस नागरिकांच्या कर्तव्यांचा पण विचार केलाच पाहिजे.

## नागरिकांचीं कर्तव्यें

१ **जगूं देण्याचें व जगविण्याचें कर्तव्य**–आपण इतरांना जगूं दिलें नाहीं, तर इतर आपणांस जगूं देणार नाहींत. याकरितां इतरांना जगूं देणे, त्यांना मदत करणें, व प्रसंगीं कष्ट सोसून प्रयत्नानें त्यांना जगविणें, हे आपलें कर्तव्य होय. प्रत्येक प्राण्याला त्याचा जीव प्याराच असतो. याकरितां सहृदय भावनेनें संकटकाळीं शक्य तों सर्व मदत करणें, हें एक महान् कर्तव्य होय. निव्वळ स्वार्थानें भरलेला मनुष्य समाजांत राहण्यास नालायक असून, कोणत्याही अधिकारास अपात्र असतो. त्याला समाजाकडून कोणतीही अपेक्षा करण्याचा अधिकार नाहीं.

२ **परोपकार**–परोपकार ही कुणावर मेहरबानी नसून, तें एक आपलें कर्तव्य आहे. निव्वळ स्वार्थावर समाज चालणें शक्य नाहीं. याचकरितां समाजांतील संकटग्रस्तांना मदत करणें, हेंही एक कर्तव्यच होय. प्रत्येकजण जर आपल्यापुरतेंच पाहूं लागला, तर पशुसमाजांत व मानवसमाजांत फरक राहणार नाहीं. पशुसमाजदेखील स्वार्थावर चालूं शकत नाहीं. मुंग्यांच्या समाजाचें उदाहरण प्रसिद्धच आहे.

**३. श्रम**–श्रम करण्याच्या अधिकाराबरोबरच, श्रम करण्याचें कर्तव्य पण येतें. श्रम न करतां, ऐदीपणानें स्वस्थ बसून चैन करणें, हा सामाजिक गुन्हा आहे. पूर्वजांच्या वित्तावर किंवा समाजांतील दानधर्मावर आपला पिंड पोसणें, हें लज्जास्पद व नीचपणाचें होय. याच अर्थानें तुकारामांनीं म्हटलें

आहे कीं " भिक्षापात्र अवलंबणें, जळों जिणें लाजिरवाणें. " श्रम करून आपला चरितार्थ चालविणें व यथाशक्ति इतरांना मदत करणें, हें प्रत्येकाचें कर्तव्य होय.

**४. इतरांच्या व सार्वजनिक मालमत्तेविषयीं कर्तव्य**-आपल्या-प्रमाणेंच इतरांनाही खासगी मालमत्तेचा अधिकार आहे, हें जाणून इतरांच्या मालमत्तेवर अतिक्रमण न करणें, हे एक कर्तव्यच होय. न्यायानें जें आपले नाहीं, त्यावर हक्क सांगणें हें सामाजिक दृष्टीनें अनिष्ट आहे. त्याचप्रमाणें आपल्या समाजांतील इतर बांधव दारिद्र्याच्या खाईंत होरपळत असतांना व भुकेनें तळमळत असतांना आपल्या संपत्तींत सतत भर टाकण्याकरितां प्रयत्न करणें, हा सामाजिक गुन्हा आहे. ज्या समाजानें आपल्याला आपलें सर्वस्व दिलें, त्या समाजांतील घटकांकरितां यावच्छक्य तनमनधन अर्पण करणें, हें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्य होय. या नैतिक कर्तव्यांत चुकणारा माणूस समाजविरोधी वृत्तीचा असतो, व त्याला कायद्यानें शिक्षा नसेल, तर समाजानें जागृत होऊन शिक्षा दिली पाहिजे. खासगी मालमत्ते-प्रमाणेंच सर्व राष्ट्रांत सामाजिक किंवा सार्वजनिक मालमत्ता ही असते. तीवर कुणाही विशिष्ट व्यक्तीचा अधिकार नसून, प्रत्येक नागरिकाला तिचा उपयोग करतां येतो. उदाहरणार्थ, सार्वजनिक बागा, रस्ते, आगगाड्या, टपाल व तारखातें, संग्रहालयें, वाचनालयें, शाळा, महाविद्यालयें, इत्यादि. अशा मालमत्तेचा योग्य उपयोग करून घेणें व तिच्याविषयीं अत्यंत काळजीपूर्वक वागणें, हें प्रत्येकाचें कर्तव्य होय.

**५. प्रतिष्ठा व कीर्ति**-आपल्याप्रमाणेंच इतरांनाही मानानें जगण्याचा पूर्ण अधिकार आहे, हें जाणून दुसऱ्याविषयीं जपून बोलणें, लिहिणें व वाचणेंदेखील, हें आपलें कर्तव्यच होय. जाणून बुजून कुणाचाही अवमान करणें, किंवा कुत्सितपणें सत्यापलाप करणें, ही मोठी कर्तव्यच्युति आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**६. धर्म व संप्रदाय**-आजच्या समाजांत प्रत्येकाला आपल्या सारासार विचाराप्रमाणें कोणताही धर्म, संप्रदाय किंवा मत स्वीकारण्याचा व प्रतिपादन करण्याचा अधिकार आहे. म्हणून इतरांच्या धर्मसंप्रदायाविषयीं व मतांविषयीं

सहिष्णुता बाळगली पाहिजे; व त्याचप्रमाणें आपल्या धर्माविषयीं, संप्रदायाविषयीं, किंवा मतांविषयीं फाजील दुरभिमान न धरतां, त्यांचीं तत्त्वें व मार्ग सत्यावर आणि अनुभवावर पारखून घेणें अवश्य आहे.

७. **शिक्षण**—वैयक्तिक आणि सामाजिक विकासाच्या दृष्टीनें प्रत्येकानें शक्य तितकें शिक्षण घेणें, हें एक सामाजिक कर्तव्यच होय. व्यक्तिविकासाला व समाजोन्नतीला शिक्षणाचें अत्यंत साहाय्य होतें. या दृष्टीनें यावच्छक्य शिक्षण घेणें व शिक्षणाचा प्रसार करणें, हें प्रत्येकाचे नैतिक कर्तव्यच समजलें पाहिजे.

८. **मत, भाषण व सभास्वातंत्र्य**—या स्वातंत्र्याचा व्यक्तिविकासावर जितका चांगला परिणाम होतो, तितकाच दुरुपयोगानें हानिकारक परिणाम होतो. समाजहिताकडे व सत्याकडे दुर्लक्ष करून याचा स्वार्थाकरितां उपयोग करून घेणारे समाजघातकी वक्ते वारंवार निपजतात. अशा लोकांपासून सावध राहणें व या स्वातंत्र्याचा योग्य उपयोग करून घेणें, हें प्रत्येकाचें कर्तव्य होय. कोणत्याही साधनाचा बरेंवाईटपणा त्याच्या उपयोगावर अवलंबून असतो.

९. **संस्थांचें सदस्यत्व**—संस्कृतीकरितां संस्थांचें किती महत्त्व आहे, हे आपण पाहिलें. या संस्थांचें सदस्यत्व जसें आपल्या हिताकरितां असतें, तसेंच तें संस्थांच्या व समाजाच्या हिताकरितां पण असतें, हा विचार प्रत्येकानें नेहमीं मनांत बाळगला पाहिजे व संस्थांच्या प्रगतीसाठीं झटलें पाहिजे.

राजकीय अधिकारांबरोबरही कर्तव्यें हीं येतातच. मतदानाच्या अधिकारा-बरोबरच प्रत्येक निवडणुकीच्या वेळीं मतदानाच्या जागीं जाऊन योग्य उमेद-वाराला मत देणें, हें कर्तव्य पाळलें पाहिजे. संस्थानाचें संरक्षण हें कर्तव्य तर फारच महत्त्वाचें आहे. प्रसंगीं प्राणार्पण करणें, हें देखील एक कर्तव्यच होय. सरकारी नोकरी करणें, हा अधिकार तर खराच; पण नोकरी कराव-याची तर ती समाजसेवक या नात्यानें आपण करतों आहोंत, हें नेहमीं लक्षांत ठेवून केली पाहिजे. तसेंच शासनव्यवस्थेवर व धोरणावर टीका करतांनादेखील, नागरिकानें आपली जबाबदारी ओळखली पाहिजे. कोणत्याही कामावर टीका करणें हें काम फार सोपें आहे. पण प्रत्यक्ष काम करणें हें

फार अवघड आहे. बेजबाबदार टीका न करणें व करूं न देणें, हें एक कर्तव्यच होय.

याशिवाय नागरिकांचीं इतर कित्येक महत्त्वाचीं कर्तव्यें सांगतां येतील. देशव्यापी समाजाबरोबरच आपलीं शहरें, खेडीं, इत्यादि जमातींचाही विचार करणें अवश्य आहे. असेंही म्हणतां येईल कीं, सामान्य व्यक्तीच्या दृष्टीनें राष्ट्रव्यापी प्रश्नांहून शहरांतील किंवा खेड्यांतील आपल्या नजीकची परिस्थिति अधिक महत्त्वाची असते. प्रत्येक नागरिकाचा अहर्निश संबंध या निकटवर्ती परिस्थितिशींच येत असतो व याविषयींचीं कर्तव्येंही महत्त्वाचींच होत.

## नागरिकांचीं इतर महत्त्वाचीं कर्तव्यें

१. **नगराची किंवा खेड्याची स्वच्छता**–मानवी जीवनांत स्वच्छतेचें फार महत्त्व आहे. स्वच्छतेच्या अभावामुळें नाना प्रकारचे रोग व सांथी उत्पन्न होतात. महामारी, हिंवताप, क्षयरोग, अशा प्रकारचे सर्वभक्षक रोग अस्वच्छतेमुळें उद्भवतात व फैलावतात. याकरितां खेडीं व शहरें स्वच्छ ठेवणें हें फार आवश्यक आहे. एकाद्या व्यक्तीच्या किंवा कुटुंबाच्या प्रयत्नानें ही गोष्ट शक्य होत नाहीं. एका माणसानें प्रयत्नानें आपलें घर व आवार स्वच्छ करावें, तर शेजाऱ्यानें आपल्या घरीं व आवारांत घाणीचे ढीग सांचवावेत, असें झाल्यास या प्रयत्नाचा कांहीं उपयोग होणार नाहीं व शेजारच्या आवारांतील माशा, डांस, चिलटें व इतर रोगवाहक कीटक सरसहा सर्व ठिकाणीं फिरूं लागतील. म्हणून प्रत्येकानें आपलें घर व आवार स्वच्छ राखलें पाहिजे व तसेंच सार्वजनिक स्थळें ही स्वच्छ राखलीं पाहिजेत. प्रत्येकानें असा प्रयत्न केल्यास सर्व शहर अगर खेडें संपूर्ण स्वच्छ व निरोगी होईल व सर्वत्र आरोग्य आणि आनंद हीं नांदूं लागतील. याकरितां हें कर्तव्य अहर्निश कसोशीनें पाळलें पाहिजे.

२. **रोगप्रतिबंधास मदत**–रोगाचा अगर सांथीचा गांवांत उद्भव झाल्यास, गांवांतील आरोग्यव्यवस्थेला सर्व प्रकारें मदत करणें, हें दुसरें कर्तव्य होय. स्वतःच्या हिताच्या दृष्टीनेंदेखील स्वच्छता व रोगप्रतिबंध

हीं अनिवार्यच होत. आपण स्वच्छता राखून रोगप्रतिबंधास मदत करतों, यांत आपण कोणावर मोठे उपकार करतों, असें मानण्याचें कारण नाहीं. तसें न केल्यास आपल्याच आरोग्याला व जिवाला अपाय होईल. मलेरिया हटविण्यासाठीं प्रत्येकाने आसपासच्या दलदलीच्या जागा, लहानमोठे खड्डे बुजवून साफ करणें व सांचलेल्या पाण्यावर राकेल किंवा मच्छरनाशक मिश्रण टाकणें, ताप आल्यास किनिन किंवा इतर औषध घेणें, या गोष्टीमुळें सामान्य आरोग्याला व स्वच्छतेला जितकी मदत होते, तितकीच ती आपल्या आरोग्यालाही होते. तसेंच महामारी, प्लेग, देवी, इत्यादि सांथींत तात्काळ रोगप्रतिबंधक लस टोंचून घेणें, स्वच्छता राखणें, शिळेंपाकें अन्न, घाण पाणी, मांस-मासळी, इत्यादि वर्ज करणें, वगैरे गोष्टी केल्या पाहिजेत. रस्त्यावर व इतर ठिकाणीं थुंकण्याच्या संवयीमुळें क्षयरोगाचा प्रसार होतो. त्याकरितां अशा किळसवाण्या संवयींचा त्याग करणें, रोगानें पछाडलेल्यांना शक्य ती मदत करणें, या गोष्टीही केल्याच पाहिजेत.

३. **शांतता व सुव्यवस्था राखण्यास मदत करणें**–सुसंस्कृत समाजाचें पहिलें लक्षण म्हणजे शांतता व सुव्यवस्था. शांत व स्थिर जीवनक्रमाखेरीज समाजाची प्रगति होणेंच शक्य नाही. यासाठीं समाजांतर्गत शांतता व सुव्यवस्था अत्यंत आवश्यक असते व त्या कार्यांत मदत करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच होय. प्रथमतः या शांततेला व सुव्यवस्थेला बाधा येईल अशी कोणतीही कृति आपण करतां कामा नये. चोरीमारी, दंगेधोपे, वाईट व्यसनें, इत्यादींमुळें समाजव्यवस्थेला धोका पोंचतो. म्हणून त्या त्याज्य मानल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें अशा गोष्टी करणाऱ्यांना प्रतिबंध केला पाहिजे व त्याविषयींची बातमी तात्काळ रक्षकाला ( police ) कळवून त्याला लागेल ती मदत केली पाहिजे. व्यवस्थाभंजक घटक शक्य तों समाजांत कमी करण्याकरितां, शिक्षण-संस्थांसारख्या सांस्कृतिक संस्था वाढवून सामान्य शिक्षणाचा समाजांत प्रसार केला पाहिजे.

४. **न्यायालयास मोफत मदत करणें**–समाजांतील शांतता व सुव्यवस्था यांना बाध आणणाऱ्या लोकांची व गोष्टींची चौकशी करून

त्यांचा योग्य निर्णय करण्याचें कार्य न्यायालयाकडे असतें. या कार्यांत न्यायालयास कर्तव्यबुद्धीनें मोबदल्याची अपेक्षा न धरतां साहाय्य करणें, हें प्रत्येक सुसंस्कृत माणसाचें कर्तव्य होय. गुन्ह्याची चौकशी चालू असतांना शहरांतील सभ्य नागरिकांना 'निर्णायक' ( Jury ) किंवा 'निवेदक' ( assessor ) या कार्याकरितां पाचारण करण्यांत येतें. अशा कामीं निःपक्षपाती बुद्धीनें सदसद्विवेकाला स्मरून, टाळाटाळ न करतां निर्णय देणें, हें एक फार महत्त्वाचें कार्य आहे.

५. **गुन्हेगार शोधण्यास मदत करणें**-वरील कर्तव्याप्रमाणें समाजांत अस्वस्थता निर्माण करणारे गुन्हेगार शोधून काढण्यास रक्षकांना सर्व प्रकारें मदत करणें हेंही प्रत्येकाचें कर्तव्यच होय.

६. **शासनव्यवस्थेस साहाय्य**-शासनव्यवस्थेचें कार्य किती अफाट व किती विविध असतें, हें आपण पाहिलेंच आहे, व हें सर्व कार्य जनतेच्या हिताकरितांच, म्हणजे पर्यायानें प्रत्येकाच्या हिताकरितांच चाललेलें असतें. जनतेच्या सहकार्याखेरीज हें कार्य साधणें अशक्य होय. यासाठीं सरकारी अधिकाऱ्यांना त्यांच्या कार्यांत मदत करणें हें एक सामाजिक कार्य आणि कर्तव्यच म्हणावें लागेल. जनतेकरितां शासनसंस्था नाना प्रकारचीं कामें पार पाडीत असते. संरक्षणाकरितां सैन्य उभें ठेवणें, यंत्रसामुग्री, शस्त्रास्त्रें, विमानें, तोफा, बाँब, नौका, रणगाडे, इत्यादि लाखो प्रकारचीं आयुधें तयार करणें; आर्थिक, व्यापारी व सामाजिक व्यवहारांच्या सोयीकरितां, आगगाड्या, रस्ते व इतर साधनें निर्माण करणे, व या सर्व व्यवहारांची व्यवस्था व नियंत्रण करणें, इत्यादि समाजोपयोगी कामें शासनसंस्थेला करावीं लागतात. याकरितां कोट्यवधि रुपये लागतात. या सर्वांत जनतेचें साहाय्य अपरिहार्य असतें. वेळच्या वेळीं कर भरणें. कर भरतांना लांडीलबाडी करून कमी कर भरण्याची सामान्य प्रवृत्ति असते; पण याचा अर्थ असा होतो कीं, त्या मानानें सरकारी शक्ति कमी होते व सामाजिक कार्याची व पर्यायानें प्रत्येकाची हानि होते. बिरबलाच्या गोष्टींतील दुधानें भरावयाच्या हौदाप्रमाणें प्रत्येकानें लबाडी करून हौदांत जर पाणी ओतलें,

तर सरकारी पैशाच्या हौदांत पैशाऐवजीं पालापाचोळाच सांचेल व सरकारचें सामाजिक कार्य स्थगित होईल. यासाठीं प्रत्येक सरकारी कार्यांत मदत करणें, हें नागरिकाचें कर्तव्य होय. अल्पसा क्षणिक स्वार्थ साधण्याकरितां आपल्या स्वतःच्या प्रचंड हितास विरोध करणें, हें विचारमूढत्वाचे लक्षण होय. म्हणून सरकारी माहिती खात्यास आपल्या आर्थिक व्यवहाराची चोख माहिती देऊन सर्व सरकारी कर स्वेच्छेनें भरणे, सरकारी किंवा नगरपालिका व ग्रामपंचायती त्यांच्या किंवा इतर कोणत्याही सार्वजनिक संस्थेच्या निवडणुकींत अन्याय अगर गोंधळ होऊं न देणें, सार्वजनिक जागा किंवा वाहनें यांचा काळजीपूर्वक उपयोग करणें, कोणत्याही सरकारी आदेशाची योग्य अंमलबजावणी करणें हें आपल्याच हिताचें असतें.

**७. इतर सामाजिक व नैतिक कर्तव्यें**–बालविवाह, पडद्याची प्रथा, अस्पृश्यता, हुंडा, इत्यादि अनिष्ट, आत्मघातकी व समाजघातकी चाली समाजांतून नष्ट करण्याकरितां प्रत्येकानें यथाशक्ति प्रयत्न केला पाहिजे. अशा प्रकारच्या बहुतेक चाली सामान्य जनतेच्या अज्ञानामुळेंच मूळ धरतात व वाढतात. . या मुळावरच घाव घालावयाचा असेल तर समाज सुशिक्षित, प्रबुद्ध व जागृत झाला पाहिजे. याकरितां सामान्य शिक्षणाच्या प्रसाराकरितां झटणें, हें एक सामाजिक व नैतिक कर्तव्य होय. अशा प्रकारें समाजाच्या उन्नतीसाठीं प्रत्येकानें झटलें पाहिजे व निरलसतेनें आपलें कार्य करीत राहिलें पाहिजे. आळस हा सामाजिक उन्नतीचा महारिपूच म्हटला पाहिजे. कार्यव्यापृतता हीच खरी समाजोन्नतीची गुरुकिल्ली होय. अशा उद्योगमग्नतेमुळेंच समाज संपन्न होतो. या सामाजिक कार्याला पूरक अशीं, व आपल्या आधिभौतिक सुखा-समाधानाला साहाय्यक अशीं कांहीं वैयक्तिक कर्तव्येंही पार पाडलींच पाहिजेत. प्रत्येक व्यक्तीनें आपल्या कुटुंबाचा चरितार्थ योग्य प्रकारें चाल-विण्याकरितां श्रम व प्रयत्न करून, समाजावरचा व शासनसंस्थेवरचा भार हलका केला पाहिजे. आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींची योग्य जोपासना करून व संततीला योग्य शिक्षण देऊन, त्यांना मार्गस्थ करणें, हें प्रत्येकाचें आनन्ददायक नैतिक कर्तव्य होय.

प्रकरण १० वें.

# नगरपालिका व ग्रामपंचायत

## संस्थानाचें कार्यविभाजन किंवा विकेंद्रीकरण

संस्थानाचें कार्य किती व्यापक असतें, हें आपण पाहिलेंच आहे. इतक विस्तृत व विविध कार्य एकाच छोट्याशा संघटनेकडून व्यवस्थितपणें होणें शक्य नाहीं. याकरितां श्रमविभाजनाचें तत्त्व या ठिकाणींही अत्युपयुक्त असतें. सार्वभौम अधिकार शासनसंस्था आपल्याकडे ठेवते, व दैनंदिन कार्याचे अधिकार वेगवेगळ्या संघटनांमध्यें विभागण्यांत येतात. विशेषतः प्रचंड क्षेत्राविस्तार असलेल्या व विविध प्रकारचे नैसर्गिक प्रांत असलेल्या देशांत तर विकेंद्रीकरण अपरिहार्य होतें. एका मध्यवर्ती सत्तेला प्रत्येक प्रांताच्या खेड्याखेड्यांतील विशिष्ट प्रश्न व अडचणी समजावून घेऊन, त्यांचा योग्य विचार करून त्यांवर निर्णय घेणें, ही गोष्ट अशक्यप्राय आहे. यासाठीं कार्य-विभाजन, किंवा विकेंद्रीकरण अवश्यच होय. केंद्रवर्ती सत्तेनें अशीं लक्षावधी कार्यें आपणच करावयाचें ठरविल्यास एकहि कार्य पूर्ण न होऊन सर्वत्र गोंधळ मात्र माजेल.

याकरितां संस्थानाचे सुटसुटीत व व्यवस्थित विभाग किंवा प्रांत पाडण्यांत येतात; व प्रत्येक विभागाची विशिष्ट राज्यव्यवस्था पाहण्याकरितां वेगळाल्या उपसंघटना बनविण्यांत येऊन, त्यांना अवश्य ते मर्यादित अधिकारही देण्यांत

येतात. विशेषतः लोकतंत्री शासनव्यवस्थेनें सर्व जनतेचे प्रश्न सहानुभूतीनें सोडविणें अवश्य असतें, व ते त्या जनतेच्या मर्जीप्रमाणेंच किंवा त्यांना समाधानकारक वाटतलि अशा रीतीनेंच सोडविले पाहिजेत· त्यांतच प्रत्येक प्रांताचे, शहराचे, व खेड्याचेही प्रश्न निरनिराळे असतात, व त्यांकडे योग्य लक्ष पुरवावयाचें तर, स्थानिक लोकांचेंच साहाय्य घेतलें पाहिजे. मध्यवर्ती सरकाराचे दूरस्थ अधिकारी सर्व स्थानिक प्रश्न आकलन करूं शकणार नाहींत. स्थानिक माणसांनींच आपली एक संघटना बनवून परस्पर सहकार्यानें हे प्रश्न हाताळले, तरच ते व्यवस्थित सुटतील. अशा संघटनांना स्थानिक स्वराज्य-संस्था ( Local Self-government ) असें म्हणतात.

## थोडासा इतिहास

इतरत्र देशांत अशा संस्थांचा उदय बऱ्याच उशीरां, म्हणजे १९ व्या शतकांत झाला. इंग्लंड देशांत अशी सत्ता स्थानिक जनतेच्या हातीं १८३४ सालापासून सोपविण्यांत आली. पण हिंदुस्थानांत स्थानिक स्वराज्य-संस्था अतिप्राचीन काळापासून अस्तित्वांत होत्या. ग्रामपंचायती या तर वेदकालापासून चालत आल्या आहेत, व स्वयंशासित नगरव्यवस्था मौर्यकालीं, ( म्हणजे इसवी सनापूर्वी तीन साडेतीनशें वर्षें ) पूर्णत्वास पोंचलेली होती. पाटलीपुत्र शहराची व्यवस्था आजच्या कोणत्याही नगरपालिकेच्या व्यवस्थेहून कमी दर्जाची मुळीच नव्हती. अशी उत्तम व्यवस्था शहरांत यादवकाळापर्यंत होती; पण त्यानंतर मोगल अमदानींत सर्वत्र एकतंत्री अधिकार सुरू झाला व या संस्थाही नष्ट झाल्या.

यानंतर ब्रिटिश राजवटींत, १७९३ सालीं एक कायदा करण्यांत आला व त्याअन्वयें, मुंबई, कलकत्ता व मद्रास या शहरीं शांतताधीश ( Justice of the Peace ) नेमण्याचा अधिकार गव्हर्नर जनरल यास देण्यांत आला. या शांतताधीशांना त्यांच्या न्यायविषयक कार्याव्यतिरिक्त आरोग्यरक्षण व रस्ते दुरुस्ती, हे अधिकारही देण्यांत आले, व यांवरील खर्चाकरितां घरावर व जमिनीवर कर लादण्याचाही अधिकार मिळाला. १८७२, १८७६ व १८७८ सालीं अनुक्रमें मुंबई, कलकत्ता व मद्रास या शहरीं निवडणुकीचें तत्त्व मान्य करण्यांत आलें. १८५० सालीं, जिल्ह्याच्या मुख्य शहरांत नगरपालिका स्थापन करण्याचा कायदा करण्यांत आला. त्यावर एका अधिकाऱ्याची

( Commissioner ) नेमणूक होऊं लागली. यांतही १८६० नंतर निवडणुकीला अनुमति देण्यांत आली. पण या अनुमतीचा उपयोग मात्र क्वचितच होत असे. १८७० सालीं निवडणुकीवर विशेष भर देण्यांत आला व स्थानिक जनतेच्या सहकार्यास महत्त्व देण्यांत आलें. यामुळें १८७१ ते १८७४ पर्यंत वेगवेगळ्या प्रांतांत हें तत्त्व मान्य करण्यांत आलें,तरीही मध्य प्रांताव्यतिरिक्त इतर प्रांतांत त्याचा उपयोग फारसा करण्यांत येत नसे. स्थानिक-स्वराज्यांत खरी प्रगति लॉर्ड रिपन्‌नें १८८२ सालीं सुधारणा करून, सुरू केली राजकीय आणि सार्वजनिक शिक्षणाकरितां स्थानिक स्वराज्याचें साधन उपयोजिलें पाहिजे, या तत्त्वावर त्यानें सुधारणा केली. स्थानिक स्वराज्या-मुळें दोन अतिमहत्त्वाच्या गोष्टी निश्चित साध्य होतात. एकतर केंद्रवर्ती सत्तेवरील भार कमी होतो; व दुसरें म्हणजे, सामान्य जनांना राजकीय कारभाराची माहिती होते.

या धोरणान्वयें, १८८३-८४ सालीं कायद्यानें नगरपालिकांच्या घटनेंत व अधिकारांत बराच फरक करण्यांत आला. निवडणुकीचें तत्त्व वाढविण्यांत आलें, व एकूण सदस्यांशीं निवडलेल्या सदस्यांचें प्रमाण निश्चित करण्यांत आलें, व नेमण्यांत येणाऱ्या अधिकाऱ्यांचें कमाल प्रमाणही ठरविण्यांत आलें; ( मुंबई प्रांतांत हें प्रमाण अनुक्रमें $\frac{1}{2}$ व $\frac{1}{4}$ असें होतें. ) पुष्कळ शहरांत बिनअधिकारी अध्यक्ष नेमण्यास अनुमति देण्यांत आली. याच वेळीं खेड्यांतही अशी कांहींशी सुधारणा करण्यांत आली व स्थानिक समित्यांची स्थापना झाली.

१९१९ सालीं इतर कांहीं खात्यांबरोबर स्थानिक स्वराज्य खातेंही लोकनियुक्त मंत्र्याकडे सोपविण्यांत आलें, व या संस्था अधिक लोकोपयोगी व लोकप्रिय करण्यासाठीं मताधिकार विस्तृत करण्यांत आला, निवडणुकीचें प्रमाण वाढविण्यांत आलें, व स्थानिक संस्थांवरील सरकारी अधिकार कमी करण्यांत आला. मुंबई प्रांतांत १९२० व १९३३ सालीं ग्रामपंचायतीविषयक कायदे पास झाले, व १९२३ सालीं स्थानिक समितिविषयक, आणि १९२५ सालीं नगरपालिकाविषयक ( Municipal Boroughs ) कायदे पास करण्यांत येऊन, या संस्था बहुतांशीं निवडणुकीवर आधारण्यांत आल्या.

१९३५ च्या कायद्यानें या संस्था सर्वस्वीं निवडणुकीवरच उभारण्यांत आल्या. १९३७ सालीं लोकनियुक्त मंत्र्यांनीं ग्रामपंचायतींचा सर्वत्र फैलाव केला व त्यांचे अधिकार वाढविण्यांत आले. १९४६ नंतर मुंबई व मध्य प्रांतांत ग्रामपंचायतींना अधिक अधिकार व पैसा देण्यांत आला आहे.

## स्थानिक शासन आणि मध्यवर्ती शासन

स्थानिक शासन (Local Government) व मध्यवर्ती शासन (Central Government) यांचा अन्योन्य संबंध कसा असावा याविषयीं दोन महत्त्वाचे प्रश्न उद्भवतात. पहिला असा कीं, स्थानिक शासनाची आवश्यकता खरोखरीच आहे कीं काय? याविषयीं या प्रकरणाच्या प्रारंभीं थोडीशी चर्चा केलेलीच आहे. दुसरा प्रश्न असा कीं, स्थानिक शासनावर मध्यवर्ती सत्तेचा अधिकार कितपत असावा व तो कितपत वापरावा आणि स्थानिक संस्थांकडे कोणते अधिकार व विषय सोंपवावेत.

पहिल्या प्रश्नाविषयीं अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं; पण दुसरा प्रश्न महत्त्वाचा आहे. समाजरक्षणाकरितां व समाजव्यवस्थेकरितां मध्यवर्ती शासनसंस्था सार्वभौम असली पाहिजे व समाजांतील इतर सर्व संस्था तिच्या अधिकाराखालींच राहिल्या पाहिजेत, यांत संशय नाहीं. मध्यवर्ती सार्वभौम सत्ता नसेल, तर अराजक माजून समाज अधोगतीला जाईल. समाजाची प्रगति व्यवस्थित होण्याकरितां सार्वभौम सत्ता अनिवार्यच होय, असें म्हणावें लागेल. पण त्याबरोबरच हेंही खरें कीं, राज्यकारभाराचें सर्वच कार्य मध्यवर्ती शासनसंस्थेनें करावयाचें म्हटल्यास तें जमणें शक्य नाहीं. याकरितां कार्यविभाजन अवश्य केलें पाहिजे.

प्रत्येक प्रांताची, शहराची व खेड्याची परिस्थिति वेगवेगळी असल्यानें त्यांचे दैनंदिन प्रश्न आकलन करणें व सोडविणें हे शासनसंस्थेच्या शक्तीबाहेरचें व कक्षेबाहेरचें काम होय. असे प्रश्न स्थानिक जनतेच्या सहकार्यानेंच सोडविले पाहिजेत. याच दृष्टीनें नगरपालिका इत्यादि स्थानिक स्वराज्य-संस्था स्थापिल्या गेल्या. पण राष्ट्रांतील सर्वच विभागांचे बरेचसे प्रश्न समान असतात, व ते शासनसंस्थेनेंच हाताळणें हितकर असतें. उदाहरणार्थ संरक्षण, चलन, टपाल व तारखातें, वाहतूक, परराष्ट्रसंबंध, इत्यादि कामें शासनसंस्थेलाच हाताळतां येतात. पण प्रत्येक शहरांतील रस्ते, दिवे, पाणीपुरवठा, आरोग्य-

रक्षण, बाजार, धर्मशाळा, दवाखाने, इत्यादि कामें स्थानविशिष्ट असल्यामुळें त्यांची व्यवस्था स्थानिक नागरिकांनींच केली पाहिजे व त्यावरचा खर्चही त्यांनींच केला पाहिजे. त्यापासून मिळणारे फायदे त्यांनाच मिळतात, म्हणून त्यांनींच त्यावरील खर्चाचा बोजाही वाहणें न्याय्य होय. या सर्व संस्थांचें दैनंदिन कार्य व सर्व तपशील स्थानिक लोकांनीं चालविलें, तरच तें कार्य समाधानकारक होईल. अशा कार्यांत दूरस्थ अशा शासनसंस्थेनें ढवळाढवळ केल्यानें कामांत गोंधळच माजेल.

पण राष्ट्रांतील प्रत्येक विभागाची अंतिम जबाबदारी शासनसंस्थेवर असल्यामुळें, कोणत्याही प्रकारचा गोंधळ माजल्यास त्याचीं कटु फळें समाजास भोगावीं लागतील व त्याचा दोष संस्थानावर येईल. या दृष्टीनें शक्य तों गोंधळ माजणार नाहीं, व माजल्यास तो तात्काळ मर्यादेंत राखतां येईल, अशी कांहीं व्यवस्था करणें अपरिहार्य आहे. म्हणून सामान्य घटनेची रूपरेषा, कार्यक्षेत्राची मर्यादा, व दिग्दर्शन या सामान्य गोष्टींत संस्थानानें मार्गदर्शन करावें, व अंतिम अधिकार आपल्याकडे राखून ठेवावेत; पण प्रत्यक्ष कार्याच्या तपशीलांत ढवळाढवळ करूं नये. एकंदरींत संस्थानानें दक्ष अशा निरीक्षकाची भूमिका धारण करावी; पण सर्व प्रत्यक्ष कार्य स्थानिक जनतेच्याच हातीं सोंपवावें.

या संस्थांकडे कोणते अधिकार व कार्यें सोंपवावींत, हाही प्रश्न महत्त्वाचाच आहे. सामान्यतः सर्व राष्ट्राचे अति महत्त्वाचे व सामान्य प्रश्न, व सर्व संस्थांवरील अंतिम अधिकार हे शासनसंस्थेकडेच असणें अपरिहार्य होय. ज्या प्रश्नांवर सर्वत्र एकसूत्री धोरण आंखणें फायद्याचें होईल, असे सर्व प्रश्न संस्थानाकडेच असले पाहिजेत; पण जे प्रश्न स्थानिक महत्त्वाचे असून स्थानिक परिस्थितीच्या ज्ञानावर अवलंबून असतात, ते स्थानिक स्वराज्य-सस्थांवर सोंपवावेत.

पण कांहींही झालें तरी, स्थानिक शासन आणि मध्यवर्ती शासन, हीं एकाच शासनव्यवस्थेचीं उपांगें होत आणि मध्यवर्ती कार्यांची विभागणी अगदीं कांटेकोरपणें करणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ, आरोग्यरक्षण हा जरी स्थानिक विषय असला, तरी एका शहराचें आरोग्य बिघडल्यास शेजारच्या शहरावर त्याचा परिणाम होणारच. याकरितां कार्यविभागणी कांटेकोरपणें न करतां सर्वसामान्य विचार करून अन्योन्य सहकारानें कामें करणें अधिक योग्य होय.

## मुंबई प्रांतांतील स्थानिक शासन-व्यवस्था

विभाग-स्थानिक-समितीची ( District Local Board ) घटना: ( १ ) प्रत्येक समितींतील सर्व सभासद निवडलेले असतात, ( २ ) निवडणुकीकरितां दोन विभाग करण्यांत आलेले आहेत: ( अ ) सामान्य व ( आ ) मुसलमान, विभाग. सामान्य विभागांत हरिजनांकरितां व स्त्रियांकरितां जागा राखीव आहेत. पण भारतीय घटनासमितीनें हे सर्व नाहींसें करून सामान्य मतविभागच मान्य केल्यामुळें, लौकरच तेथेंही हे भेद नाहींसे करण्यांत येतील. ( ३ ) प्रत्येक विभागानें निवडावयाच्या सभासदांची संख्या व स्त्रियांच्या राखीव जागांची संख्या ठरविण्याचा अधिकार सरकारास आहे. ( ४ ) आदेशमंडळाचे सर्व मतदार या समितीचेही मतदार होतात. ( ५ ) मतदारांच्या यादींतील कोणाही माणसास निवडणुकीस उभें राहतां येतें; पण तो जर अशा समितीचा नोकर असेल किंवा अन्य कोणत्या प्रकारें समितीशीं संबद्ध असेल तर त्याला उभें राहतां येणार नाहीं· (६) सभासदांची मुदत तीन वर्षें असते. (७) अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड समिति करते. ते समितीचे सभासद असेतोंपर्यंत अधिकारावर असतात. समितीच्या सभा चालू असतांना अध्यक्षपदीं राहणें, तिच्या कार्यावर लक्ष ठेवणें व सर्व अधिकाऱ्यावर व नोकरांवर नियंत्रण ठेवणें, हीं अध्यक्षाचीं कामें होत. ( ८ ) प्रत्येक समितीनें एक उपसमिति नेमली पाहिजे व तींत पांच ते सात सभासद असावेत. तिला आरोग्यसमिति किंवा अशाच इतर समित्याही नेमतां येतील. ( ९ ) आपलें कार्य करण्याकरितां आवश्यक व योग्य तितके अधिकारी व नोकर नेमण्याचा अधिकार समितीस असतो.

नगरपालिकांची घटना सामान्यत: अशीच असते; मात्र तिला एक मुख्याधिकारी ( Chief Officer ) नेमावाच लागतो.

## ग्रामपंचायतीची घटना

(१) नुकत्याच पास झालेल्या कायद्याप्रमाणें १००० वर लोकसंख्या असलेल्या प्रत्येक खेड्यांत ग्रामपंचायत स्थापन केली जाईल, ( २ ) पंचायतींतील सर्व सभासद निवडलेले असतील. ( ३ ) सभासदांची संख्या १५ पर्यंत असेल. ( ४ ) सामान्यत: खेड्यांत राहणाऱ्या व घरपट्टी किंवा जमीनपट्टी

भरणाऱ्या प्रत्येक वयांत आलेल्या माणसास मतदानाचा अधिकार राहील. ( ५ ) पंचायतीची मुदत तीन वर्षें राहील. ( ६ ) सरपंच हा पंचायतीचा अध्यक्ष राहील व सभासदांकडून त्याची निवड केली जाईल. त्याचप्रमाणें पंचायत आपल्यामधून एकाची उपसरपंच म्हणून निवडणूक करील. ( ७ ) पंचायतीचा कार्यवाह सरकारांतून नेमण्यांत येईल व त्याचे अधिकार, कार्य, वेतन व नोकरीच्या शर्ती सरकारच ठरवील. अपात्रते-करितां किंवा गैरवर्तनाकरितां सरकार त्याला काढून टाकील किंवा पंचायतीच्या सभेंत दोन तृतीयांश सभासदांच्या बहुमतावरूनही काढतां येईल. (८) पंचायतीचे इतर नोकर नेमण्याचा, त्यांना दंड करण्याचा, किंवा त्यांना दूर करण्याचा अधिकार सरपंचास असतो. ( ९ ) पंचायतीचें अंदाजपत्रक विभाग-स्थानिक-समितीनें मान्य केलें पाहिजे. ( १० ) पंचा-यतीच्या पहिल्या बैठकींत तिनें आपल्यामधून पांच जण निवडून एक समिति नेमली पाहिजे. या समितीकडे सरकार न्यायदानाचे अवश्य ते अधिकार सोंपवील.

विभाग-स्थानिक-समितीचें कार्यक्षेत्र: "स्थानिक करांतून जमतील त्या पैशांमधून समितीनें पुढील गोष्टी कराव्यात : ( १ ) रस्ते व वाहतुकीचीं इतर साधनें बांधणें व त्यांची दुरुस्ती करणें. ( २ ) इस्पितळें, दवाखाने, बाजार, धर्मशाळा व इतर सार्वजनिक इमारती बांधणें व दुरुस्त करणें. ( ३ ) सार्वजनिक तळीं, विहिरी व पाणीपुरवठ्याचीं साधनें बांधणें व दुरुस्त राखणें. ( ४ ) प्राथमिक शाळा चालविणें व त्यांकरितां इमारती बांधणें व इतर व्यवस्था करणें. ( ५ ) देवी टोंचण्याची व इतर सार्वजनिक स्वच्छतेची व आरोग्याची व्यवस्था. ( ६ ) रस्त्याच्या दुतर्फा झाडें लावणे व राखणें. ( ७ ) आपल्या अधिकारांतील मालमत्ता राखणें. (८) कुत्र्याच्या विषावरील उपायाची तयारी ठेवणें. व शक्य तर ( ९ ) 'आदर्श शेतें' (Model farms) तयार करणें. ( १० ) दुष्काळांत धर्मार्थ मदत किंवा कामें सुरू करणें. ( ११ ) प्राथमिक शाळेखेरीज इतर शिक्षणाची व्यवस्था करणें. ( १२ ) लहान लोहमार्ग किंवा ट्रॅमगाड्या चालविणें. किंवा ( १३ ) सार्वजनिक आरोग्य, संरक्षण, सोय किंवा समाधान यांकरितां कोणतीही इतर व्यवस्था करणें.

**नगरपालिकांचें कार्यक्षेत्र**

रस्त्यावर दिवे लावणें, पाणी शिंपणें व सफाई करणें; सार्वजनिक गैरसोयी ( nuisances ) दूर करणें; आगीपासून संरक्षण; भयावह उद्योग किंवा व्यवहारावर नियंत्रण ठेवणें; आरोग्यघातक जागांची सफाई; स्मशानव्यवस्था; सार्वजनिक रस्ते तयार व दुरुस्त करणें; बाजार, संडास, गटारें, कपडे धुण्याकरितां जागा, इत्यादि बांधणें; पाणीपुरवठा; देवी टोंचणें; इस्पितळें व दवाखाने; प्राथमिक शिक्षण; सांथीच्या रोगाविरुद्ध योजना व उपाय; दुष्काळी कामें; कुत्र्याच्या विषावर उपाय; वेड्यांची व महारोग्यांची व्यवस्था; ऐच्छिक कामें; सार्वजनिक बागा, संग्रहालयें, वाचनालयें; दुय्यम शिक्षण; खानेसुमारी; पाहाणी करणें ( Survey ); दुग्धालयें; संगीताची व्यवस्था; गरीबांकरितां राहण्याची व्यवस्था; छोटे लोहमार्ग व ट्रॅमगाड्या व इतर सार्वजनिक उपयोगाची कामें.

ग्रामपंचायतीचीं कामें याच प्रकारचीं आहेत. पण या खेरिज न्यायदानाचें कामही ग्रामपंचायतीकडे असतें. आपल्या देशांत शेंकडा ८८ लोक खेडेगांवांत राहतात. या एकाच गोष्टीवरून ग्रामपंचायतीचें महत्त्व लक्षांत येईल. एकूण ६,९५,८९२ खेड्यांतून ३३, ९३, ०१, ९०२ लोक राहतात. मुंबई इलाख्यांत एकूण २६,२४७ खेडीं असून, त्यांत २, २७, ९२, ३०० लोक राहतात. यावरून असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं कीं, खेड्यांची सुधारणा हीच खरी हिंदुस्थानची सुधारणा. शहरसुधारणा ही महत्त्वाची असली, तरी तौलनिक दृष्टया ती गौणच मानली पाहिजे.

इतक्या दूरवर पसरलेल्या व अतिसंख्य खेड्यांची योग्य कदर घेणें, कोणत्याही मध्यवर्ती किंवा दूरस्थ संघटनेला शक्य नाहीं. स्थानिक लोकांचीच एक व्यवस्थित संघटना बनवून, तिच्या हातीं अवश्य तो पैसा व अधिकार सोंपवून, सामान्य मार्गदर्शन व पर्यवेक्षण ( Supervision ) केल्यास हा प्रश्न समाधानकारकपणें सुटावयास हरकत नाहीं. अशी संघटना म्हणजेच ग्रामपंचायत होय.

अशा प्रकारची कोणतीही संघटना चालविण्याकरितां कळकळीचीं, हुशार व लोकहितदक्ष अशीं स्थानिक माणसें पाहिजेत. उडाणटप्पू किंवा गुंड पुढाऱ्यांच्या हातीं सत्ता व पैसा सोंपविणें म्हणजे माकडाच्या हातीं कोलीत

दिल्यासारखें होईल. सांप्रत या खेड्यांतील बहुतेक सर्व लोक अशिक्षित आहेत. आशिक्षितांत लोकहितदक्ष व कळकळीचीं माणसें नसतील, असें नाहीं. पण एकंदरींत एकदम असा प्रयोग करून निर्धास्त राहतां येणार नाहीं. अधिकार सोंपवून त्याचा योग्य उपयोग होतो किंवा नाहीं, यावर लक्ष देणें जरूर आहे. याबरोबरच खेड्यांत सर्वत्र शिक्षणाचा प्रसार करून खेडुतांना जबाबदारीची जाणीव करून देणें आवश्यक आहे. हातीं आलेल्या पैशाचा उपयोग ग्रामसुधारणेऐवजीं आपले हात बळकट करण्याकडे करणारीं माणसेंच खेड्यांत अधिक सांपडतील.

नव्या कल्पना व बदललेली परिस्थिति यांमुळें खेड्यांतील जुनी व्यवस्था पार मोडून गेली आहे, व नवी व्यवस्था स्थिर होण्यास बराच अवकाश असल्यामुळें या संधिकालांत खेड्यांतील वातावरण मोठें गढूळ होऊन गेलें आहे. अधिकारीवर्ग व विशिष्ट जाती यांविरुद्ध लोकांचा कल वहात असून, कोणत्याही प्रकारचा व्यवस्थितपणा किंवा एकजूट आढळत नाहीं. जुन्यानव्यांतील यादवी अद्याप शमलेली नाहीं. जातिसंस्थेसारख्या प्राचीन संस्था लोकमनावरचा आपला ताबा सोडावयास अद्याप तयार नाहींत, तर देशांतील बदलत्या परिस्थितीनें त्यांच्याविरुद्ध हत्यार उपसलेलें आहे. सामान्य जनांना आपल्या अधिकारांची जाणीव झालेली आहे; पण ते हाताळण्याचें कौशल्य व ज्ञान त्यांना अद्याप झालेलें नाहीं. अधिकारी व तथाकथित उच्चवर्गीयांत हें ज्ञान व कौशल्य असूनही त्यांच्या हातीं अधिकार सोंपविण्यास सामान्य जनता तयार नाहीं. अशा प्रकारें परस्परविरोधी प्रवाह खेड्यांत वहात असून, ही परिस्थिति शांत होई तोंपर्यंत लोकहितकारी संघटना बनविणें कठीण आहे. सुसंघटित ग्रामपंचायतीला अनुकूल अशी परिस्थिति खेड्यांत अद्याप निर्माण होण्यास अवकाश आहे. निःस्वार्थीपणा, सहिष्णुता, विस्तृत मनोभूमिका व विचार हे गुण खेडुतांत बिंबविण्यास सामान्य शिक्षणासोबतच जगांतील परिस्थितींचें व विचारप्रवाहांचें ज्ञानही आवश्यक असतें. असें उपयुक्त ज्ञान, वर्तमानपत्रें, मासिकें, पुस्तकें, चित्रपट व आकाशवाणी यांच्या द्वारां मनोरंजक पद्धतीनें करून देतां येतें. या सर्व कार्याकरितां उणीव आहे, ती कळकळीनें कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांची. हे कार्यकर्ते बाहेरून आणून फारसा उपयोग होणार नाहीं. एकतर परकीय खेड्यांकरितां इतक्या कळकळीनें कार्य करणारे इतके कार्यकर्ते मिळणें कठीण; व दुसरें

असें कीं, परकीय कार्यकर्त्यांवर लोकांचा एकदम विश्वास बसणें कठीण. याकरितां गांवांतलिच लोकांतून कार्यकर्ते तयार झाले पाहिजेत. तरच ते खेड्यांत कायम राहून उपयुक्त कार्य करतील.

**मध्य प्रांतांतील ग्रामपंचायतीची नवी घटना**

१९४६ च्या पहिल्या कायद्यान्वयें ग्रामपंचायतीच्या घटनेंत, अधिकारांत व कार्यांत आमूलाग्र बदल करण्यांत आला आहे. यामुळें मध्य प्रांतांत व वऱ्हाडांतील ४० हजार खेड्यांना स्वराज्य मिळेल. सुरवातीला पांच हजार ग्रामपंचायती व तेराशें न्यायपंचायती स्थापन करण्यांत येतील.

१९२० च्या कायद्यानें गांवांतील लोकांच्या विनंतीवरून ग्रामपंचायत स्थापण्यांत येत असे. त्याविषयीं बंधन असें नव्हतेंच. गांवांतील कामाच्या व गरजांच्या मानानें ९ ते १५ पंच असत. गांवाचा मुकादम हा अधिकार-परत्वें ( Ex-officio ) पंच असे. पंचायत न्यायदानाचें व ग्रामव्यवस्थेचें अशीं दोन प्रकारचीं कामें करीत असे. अनुभवावरून असें दिसून आलें कीं, ग्रामपंचायती न्यायदानांतच आपला सर्व वेळ दवडीत व ग्रामव्यवस्थेचें काम पडून रहात असे. कर बसविण्याविषयीं कांहींही निर्बंध नसल्यानें फारच थोड्या पंचायती कर लादीत असत. यामुळें ग्रामसुधारणेचें खरें काम मागेंच पडलें. हे दोष नाहींसे करून अधिक आर्थिक सामर्थ्य पंचायतींना देण्या-करितां नवा कायदा करण्यांत आला. न्यायदानाचें काम करण्याकरितां ग्रामपंचायतींतून न्यायपंचायती निवडण्यांत येतील.

पूर्वींच्या कायद्याप्रमाणें, ग्रामपंचायतीचा अधिकार त्या त्या खेड्यापुरताच मर्यादित असे. पण नव्या कायद्याप्रमाणें नगरपालिका व कांहीं विवक्षित विभाग खेरीज करून इतर सर्व प्रांतावर न्यायपंचायतीचा अधिकार चालूं लागेल. प्रत्येक तालुक्याचे न्यायपंचायतक्षेत्रांत विभाग पाडलेले आहेत. व ज्या खेड्यांत न्यायपंचायत असेल, त्यापासून त्या क्षेत्रांतील कोणतेंही खेडें पांचसहा मैलांहून अधिक दूर असणार नाहीं, अशी व्यवस्था करण्यांत आली आहे. यामुळें पंच, वादी, प्रतिवादी किंवा साक्षीदार यांना त्याच दिवशीं येऊन परत जातां येईल.

न्यायपंचायतींना फौजदारी व दिवाणी खटल्यांत दुसऱ्या वर्गाचे अधिकार देण्यांत आले असून फौजदारी विवादांत रु. ५० पर्यंत दंड करण्याचा

अधिकार दिलेला आहे व हा अधिकार रु. १०० पर्यंत वाढवितां येईल. त्याचप्रमाणें दिवाणी विवादांत १०० रुपयांपर्यंत किंवा वादीप्रतिवादीच्या अनुमतीनें रु. ५०० पर्यंतच्या जंगम मिळकतीविषयीं निकाल देतां येतो. चांगलें कार्य करीत असलेल्या ग्रामपंचायतींना रु. ५०० पर्यंत निकाल देण्याचा अधिकार सोंपविणें, प्रांतिक सरकारनें आपल्या हातीं ठेविलें आहे.

बालवयांतील गुन्हेगारांना दंड न करतां सुधारण्याची संधी देण्याचा अधिकार न्यायपंचायतींना देण्यांत आला आहे. न्यायपंचायतीच्या निर्णयावर 'आवाहन' (appeal) करतां येणार नाहीं; पण सेशन् जज्ज किंवा डिस्ट्रिक्ट् जज्ज यांना विशिष्ट विवादांतील न्यायपंचायतीचा निकाल बदलतां येतो.

न्यायपंचायतींची कार्यपद्धति साधी व सोपी आहे. प्रत्येक विवादांतील वस्तुस्थिति न्याय्य साधनांनीं विवादी, साक्षी, कागदपत्रें व जागा यांची योग्य तपासणी करून निर्णय द्यावयाचा. पात्र ( competent ) न्यायालयानें आदेशिलेली ( क्रिमिनल प्रोसीजर कोड २६२ व ४८८ या विभागांखालीं ) स्थानिक चौकशी करण्याचा तिला अधिकार आहे. तसेंच आपल्या स्थानिक क्षेत्रांतील जमिनीचें सीमाविषयक नफा किंवा नुकसान कितपत झालें आहे, याची चौकशीही तिला करतां येते.

प्रत्येक न्यायपंचायतीच्या कक्षेंत कमींत कमी तीन तरी ग्रामपंचायती येतील. एक हजारावर लोकसंख्या असलेल्या प्रत्येक खेड्यांत ग्रामपंचायत स्थापिली जाईल व त्याहून लहान खेड्यांत ती ऐच्छिक राहील. ज्या ठिकाणीं एक हजारावर लोकसंख्येचीं तीन खेडीं एकत्र नसतील, तेथें जास्तींत जास्त लोकसंख्येच्या खेड्यांत ती स्थापण्यांत येईल. पंच कमींत कमी पांच व अधिकांत अधिक १५ असतील.

प्रारंभीं प्रांतिक सरकार पंच नेमून देईल व ते तीन वर्षें अधिकारावर राहतील. त्यानंतर पंचांची निवडणूक होईल व ते पांच वर्षें अधिकारांत राहतील. पंचवीस वर्षांवरील प्रत्येक माणसाला [कांहीं अपात्र (disqualified) सोडून] मतदानाचा, व पंच, सरपंच किंवा उपसरपंच म्हणून उभें राहण्यास अधिकार आहे. एकादा पंच, सरपंच किंवा उपसरपंच व्यवस्थित वागत नसेल, तर दोन तृतीयांश पंचांच्या बहुमतानें त्याला काढून टाकतां येतें. तसेंच एकादा पंच जर पंचायतींच्या तीन बैठकींना लागोपाठ गैरहजर असेल, तर विभागमंडळाला

( District Council ) त्याला दूर करतां येईल. एकादी पंचायत जर अपात्र ठरली, कार्यांत वारंवार कसूर करूं लागली किंवा अधिकारबाह्य वर्तन करूं लागली, तर प्रांतिक सरकार ती बरखास्त करून पुन्हां निवडणूक करूं शकते.

पूर्वीच्या घटनेंतलि आणखी एक दोष म्हणजे पैशाची कमतरता. नव्या घटनेप्रमाणें प्रत्येक ग्रामपंचायतीला रुपयास दोन पैप्रमाणें जमीन-महसुलावर किंवा खंडावर कर वसूल करावा लागेल व याशिवाय (१) प्रत्येक इमारतीवर व शेताखेरीज जमिनीवर, ( २ ) हुंडेकरी, दलाली, वजन करणें, मापाडी, इत्यादि धंदे करणाऱ्यांच्या परवान्यावर, व ( ३ ) इतर कोणताही उद्योग अगर व्यवसाय करणाऱ्यावर, कर बसविलाच पाहिजे. हे कर बहुधा ग्रामसुधारणा करण्यास पुरे होतील असें वाटतें. जर एकाद्या ग्रामपंचायतीस संडासस्वच्छता, सार्वजनिक रस्त्यावर दिवे, गटारें, पाणीपुरवठा, सराई, धर्मशाळा, इत्यादि कामें करावयाचीं असतील, तर त्यांपासून फायदा घेणाऱ्या लोकांवर जादा कर बसवितां येईल.

प्रत्येक ग्रामपंचायतीला पुढील कामें केलींच पाहिजेत : आरोग्यरक्षण व स्वच्छता, औषधयोजना, पाणीपुरवठा, जन्म, मरण व विवाह यांची नोंद, बालविवाहप्रतिबंधक कायद्याविरुद्ध लग्नें करणारांविषयीं तक्रार, आपल्या इमारतींची दुरुस्ती व डागडुजी, सांथीच्या रोगांचें निवारण व त्यांना फैलावूं न देणें, रस्ते बांधणें व दुरुस्त राखणें, रस्त्यावर किंवा सार्वजनिक जागेवर अतिक्रमण झाल्यास त्याविषयीं माहिती देणें, पिकांचे प्रयोग, निरुपयोगी विहिरी व आरोग्यघातक जागा भरून काढणें.

## स्थानिक संस्थांचें उत्पन्न

कोणतेंही कार्य पैशावांचून होणें शक्य नाहीं. याकरितां स्थानिक संस्थांच्या कार्याकरितां पुरेल इतकें उत्पन्न असलेंच पाहिजे. किंवा असेंही म्हणतां येईल कीं, त्यांचें उत्पन्न असेल त्याच मानानें त्यांचें कार्य होईल.

(१) प्रत्येक स्थानिक संस्था निरनिराळीं लोकोपयोगी कामें करीत असते. या कामांचा ज्यांना उपयोग होतो, त्यांनीं अर्थातच त्याकरितां मोबदला दिलाच पाहिजे. उदाहरणार्थ, पाणीपुरवठा किंवा शिक्षण यांसाठीं ठराविक कर किंवा पट्टी द्यावी लागते. अशा कामाकरितां जो मोबदला मिळतो, ती एक उत्पन्नाची बाब होय.

(२) या संस्थांचीं कांहीं कामें मोठीं, फार खर्चाचीं, अत्युपयुक्त व बरींच वर्षें चालवावीं लागतील अशीं असतात. इतका पैसा एकदम लोकांचे कडून कर रूपानें घेणें शक्य व न्याय्य नसतें. याकरितां अशा कामासाठीं स्थानिक संस्था कर्ज उभारतात, व काम पूर्ण झाल्यानंतर त्यापासून येणाऱ्या उत्पन्नांतून हें कर्ज भागविण्यांत येतें. पण, कर्ज काढणें, व तेंही मोठ्या प्रमाणावर, ही गोष्ट बरीच महत्त्वाची असल्यानें त्यावर शासनसंस्थेची नजर व नियंत्रण हीं पाहिजेतच. प्रत्येक देशांत असें नियंत्रण असतेंच. कोणत्याही स्थानिक संस्थेस कर्ज काढावयाचें असल्यास प्रथमतः शासनसंस्थेकडे अर्ज करावा लागतो. या अर्जांत कर्ज कशाकरितां काढावयाचें, कर्जाची रक्कम किती, ज्या तारणावर कर्ज काढावयाचें ती रक्कम किती आहे, कर्जाचा दर कोणता, व कर्ज किती वर्षांकरितां काढणार, ही सर्व माहिती द्यावी लागते. त्यानंतर शासनसंस्था अवश्य ती चौकशी करून समाधान झाल्यास कर्ज उभारण्यास अनुमति देते, व न झाल्यास अनुमति नाकारते.

(३) उत्पन्नाची तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे सरकारी मदत. सर्व जमावाच्या हिताची काळजी संस्थानाला घेतलीच पाहिजे. याकरितां सर्व स्थानिक संस्थांना शक्य ती मदत संस्थानानें केली पाहिजे. याच दृष्टीनें कांहीं कामें स्थानिक संस्थांनीं केलींच पाहिजेत, असें बंधन संस्थान घालतें. मुंबई प्रांतांत सरकार कांहीं गोष्टींकरितां या संस्थांना मदत करितें. शिक्षण, आरोग्यरक्षण, औषधयोजना, खेड्यांतील पाणीपुरवठा, वगैरे गोष्टींकरितां संस्थांना सरकारी मदत मिळूं शकते.

(४) यांशिवाय विविध प्रकारचे कर बसवून या संस्था आपलें उत्पन्न अवश्य तितकें वाढवितात. हे कर इतक्या विविध प्रकारचे असूं शकतात की, त्यांतून कोणतीही गोष्ट सुटत नाहीं. पण सामान्यत: कांहीं ठराविक करच वसूल करण्यांत येतात. जकात; जमिनीवर किंवा जमिनीच्या किंमतीवरील कर; इमारतीवरील कर; वाहनें आणि नावा; जनावरें, घरगुती नोकर, शहरांत येणारे जिन्नस, यांवर कर; क्षेत्रसीमाकर; व्यापार, उद्योग व व्यवसाय यांवरील कर; खासगी दुकानावर; पाणीपट्टी; दिवेपट्टी; भंगीपट्टी; सफाईपट्टी; गटारसफाईपट्टी; मंडई व इतर सार्वजनिक सोयींवरील कर; इत्यादि कर लादतां येतात.

## स्थानिक संस्थांचा खर्च

स्थानिक संस्थांचें कार्य आपण पाहिलेंच आहे. त्यावरच हा सर्व खर्च

होतो. उत्पन्नापैकीं अजमासें दोन तृतीयांश भाग शिक्षणकार्यात खर्च होतो व इतर सर्व कार्यांकरितां फक्त ⅓ शिलुक राहतात. पण असें असूनही हिंदुस्थानाची साक्षरता शेंकडा १४ हून अधिक नाहीं. याचें कारण असें कीं, खर्च बहुंशीं शहरांतील शिक्षणावर असून खेड्यांत निरक्षरता फार आहे. फक्त शहरांचीच साक्षरता हिशेबांत धरली, तर ती बरीच भरेल. खेड्यांतील शिक्षणावर आजपावेतों फारच थोडा खर्च करण्यांत येत असे.

एकंदरींत पाहतां शिक्षणावर स्थानिक संस्थांच्या खर्चाचा फार मोठा भाग खर्च होत असूनही, तो फारच अपुरा पडतो, व हा सर्व खर्च बहुधा फक्त प्राथमिक शिक्षणावरच होतो. मुंबई प्रांतांतील शिक्षणाच्या नव्या कायद्यान्वयें प्राथमिक शिक्षणाचा बहुतेक सर्व खर्च सरकारच करणार असून त्यामुळें शिक्षणही सुधारेल व स्थानिक संस्थांचा बराचसा भार कमी होईल. याचें कारण असें कीं, शिक्षणावर खर्च करूनही आपल्या स्थानिक संस्थांमधील कुप्रसिद्ध अव्यवस्थेमुळें शिक्षणाची व्यवस्था कधींच चांगली होऊं शकली नाहीं. अव्यवस्था, गोंधळ, मतभेद, भांडाभांडी, यांतच स्थानिक संस्थांचा सर्व वेळ खर्च होत असल्यानें, आजपर्यंत कोणत्याही प्रकारचें लोकोपयोगी काम व्यवस्थितपणें पार पाडण्याचें यश या संस्थांनीं मिळविलेलें नाहीं. कोणतेही काम वेळेवर हातीं घ्यावयाचें नाहीं. घेतल्यानंतर शक्य तोंवर दिरंगाई करून अर्धेकच्चें काम तसेंच कसें तरी पार पाडण्याची जणूं पद्धतच पडलेली आढळते. या संस्थांमधील लाथाळीचें व अव्यवस्थेचें वर्णन करण्याचें कारण नाहीं. सामान्यतः सर्व ठिकाणीं निःस्वार्थी जनहितदक्ष कार्यकर्त्यांचा अगदी ठणठणीत अभाव जाणवतो. हजारों कुलंगडीं, वशीलेबाजी, भानगडी, यांनीं बुजबुजलेलें ‘ राजकारण ’ लढविण्यांतच सर्व ‘ नगरपित्यां ’ चा वेळ खर्च होतो. या प्रकारामुळें कोणत्याही कामावर कितीही खर्च केला तरी त्याचा कांहींच उपयोग नाहीं.

इंग्लंड, जर्मनी, इत्यादि देशांत ज्या संस्थांनीं अलौकिक यश मिळविलें, त्याच संस्थांनीं आपल्या देशांत भरपूर दुर्लौकिक कमावला आहे. इंग्लंडांत १८३५ सालीं स्थानिक संस्थांचें पुनरुज्जीवन झाल्यावर पांच वर्षांच्या आंतच खेड्यांची व शहरांची परिस्थिति झपाट्यानें सुधारली. सर्व खेडुतांचें व शहरवासियांचें मनःपूर्वक साहाय्य व कळकळीनें काम करणारे कार्यकर्ते

लाभल्यानें प्रारंभापासूनच व्यवस्थित कारभारास सुरुवात झाली. जर्मन स्थानिक संस्थांविषयीं प्रो. लास्कीचे पुढील उद्गार लक्षांत ठेवण्याजोगे आहेत : "कांहीं विशिष्ट कामें खेरीज करून इतर सर्व कामें हाताळण्याचा जो अधिकार या संस्थांना आहे, त्यामुळेंच जर्मन स्थानिक संस्थांचा अभ्युदय झालेला आहे. या अधिकारांच्या योगानें, कोणत्याही आदेशात्मक सत्तेचा आधार न घेतां, जर्मन शहरांनीं आपलीं नाट्यगृहें बांधलीं, ट्रॅमचे रस्ते तयार केले, स्थानिक व्यापार सुरू केला, संगीत, नाट्य, शिक्षण, क्षयरोग-चिकित्सालयें, स्थानिक सेव्हिंग बँका, घरें बांधणें, बेवारशी व अनाथ अर्भकांचें पालनपोषण, कायदेशीर सल्ला देणाऱ्या संस्था व बेकारी आणि आगीचे विमे यांना आधार दिला. ज्ञानप्रसार व आर्थिक आणि सामाजिक प्रगति या विषयांत आज जर्मन शहरें आदर्शभूत झालेलीं आहेत."

या देशांतील स्थानिक संस्थांच्या अमूल्य यशाचें कारण तेथील जनतेच्या मनोभूमिकेंत सांपडेल. राष्ट्राचा अभिमान, राष्ट्रीय हिताकरितां स्वार्थावर पाणी सोडण्याची वृत्ति, राष्ट्राची मान उन्नत ठेवण्यासाठीं व राष्ट्राचा मान वाढविण्यासाठीं हवा तो त्याग व भगीरथ प्रयत्न करण्याची अहमहमिका ज्या राष्ट्रांत सतत दृष्टीस पडते, तेथें पर्वतप्राय अडचणदेखील हंसत हंसत दूर करणें शक्य आहे. या सद्‌गुणांच्या सामर्थ्यावर कोणतीही गोष्ट अजिंक्य वाटण्याचें कारण नाहीं. पण आपल्या देशांत आज त्यांची वाण आहे, हें नाकबूल करतां येणार नाहीं. मुसलमानी आक्रमणानंतर हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाचा या सद्‌गुणांशीं जो संबंध सुटला तो अगदीं "१५ ऑगस्ट" पर्यंत. गुलामगिरीच्या या पांचसहाशें वर्षांत व विशेषतः गेल्या दीडशें दोनशें वर्षांत त्यांना जें ग्रहण लागलेलें होतें त्यामुळें सर्वत्रच अंधकार पसरलेला होता. तशा अंधाऱ्या वातावरणांत त्यांची जोपासना होणें शक्य नव्हतें. पण आतां स्वातंत्र्याच्या उज्ज्वल प्रकाशानंतर तरी हे गुण वटवृक्षाप्रमाणें फोफावतील व आपल्या प्रचंड व शीतल छायेखालीं जनतेची उन्नति करतील अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

"ॐ तत्सत्"

लेखनारंभः—१६—१०—४७ समाप्तिः—१०—११—४७

---

# परिभाषा

Aristocracy-वर्गतंत्र;
Association-संस्था;
Autocracy-एकतंत्र;
Average- साधारण, सर्वसाधारण;
Bank-निधिसंस्था,
Command-आज्ञा;
Community-ज्ञाति, जमात;
Complementary-पूरक;
Consolidation-संयोग;
Custom-प्रचार, प्रथा, प्रघात;
Democracy- लोकतंत्र;
Democratic- लोकतंत्री;
District- विभाग, जिल्हा;
Dispute-विवाद;
Diversity- विविधत्व, अनेकविधत्व;
Division of Labour-कर्मविभाग, श्रमविभाग, श्रमविभाजन;
Dynamic-गतिमान्;
Endogamous-अन्तःसंबंधी;
Eugenics-सुजननशास्त्र;
Executive-विधायक;
Exogamous-बाह्यसंबंधी;
Family-कुटुंब, कुल;
Fashion- छन्द;
Federal- संयुक्त;
Federation- संयोग;
Fragmentation-शकलीकरण;
Governance-शासन;
Governm[illegible]स्था,शासनव्यवस्था, राज्यकारभार;
Group marriage-वृन्दविवाह, समूहविवाह;
Harmonious-लयदार, लयबद्ध;
Heterogeneous-विषम;
Hobby-नाद;
Homogeneous- एकजिनसी, एकजातीय;
Indispensable-अपरिहार्य;
Individual-व्यक्ति;
Individualism-व्यक्तिनिष्ठता;
Individualistic-व्यक्तिनिष्ठ;
Industry-यंत्रोद्यम, उद्योग;
Inevitable-अनिवार्य;
Institution-परंपरा, पद्धति;
Isolated-विविक्त, विलग, अलग;.
Judicial-Judiciary-निर्णायक;
Judgment - निर्णय;
Law-आदेश;
Legislate - शासनविधान;
Legislative-आदेशी;

Legislature, Legislative Assembly–आदेशसभा;
Local Self-government–स्थानिक स्वराज्य - संस्था, स्थानिक शासन-संस्था, स्थानिक संस्था;
Minister–मंत्री;
Monarchy–[illegible]
Monogamy–एकपतिकत्व;
Municipality–नगरपालिका;
Necessary–आवश्यक;
Normative–आदर्शनिष्ठ;
Organisation–संघटना;
People–जनता;
Pluralists-अनेकवादी;
Polyandry–अनेकपतिकत्व;
Polygamy–अनेकपत्नीकत्व;
Positive–वस्तुनिष्ठ;
Promiscuity–अनिर्बंध, अनियंत्रित संबंध, संकर, संमिश्र विवाह;
Province–प्रांत;
Rule–शासन;
Social–सामाजिक, समाजनिष्ठ;
Society–समाज;
Sovereign–सार्वभौम;
Sovereignty सार्वभौमत्व;
Specialisation–श्रमविशेषण;
Standard of Living–चरितार्थ-मान;
Totem–गणकेतन;
Tribe–गण;
Trusts–विश्वस्त संस्था;
Trust Companies– विश्वस्त मंडळें;
Unique–अद्वितीय;
Unitary–एककेंद्री.

# कॉन्टिनेन्टल प्रकाशन

**श्री. खांडेकर**

| | |
|---|---|
| नवा प्रातःकाल | २॥ |
| पूजन | ३ |
| पहिल्या वहिल्या | २। |
| गोफ आणि गोफण | ३ |

**श्री. बोकील**

| | |
|---|---|
| बेबीचा भाऊ | २ |
| साडेतीन शहाणे | ३ |
| चिमखडे | २॥ |
| वसंत | ३ |
| भाऊ–भाऊ | २॥ |
| बेबी | २ |

**श्री. कवठेकर**

| | |
|---|---|
| नादनिनाद | २ |
| चांदण्यांतील सांवल्या | ३ |
| शालन | ३ |
| मंदा | २ |

**श्री. ताम्हनकर**

| | |
|---|---|
| मामा | २॥ |
| विद्यामंदिरांत | ०॥। |
| आमचे हे | ३ |
| सावटांतलं रोप | २ |

**चिं. वि. जोशी**

| | |
|---|---|
| संचार | ३ |
| ओसाडवाडीचे देव | २ |
| सोळा आणे | २॥ |
| एरंडाचें गुऱ्हाळ | ३॥ |

**ना. ह. आपटे**

| | |
|---|---|
| मी वाट पाहीन | २। |
| एकटी | ५ |

**श्री. काणेकर**

| | |
|---|---|
| घरकुल | १। |
| काळी मेहुणी | १॥। |

**श्री. तळवलकर**

| | |
|---|---|
| अनुराधा | २। |
| आशियाचे धर्मदीप | २ |

**साने गुरुजी**

| | |
|---|---|
| अमोल गोष्टी (दु. आ.) | १॥ |
| कुरळ | ३ |

**श्री. सरदेसाई**

| | |
|---|---|
| स्वाति | १॥ |

**श्री. धनंजय**

| | |
|---|---|
| कलावंताचे सहवासांत | ३ |

**सौ. नाशिककर**

| | |
|---|---|
| नीलेचा दिलरुबा | २ |

**श्री. चिरडे**

| | |
|---|---|
| भंगलेली मूर्ति | २। |

**श्री. दत्त उद्धव वैद्य**

| | |
|---|---|
| मोगरीचा गजरा | १॥ |

**श्री. प्रभाकर पाध्ये**

| | |
|---|---|
| प्रकाशांतील व्यक्ति | १॥। |

**श्री. ग. त्र्यं. माडखोलकर**

| | |
|---|---|
| जीवन साहित्य | २॥ |

**आचार्य कालेलकर**

| | |
|---|---|
| जीवन आणि समाज | १॥। |

**श्री. शा. नि. ओक**

| | |
|---|---|
| धोऱ्याचे कळे | २। |

**श्री. जे. एल. रानडे**

| | |
|---|---|
| गोड ललकाऱ्या | १॥ |

# कॉन्टिनेन्टल प्रकाशन

### श्री. जी. एस. पाटणकर

मधूर चीजें १।

### श्री. त्र्यं. र. देवगिरीकर

घटना परिषद् २॥

### श्री. भा. कृ. केळकर

[illegible] ३॥

### श्री. रा. व. पाटणकर

आपलें राष्ट्रीय सरकार १।

### श्री. मनमोहन

युगायुगाचे सहप्रवासी २

### श्री. रा. वि. फडतरे

तिसरी झेप ३

### रामतनय

प्रमिलाबेन ४

### श्री. रमाकांत वेलदे

मूक ( दु. आ. ) ४

### प्रो. नांदापूरकर

मायबोलीची कहाणी १॥

### सौ. शांता शळके

वर्षा २

### श्री. का. न. केळकर

शमीपूजन ५

### श्री. अरविंद गोखले

जन्मखुणा २॥

### सौ. मालतीबाई दांडेकर

आकर्षक संसार ४

### श्री. य. गो. जोशी

साहित्यिकांची सफर १॥

### श्री. प्र. के. अत्रे

अत्रे उवाच २





## इतर पुस्तकें

### श्री. ना. सी. फडके

उन्माद ५

अंजली ५

आजचे तरुण स्त्री-पुरुष
व त्यांपुढील प्रश्न २॥

माझा धर्म ३।

प्रवासी ६

### सौ. कमला फडके

गुलमोहोर २॥

### श्री. भा. रा. भागवत

वैतागवनांतील वाफारे १।

### सौ. मालती दांडेकर

मी तुझीच का ? २॥

### सिंधू गाडगीळ

अंतरिक्षांतन २॥

### श्री. वि. वि. बोकील

तुझं माझं जमेना ३

### सं. प्रो. लागू

दिवाकराच्या नाट्यछटा ४

### काँग्रेस प्रकाशनें

काँग्रेस व राष्ट्रभाषा ०।=

ग्रामसफाई ०।=

अन्नधान्य प्रश्न ०।=

हिंदी स्त्रियांचें जीवन ०।=

### रमातनय

वंदनीय महाशय १

ज्ञान आणि विज्ञान १

### श्री. अष्टपुत्रे

विद्यार्थी ३